कविवर्य माधव
( माधव केशव काटदरे )
यांस
विनयादरपूर्वक
समर्पण

# आभार

या पुस्तकाचें ‘ अवशेष ’ हें नामकरण माझे मित्र “ ज्योत्स्ने ”चे सहसंपादक श्री. वामनराव ढवळे यांनीं केलें.

त्याची प्रस्तावना माझे मित्र प्रो. विठ्ठलराव कुलकर्णी यांनीं लिहिली; व स्वतःची भूमिका विशद करण्याच्या प्रसंगांतून माझा बचाव केला.

त्याची मुद्रणप्रत माझे मित्र श्री. शेषराव भातंब्रेकर यांनीं तत्परतेनें तयार करून दिली.

ज्यांच्या अकारण आत्मीयतेमुळें माझा वाङ्मयांतील प्रवेश वीस वर्षांपूर्वीं सुलभ झाला, त्या माधव कवींना कृतज्ञतापूर्वक पण अनुमतिविना हें पुस्तक अर्पण केलें आहे.

ग. त्र्यं. माडखोलकर

# प्रस्तावना



माझे मित्र गजाननराव माडखोलकर यांनीं आपल्या 'अवशेष' ह्या लेख-संग्रहाला मीं प्रस्तावना लिहावी अशी इच्छा प्रदर्शित केली तेव्हां त्यांस प्रथम मीं नकार दिला. कारण सर्वसाधारणपणें असा एक संकेत रूढ आहे, कीं ग्रंथ-काराला प्रस्तावना दुसऱ्या कोणाकडून लिहून घ्यावयाची असलीच तर ती आपणांहून ज्येष्ठ व श्रेष्ठ, निदान आपणाहून अधिक प्रसिद्ध अशा एखाद्या व्यक्तीकडून लिहून घ्यावी. माझ्या बाबतींत यांपैकीं कोणताच अलिखित नियम लागू पडत नाहीं. साहित्यक्षेत्रांत तर नाहीं; पण निदान वयानें जरी मी त्यांजपेक्षां श्रेष्ठ असतों तरी वडीलकीच्या जन्मसिद्ध हक्काचा आधार दाखवून मी माझी लायकी स्वयंसिद्ध आहे असें प्रतिपादन केलें असतें.

परंतु माडखोलकर यांनीं मला प्रस्तावना लिहिण्याविषयीं आग्रह केला तो कांहीं त्यांच्या ग्रंथाचा मीं पुरस्कार करावा या हेतूनें अर्थातच केला असणें शक्य नाहीं. कारण त्यांचें 'आधुनिक कविपंचक' हें पहिलें पुस्तक वगळ-ल्यास इतर सर्व पुस्तकें परप्रस्तावनेवांचून प्रसिद्ध झालीं आहेत. तेव्हां केवळ स्नेहाखातर त्यांनीं मला प्रस्तावना लिहावयास सांगितली असली पाहिजे असा मीं तर्क केला; व प्रस्तुत पुस्तकांतील लेख चाळून पाहिल्याबरोबर मीं केलेला तर्कच बरोबर असावा, अशी माझी खात्री झाली. कारण प्रस्तुत ग्रंथांतील आयर्लंडसंबंधींची लेखमाला आमच्या परिचयाचें स्नेहांत रूपांतर झालें त्या काळीं म्हणजे सुमारें वीस वर्षांपूर्वी प्रथम लिहिली गेली. त्यामुळें ही लेखमाला मीं जेव्हां पुन्हा वाचून पाहिली तेव्हां मला त्या काळची आठवण होऊन चांदण्याच्या मंद प्रकाशांत दूरच्या वस्तु नयनमनोहर दिसाव्या त्याप्रमाणें तत्कालीन सुखदुःखाच्या अनेक घटना मनश्चक्षूंसमोर उभ्या राहून मनाला एक प्रकारच्या अनिर्वचनीय आनंदाचा लाभ झाला. प्रस्तावना लिहावयास घेतल्यास गेल्या वीस वर्षांतील आयुष्याचें सिंहावलोकन करावें लागून त्या योगानें आयुष्यांतील हीं वर्षें आठवणींच्या साहाय्यानें पुन्हा

जगण्याची संधि मला अनायासें मिळणार या स्वार्थी भावनेनेंच मीं प्रस्तावना लिहिण्याचें एरव्हीं जबाबदारीचें वाटणारें काम आनंदानें पत्करिलें. असो, ही प्रस्तावनेची प्रस्तावना झाली.

माडखोलकरांची आणि माझी प्रथम ओळख झाली त्या वेळीं आम्ही दोघे शाळेंतच होतों व माडखोलकर हे माझ्या वडील भावाच्या वर्गांत होते. माझ्या वर्गांत राजा पराडकर या नांवाचा एक अत्यंत बुद्धिमान् विद्यार्थी होता. माडखोलकरांनीं आपलें 'आधुनिक कविपंचक' हें पुस्तक ज्याला अर्पण केलें आहे तोच हा विद्यार्थी. वर्गांत आमचे नंबर एकमेकांशेजारीं असल्यामुळें आमचा स्नेह जमला व यांनींच नंतर माझी माडखोलकरांशीं ओळख करून दिली. प्रस्तुत पुस्तकांतील 'मी व माझे वाचक' या लेखांत स्वप्नसंभाषणाच्या चर्चेंत यांचा उल्लेख आला आहे, तो वाचून पाहण्यासारखा आहे. माडखोलकरांशीं माझा स्नेह झाल्यानंतर त्यांजकडील पुस्तकें मी वाचण्याकरितां नेऊं लागलों त्या सर्वांवर 'वन्दे मातरम पुस्तकालय' असें लिहिलेलें असे. त्यावरून मला त्यांच्या स्वदेशप्रेमाची कल्पना प्रथम आली; व पुढें ते कविता लिहूं लागल्यानंतर, मला त्यांच्या त्या राष्ट्रीय वृत्तीचा प्रत्यक्ष पुरावा मिळाला. माडखोलकर हे प्रथम कवि म्हणून साहित्यक्षेत्रांत प्रविष्ट झाले ही गोष्ट त्यांच्या आजच्या वाचकवर्गाला माहीत असण्याचा संभव नाहीं. कवि या दृष्टीनें माडखोलकरांचें वैशिष्ट्य म्हणजे त्यांची बहुतेक कविता राष्ट्रीय स्वरूपाची होती हें होय. वीस सालांत लिहिलेल्या 'कालचा महाराष्ट्र' या त्यांच्या कवितेंतील शेवटच्या ओळी त्यांच्या एकंदर मनोरचनेच्या उत्तम निदर्शक आहेत असें मला वाटतें. त्यांत ते म्हणतात—

" झाला लुप्त तुझा स्वभावच महाराष्ट्रा, कसा आज तो
तेजोभंग न राष्ट्र मानधन जें त्याला असा साजतो.
तेजोभंग तुझा असा परि कसा झाला न कांहीं कळे,
कोणाचा तुज शाप भोंवुनि तुझी तेजस्विता मावळे।
स्वातंत्र्याविण जें जिणें विफल तें तेव्हां तुला वाटलें
स्वातंत्र्योत्कट दिव्य भार तर ते सारेच कां आटले ?
जावो वैभव तें अशाश्वत तुझें गेलें लयाला जरी,
बुद्धिभ्रंश पुढें असा तव महाराष्ट्रा ! न व्हावा परी.

काळाची करणी कठोर तुडवी तो वस्तुजाता जरी
त्याला अद्भुतरम्य राष्ट्रयश हें दुर्लंघ्य आहे तरी !
काळाला न कदापि शक्य करणें विच्छिन्न ज्यांचीं यशें
आहे दिव्य चरित्रचित्र तुझिया त्या पूर्वजांचें असें !
त्यांचें विक्रमवैभवस्मरण हें चित्ता तुझ्या चेतवो !
स्वातंत्र्योत्कटभाव जागृत करी ! तेजस्विता द्योतवो ।
बुद्धिभ्रंश अशेष लोपुनि महाराष्ट्रा ! पुन्हा विस्मित
होवो पाहुनि विश्वमंडल तुझें शार्दूलविक्रीडित ! "

माडखोलकर हे प्रथम कवि, नंतर टीकाकार व प्रबंधकार, आणि अलीकडे लघुकथालेखक व कादंबरीकार म्हणून वाचकवर्गासमोर आल्यामुळें वरवर पाहणारास ते एकसारखे आपल्या भूमिका बदलीत असतात असें वाटण्याचा संभव आहे. परंतु प्रस्तुत पुस्तकांतील लेख वाचतांना जर कोणती गोष्ट प्रामुख्यानें माझ्या नजरेस पडली असेल तर ती ही कीं, माडखोलकरांच्या आजच्या लिखाणांतूनच नव्हे, तर साहित्यक्षेत्रांत त्यांनीं पदार्पण केल्यापासून राजकीय स्वातंत्र्याचा पुरस्कार त्यांनीं ह्या नाहीं त्या स्वरूपांत केलेला आढळून येतो. मोठ्या नदीचें पात्र अधिकाधिक रुंदावत जाऊन वेगवेगळीं वळणें घेऊं लागलें तरी, सागराला मिळणाच्या मुख्य ध्येयापासून ती नदी जशी कधींहि परावृत्त होत नाहीं, उलट आपल्या अंतिम ध्येयप्राप्तीसाठींच ती निरनिराळीं वळणें घेत असते, त्याचप्रमाणें माडखोलकरांच्या साहित्यसरितेला आजपर्यंत अनेक वळणें लागलीं असलीं तरी त्यांतील विचारप्रवाह अभिन्न असून तो राजकीय स्वातंत्र्यविशिष्ट ध्येयाचाच मागोसा घेत वाहत असल्याचें आढळून येईल.

काव्याची चिकित्सा करून त्याच्या गुणावगुणांचें वर्गीकरण करतांना त्याला राष्ट्रीय वृत्तीचा एकमेव निकष लावणें हें माझ्या दृष्टीनें बरोबर नाहीं; परंतु माडखोलकरांनीं आपल्या अगदीं सुरुवातीच्या 'आधुनिक कविपंचक' या पुस्तकांतील पहिल्या प्रास्ताविक निबंधांत थोडाबहुत असलाच प्रकार केला आहे. याच पुस्तकांतील 'विनायकांची कविता' ह्या प्रकरणांत त्यांच्या या विशिष्ट मनोरचनेचें उत्तम प्रतिबिंब पडलेलें दिसून येतें. या निबंधांत एके ठिकाणीं ते म्हणतात—

" काव्य हें कांहीं नुसतें विद्वज्जनांच्या विनोदनाचें साधन नव्हे. मणिनूपुरांचें सिंजित किंवा कान्तेनें मृदु शब्दांनीं केलेला उपदेश हे बैठ्या कवितेचे विषय झाले. ज्या राष्ट्राचें रक्त नव्या भावनांनीं किंवा आकांक्षांनीं सळसळत असतें, त्याचें काव्य असें असत नाहीं. त्या राष्ट्रांत सामान्य जनांच्या विनयनाचें महत्कार्य कवितेला करावयाचें असतें; राष्ट्राच्या अंतःकरणाची तळमळ आणि विचारांची खळबळ त्या काव्यांतून उत्कटत्वानें ध्वनित व्हावयाची असते. घरबैठ्या मनाची करमणूक करणारें नेमळें आणि दुबळें काव्य त्या राष्ट्राला रुचणार नाहीं."

'आधुनिक कविपंचक' हें पुस्तक १९२१ सालीं प्रसिद्ध झालें. त्यानंतर चौदा वर्षांनीं सयाजीराव महाराजांच्या हीरकमहोत्सवानिमित्तानें प्रसिद्ध करण्यांत आलेल्या 'अर्वाचीन मराठी साहित्य' या ग्रंथांत माडखोलकरांनीं 'गेल्या साठ वर्षांतील मराठी कविता' हा प्रबंध लिहिला. या प्रबंधांत मराठी काव्याचें समालोचन करितांना त्यांनीं कांहीं कवींविषयींचीं आपलीं पूर्वींचीं मतें बदललीं असल्याचें दिसून येतें; परंतु चौदा वर्षांपूर्वी काव्याला लाविलेला राष्ट्रीयत्वाचा निकष त्यांनीं या प्रबंधांत अधिकच भावनोत्कटतनें लाविलेला आढळून येतो. या प्रबंधांतील उपसंहारांत त्यांनीं काढलेले पुढील उद्गार माझ्या विधानाची सत्यता पटवून देतील—

" प्रस्तुत लेख हा आधुनिक कवितेचा इतिहास नव्हे, तर तिच्यांतील प्रमुख अंतःप्रवाहांचें समालोचन आहे. या प्रवाहांचा ठाव घेतल्यावर मनाला असें वाटतें कीं, गेल्या साठ वर्षांत निर्माण झालेली कविता राष्ट्राच्या सुख-दुःखांची प्रातिनिधिक नसून, बहुजनसमाजाच्या जीवनाशीं तर तिचा यत्किं-चितहि संबंध नाहीं. तिच्या भोंवतालचें वातावरण कृत्रिम असून स्त्रैणपणा हें तिचें वैशिष्ट्य आहे...चिपळूणकर, आगरकर, टिळक किंवा परांजपे यांच्या लेखांनीं ज्या भावना आणि आकांक्षा महाराष्ट्रांत उद्दीपित केल्या, सुशिक्षितांच्या अंतःकरणांतलीं जीं सुप्त सामर्थ्यें जागृत करून त्यांना समाज आणि सत्ताधारी वर्ग यांच्या जुलमाविरुद्ध झुंज द्यावयाला उभीं केलीं, तशा प्रकारचा पराक्रम आधुनिक कालांतील अगदीं अग्रगण्य मानिलेल्याहि कवींच्या वाणीनेंहि कां करून दाखवूं नये? पण तो पराक्रम करून दाखवावयाला जें अकुतोभय वृत्तीचें

पौरुष, जें सहृदयतेनें युक्त असें पांडित्य आणि जी उदात्त ध्येयाची आकलन करणारी प्रतिभा अवश्य असते, ती या प्रणयपीडित आणि गलितोत्साह कवींजवळ कोठें आहे ?... महाराष्ट्रांतील आमचे कवि हे इतके प्रणयलोलुप आहेत कीं, त्यांच्या त्या व्याकुळ जीवनांतून स्वदेशाच्या स्मृतीचे क्षण हे वाळूंतील सुवर्णकणांप्रमाणें प्रयत्नपूर्वक शोधूनच काढावे लागतील."

विशेष आश्चर्याची गोष्ट म्हणजे 'आधुनिक कविपंचका'च्या मुखपृष्ठावर माडखोलकरांनीं मॅझिनीचें 'Where there is no vision, the People Perish' हें जें वचन उद्धृत केलें आहे, नेमका त्याचाच अनुवाद त्यांनीं गेल्या साठ वर्षांतील मराठी कविता या प्रबंधाच्या शेवटीं अधिक विस्तारानें केलेला आढळतो. " मुत्सद्द्याचें चातुर्य आणि योद्धयाचा पराक्रम यांच्या इतकीच द्रष्टेपणाचीहि आवश्यकता राष्ट्राच्या उन्नतीला असते; व कवींनीं जर बदलत्या कालानुसार राष्ट्राला नव्या ध्येयाचा मंत्र दिला नाहीं, तर मॅझिनीनें म्हटल्याप्रमाणें, बहुजनसमाज निराशेनें दिङ्मूढ होऊन जातो." माडखोलकरांचे हे उद्गार वर उद्धृत केलेल्या मॅझिनीच्या वचनाचीच आठवण करून देत नाहींत काय ?

विष्णु कृष्ण चिपळूणकर यांजवरील लेखमाला प्रथम १९२२ सालीं 'विविध-ज्ञानविस्तारां'तून क्रमशः प्रसिद्ध झाली; व पुढील वर्षी आर्यभूषण छापखान्यानें हा प्रबंध पुस्तकरूपानें प्रसिद्ध केला. माडखोलकर जेव्हां हे लेखांक लिहीत होते त्या वेळीं मी त्यांजकडे बहुधा रोज नियमानें जात असें. कॉलेजांतील तास संपतांच मी त्यांच्या घरीं जावयाचें व त्यांनीं आपलीं लिहून झालेलीं प्रकरणें वाचून दाखवावयाचीं, असा आमचा क्रम कित्येक दिवस चालला होता. दीर्घ व्यासंग, सूक्ष्म विवेचन, मार्मिक प्रतिपादन आणि डौलदार भाषा-शैली या गुणचतुष्टयानें अलंकृत असा हा उत्कृष्ट प्रबंध लिहिण्यापूर्वी माडखोलकरांनीं जे दीर्घ परिश्रम घेतले होते त्यांची आठवण झाली म्हणजे त्यांच्या अभ्यासूवृत्तीचें अजूनहि आश्चर्य वाटतें! हा प्रबंध लिहावयास घेण्यापूर्वी त्यांनीं निबंधमालेची कमींत कमी पांच-सहा वेळां तरी पारायणें केलीं होतीं. मेकॉलेचे निबंध त्यांनीं यापूर्वींच चांगले अभ्यासिले होते. 'आधुनिक कविपंचकां'तील त्यांची भाषा जी फाजील अलंकृत आणि नखरेबाज झाली आहे तो गडकऱ्यांच्याप्रमाणें मेकॉलेच्या ग्रंथ-वाचनाचाच दुष्परिणाम!

माडखोलकरांचा चिपळूणकरांवरील प्रबंध ज्यांनीं सूक्ष्म रीतीनें अभ्यासिला असेल, त्यांच्या ही गोष्ट लक्षांत येईल कीं, या प्रबंधाची सुरुवात मेकॉलेच्या धाकट्या पिटवरील निबंधाच्या धर्तीवर केली आहे. चिपळूणकरांच्या भाषा-शैलीवर मेकॉलेप्रमाणें ॲडिसनच्या लेखनपद्धतीचाहि परिणाम झाला असल्याची शंका येतांच त्यांनीं स्पेक्टेटरचे सर्व व्हॉल्यूम्स आणून त्यांतील ॲडिसनचे सर्व लेख वाचून काढल्याचें मला माहीत आहे; परंतु हें सर्व सांगण्यांत माझा हेतु माडखोलकरांनीं चिपळूणकरांच्या वाङ्मयाचें किती उत्तम परिशीलन केलें होतें हाच केवळ नसून, चिपळूणकरांवर प्रबंध लिहिण्यास ते कां प्रवृत्त झाले हें दर्शविण्याचा आहे. माडखोलकरांच्या ज्या राष्ट्रीय वृत्तीचें प्रतिबिंब त्यांच्या 'आधुनिक कविपंचकां'त पडलेलें दिसून येतें त्या राष्ट्रीय वृत्तीनेंच त्यांना चिपळूणकरांवरील प्रबंध लिहिण्यास प्रवृत्त केलें ही गोष्ट मला प्रामुख्यानें सांगावयाची आहे. निबंधमालेचें राष्ट्रीय आणि क्रान्तिकारक स्वरूप विशद करून सांगतांना माडखोलकर जे समरस आणि भावनावश झाल्यासारखे दिसतात ते यामुळेंच. निबंधमालेसंबंधीं त्यांनीं काढलेले पुढील उद्गारच माझ्या विधानाची साक्ष पटवितील.

" क्रान्तिकारक पुरुषाचा क्रांतिकारक ग्रंथ असेंच निबंधमालेचें वर्णन महा-राष्ट्राचे भावी इतिहासकार करतील. मालेपेक्षां सरस किंवा सुंदर ग्रंथ मराठी भाषेंत पूर्वी किंवा नंतर झाले नाहींत, असें नव्हे; पण ज्याच्या प्रत्येक शब्दांत अन्यायाचें निर्मूलन करणारी पवित्र वज्रशक्ति संचरलेली असते, असा दलितांचा परित्राण करणारा ग्रंथ मात्र युगायुगांत एकदांच निर्माण होत असतो. निबंधमालेचें कोणतेंहि पान उघडून पाहा; त्यांतील प्रत्येक ओळींतून देशाभिमानाची दीप्ति आणि स्वातंत्र्याची स्फूर्ति झळाळतांना दृष्टीस पडेल. चिपळूणकरांचें विभूतिमत्वच जणूं 'माले'च्या रूपानें वाङ्मयस्वरूप धारण करून आविर्भूत झालें."

चिपळूणकरांवरील निबंधाच्या शेवटीं माडखोलकरांनीं निबंधमालेनें साहित्य-सेवकांची जी परंपरा निर्माण केली त्यांची नामावलि दिली आहे. या यादींत त्यांनीं आपलें स्वतःचें नांव अर्थातच घातलेलें नाहीं. परन्तु ते स्वतःहि याच परंपरेंत बसतात; कारण देशाभिमानाच्या दीप्तीप्रमाणें साहित्यसेवेची स्फूर्तिहि

त्यांना 'निबंधमालेनें'च दिली असली पाहिजे असें मला वाटतें. किंबहुना ही गोष्ट त्यांनीं स्वतःच अप्रत्यक्षपणें कबूल केली आहे. प्रस्तुत पुस्तकांतील 'वाङ्मयाकडे मी कोणत्या दृष्टीनें पाहतों ?' या निबंधांत ते म्हणतातः—

"मी वर्तमानपत्रांच्या धंद्यांत पडल्यामुळें माझ्या ललित-लेखनाला राजकारणाचा रंग चढला असें पुष्कळांना वाटतें; पण तें खरें नाहीं. वर्तमानपत्राच्या धंद्याशीं माझा संबंध आला नसता तरीहि माझ्या ललित-लेखनाला राजकीय स्वरूप आलें असतें. याला कारण माझी लहानपणापासूनची परिस्थिति. कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचे एक अनन्य भक्त आणि त्यांच्या वाङ्मयाचे प्रकाशक कै. खंडेराव बेलसरे व 'कल्याण' बॅंग्जचे जनक आणि 'विनोद' पत्राचे संपादक कै. गजाननराव देसाई हे माझ्या वडिलांचे परम स्नेही होते व त्या दोघांचीहि बैठक आमच्याकडे नेहमीं असे. त्यामुळें मला राष्ट्रीय पक्षाच्या राजकारणाची गोडी लहानपणींच लागली."

माडखोलकर हे स्वतः गुप्तकटवाले, बॉम्बगोळे फेकणारे, आगगाड्या उलथविणारे अशा प्रकारचे क्रान्तिकारक नाहींत. असलेच तर निदान मला तरी त्याची माहिती नाहीं. परन्तु स्वातंत्र्याकरतां सर्वस्वाची आहुति देणाऱ्या क्रान्तिकारकांच्या ठिकाणीं जो एक लोकोत्तर ध्येयवाद आणि उत्कट देशाभिमान दिसून येतो त्याचा माडखोलकरांच्या मनावर फार परिणाम झाला असल्याचें आढळून येतें. त्यांच्या कांहीं कादंबऱ्यांत क्रान्तिकारकांचा सुळसुळाट दिसून येतो तो यामुळेंच. ते स्वतः क्रान्तिकारक नसले तरी जगांतील क्रान्तिकारक वाङ्मयाचा त्यांनीं तन्मयतेनें अभ्यास केला आहे. एवढेंच नव्हे तर अगदीं प्रथमपासून राष्ट्रीय क्रान्तिवादाचा (National Revolution) त्यांनीं पुरस्कार केल्याचें आढळून येईल. त्यांच्या आरंभीच्या कविता (यांतील एका कवितेचा कांहीं भाग मीं प्रस्तावनेंत उद्धृत केलाच आहे), "आधुनिक कविपंचक", "गेल्या साठ वर्षांतील मराठी कविता," "विष्णु कृष्ण चिपळूणकर" व विशेषतः त्यांची प्रस्तुत पुस्तकांत पुनर्मुद्रित केलेली आयर्लंडवरील लेखमाला हीं सर्व त्यांच्या सदरहू ध्येयवादाचींच निदर्शक आहेत. सिन्फेन चळवळीवरील त्यांचे लेख 'केसरीं'तून प्रसिद्ध होत होते त्या वेळीं, मुंबईला बॅकबेच्या वाळवंटांत बसून सिन्फेन चळवळीच्या धर्तीवर

हिंदुस्थानांत क्रान्तिकारक चळवळ होण्याची कितपत शक्यता आहे यासंबंधीं माझ्याशीं त्यांनीं अनेकवार चर्चा केल्याचें मला स्मरतें. गांधीजींनीं सुरू केलेली चळवळ त्यांना क्रान्तिकारक स्वरूपाची वाटली म्हणूनच त्यांनीं स्वतः जंगल-सत्यग्राहांत एका टोळीचा पुढाकार घेऊन तुरुंगवास पत्करला. परंतु पुढें गांधीवादांत प्रामाणिकपणापेक्षां ढोंगीपणाचा अधिक बुजबुजाट झाल्याचें त्यांच्या निदर्शनास आल्यापासून त्यावरील त्यांचा विश्वास उडून गेला असावा असें वाटतें. या दृष्टीनें 'मीं शेगांवला काय पाहिलें?' हा प्रस्तुत पुस्तकांतील लेख फारच मार्मिक असून अवश्य वाचून पाहण्यासारखा आहे.

मला स्वतःला माडखोलकरांच्या कांहीं कादंबऱ्या तितक्याशा आवडत नाहींत व म्हणून त्यांच्या कादंबऱ्यांचीं परीक्षणें करण्याला मला उत्साह वाटत नसल्यामुळें मी तीं करण्याचें टाळतों. परंतु त्यांच्या कादंबऱ्यांचीं मीं परीक्षणें केलीं नसलीं तरी निश्चितपणें सांगूं शकतों कीं, त्यांच्या ठिकाणीं असणाऱ्या राष्ट्रीय वृत्तीनेंच त्यांना राजकारणप्रधान कादंबऱ्या लिहिण्याला प्रवृत्त केलें. नाहीं म्हणायला त्यांची 'मुक्तात्मा' मला फार आवडली. 'प्रतिभे'त त्याविषयीं मीं दोन लेखांकहि लिहिले आहेत. परंतु तेहि परीक्षणात्मक आहेत असें म्हणतां येणार नाहीं. मला माडखोलकरांचे निबंध व त्याहिपेक्षां त्यांनीं लिहिलेलीं व्यक्ति-चित्रें फार आवडतात. प्रस्तुत पुस्तकांतील 'डॉ. खरे आणि डॉ. राव' या लेखांत व्यक्तिचित्रें रंगविण्यांतील त्यांची सफाई, कुशलता आणि मार्मिकता हे गुण उत्तम रीतीनें प्रकट झालेले दिसून येतात. अगदीं पहिल्याच लेखांत त्यांनीं त्यांचे बंगाली स्नेही ज्योतिर्भूषण सेन यांचें जें व्यक्तिचित्र काढिलें आहे तें वाचून पाहिलें असतां व्यक्तिचित्रें काढण्याची कला माडखोलकरांनीं किती आत्मसात् केली आहे याची कल्पना येईल. वस्तुतः या बंगाली बाबूंनीं ग्रंथहि लिहिले नव्हते, कीं कांहीं मोठी अपूर्व कामगिरीहि केली नव्हती, कीं ज्यामुळें माडखोलकरांनीं त्यांचें व्यक्तिचित्र काढावें किंवा तें काढणें त्यांना सोपें जावें. ज्योतिर्बाबूंची काव्यात्मकताच माडखोलकरांना मोठी आकर्षक वाटली आणि म्हणून त्यांनीं हें व्यक्तिचित्र रेखाटलें असें वाटतें. पण सांगण्यासारखें कांहीं नसतांहि सेनबाबूंच्या मूर्तीतच नव्हे तर त्यांच्या व्यक्तित्वाचें हुबेहुब चित्र त्यांनीं किती ठसकेबाज पद्धतीनें

मनश्चक्षूंसमोर उभें केलें आहे बरें ! सदरहू ज्योतिर्भूषण सेन यांनीं बॅकबेच्या वाळवंटांत येतांच प्रथम समुद्राच्या लाटांपर्यंत जाऊन त्यांत त्यांनीं उन्मनस्क-पणानें आपले पाय भिजविल्याचें दृश्य मीं स्वतः डोळ्यांनीं पाहिलें असल्यामुळें मला हें व्यक्तिचित्र विशेषच विलोभनीय वाटतें. असो.

प्रस्तावना म्हणजे कांहीं परीक्षण नव्हे. आमच्या पूर्वायुष्यांतील अनेक स्मृति या पुस्तकांतील कांहीं लेखांशीं निगडित झालेल्या असल्यामुळेंच, मी प्रस्तुत पुस्तकाला प्रस्तावना लिहिण्याला प्रवृत्त झालों हें सुरुवातीलाच सांगितलें आहे. पुढें प्रस्तावना लिहितांना माडखोलकर यांच्या वाङ्मयांत अगदीं प्रथमपासून एक ध्येयवाद पुरस्कारिलेला मला दिसून आला म्हणून त्याचें मीं थोडक्यांत दिग्दर्शन केलें. अलीकडे माडखोलकर आपल्या भाषणां-तून आणि लेखनांतून महाराष्ट्राच्या एकीकरणाचा पुरस्कार करीत असलेले आढळतात. वस्तुतः महाराष्ट्राच्या एकीकरणासंबंधींचे त्यांचे विचार आजचे नाहीं. १९३२ सालच्या 'मौजे'च्या दिवाळीच्या अंकांत या विषयावर त्यांचा एक लेख प्रसिद्ध झालेला आहे. भाषावार प्रांतरचनेच्या कल्पनेला नवीन राजवटींत कॉंग्रेसनेंहि मान्यता दिल्यामुळें महाराष्ट्राच्या एकीकरणाचा आणि पुनर्घटनेचा प्रश्न खाडखोलकरांनीं पुन्हा नव्या उत्साहानें हातीं घेतल्यासारखा दिसतो; परंतु माडखोलकरांच्या एकंदर वाङ्मयांत राष्ट्रीय क्रांतीचें अथवा स्वातंत्र्याचें सूत्र अगदीं प्रथमपासून अनुस्यूत झालेलें मला दिसून आल्यामुळें, मीं माझ्या प्रस्तावनेंत त्याचा प्रामुख्यानें उल्लेख केला आहे. वास्तविक माडखोलकरांचा वाङ्मयाकडे 'मी कोणत्या दृष्टीनें पाहतों !' हा याच पुस्तकांतील लेख सदरहू लेख-संग्रहाला प्रस्तावनेदाखल छापला असता तरी चाललें असतें; परंतु माडखोलकरांनीं मींच प्रस्तावना लिहावी म्हणून इच्छा दर्शविल्यामुळें मीं त्यांच्या वाङ्मयाच्या स्थूल स्वरूपाचें थोडक्यांत विवेचन केलें. तें कितपत बरोबर आहे हें अर्थातच वाचकांनीं आपल्या मनाशीं ठरवावयाचें आहे.

—वि. ह. कुळकर्णी

## आमचें प्रकाशन

रॉय-चरित्र
भाई बेके

फुलें आणि दगड
वि. स. खांडेकर

पुनर्जन्म
साने गुरुजी

काव्यज्योति
प. ले. : वि. स. खांडेकर

पारंब्या
आनंदीबाई जयवंत

सायंकाल
वि. स. खांडेकर

ढासळलेले बुरूज
लक्ष्मणराव सरदेसाई

आणखी चिमणराव
चिं. वि. जोशी

सख्याहरी
दत्तु बांदेकर

पहिलें प्रेम
वि. स. खांडेकर

अवशेष
ग. त्र्यं. माडखोलकर





क्रौंचवध
वि. स. खांडेकर

तात्या
ना. धों. ताम्हनकर

आस्तिक
साने गुरुजी

सहा भाषणें
वि. स. खांडेकर

नवे संसार
ग. त्र्यं. माडखोलकर

छाया
वि. स. खांडेकर

घरट्याबाहेर
वि. स. खांडेकर

तिसरी भूक
वि. स. खांडेकर

? (एक नावीन्यपूर्ण कादंबरी)
ग. त्र्यं. माडखोलकर

## पुढील प्रकाशन

## अविस्मरणीय व्यक्ति : : १

मी सकाळीं फिरून परत आलों आणि आपल्या खोलींत जाणार तोंच गॅलरीमध्ये पुस्तक वाचीत फेऱ्या घालीत असलेले डॉ. झकरायस मला म्हणाले—

“ आपला नवा मित्र तुम्हीं पाहिलात का ?”

मीं आश्चर्यानें थबकून त्यांना म्हटलें—

“ नाहीं—”

त्याबरोबर आपले पोपटी डोळे किंचित् विस्फारून डॉक्टरसाहेब उद्गारले, “ आपला हा नवा मित्र बंगाली आहे. आपल्यामधें आजपर्यंत कुणी बंगाली नव्हता. तुमच्या पलीकडच्याच खोलींत आहे तो. आपण पाहूं या खोलींत आहे का—”

आम्ही दोघे पलीकडल्या खोलींत गेलों. तेव्हां खाटेकर पुस्तक वाचीत बसलेला एक बंगाली तरुण माझ्या दृष्टींस पडला.

“ हेच आपले नवे मित्र. यांचं नांव...माफ करा हं, मी विसरलों !... काय बरं तुमचं नांव...?”

" ज्योतिर्भूषण सेन—"

" बंगाली नांवं हीं मराठी नांवांइतकींच अवघड असतात लक्षांत ठेवायला—"

डॉक्टर झकरायस हसत हसत म्हणाले आणि अशा रीतीनें ज्योतिबाबूंशीं माझी ओळख झाली.

काळा, ठेंगू, तुंदिल, थोडासा लाजाळु आणि शिवाय बोलतांना किंचित् अडखळणारा असा तो बंगाली तरुण अर्थातच आकर्षक नव्हता. त्याच्या त्या लहानशा, खोल, उदास डोळ्यांत एक प्रकारची चमक होती. एकाकी आणि आर्त अशा त्याच्या जीवनांतील सगळी अतृप्तता त्याच्या त्या डोळ्यांतून जणूं आशेनें जगाकडे बघत असे. त्याच्या त्या दृष्टीनेंच माझें लक्ष त्याच्याकडे वेधून घेतलें.

या प्रसंगाला दीड तप होत आलें आहे आतां. तरीसुद्धां त्या दिवसापासून पुढें वर्ष सव्वा वर्ष ज्योतिबाबूंच्या सहवासांत माझा जो वेळ गेला, त्यानें अगदीं चिरंतन असे संस्कार माझ्या मनावर आणि बुद्धीवर केले. त्यापूर्वी आणि त्यानंतर अनेक थोर आणि प्रभावी व्यक्तींशीं माझा निकट संबंध आला; पण ज्योतिबाबूंच्या सान्निध्यांत असतांना मीं जें जग पाहिलें, तें नंतर कांहीं मला कोणी दाखवूं शकलें नाहीं.

सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटीच्या पुण्यांतील निसर्गरम्य निवासांत आम्ही दोघेच त्या वेळीं अगदीं एकाकी, अगदीं अनिकेत (Homeless) असे होतों. मला स्वतःचें घर नसलें, तरी शहरांत मित्रांचीं घरें पुष्कळच होतीं. ज्योतिबाबूंना तोहि निवारा नव्हता. त्यामुळें मीं शहरांत जावयाला निघालों, म्हणजे ते मला हटकून म्हणावयाचे, " आज शहरांत गेल्याशिवाय चालणार नाहीं का तुमचं? संध्याकाळचा वेळ शहरांतल्या गर्दीत आणि धुळींत घालविण्यापेक्षां वेताळावर फिरायला जाणं मजेचं नाहीं का?"

आम्हां दोघांना एकत्र आणावयाला आमची दोघांची एकाकिता जितकी कारण झाली, त्याहीपेक्षां ज्योतिबाबूंच्या वृत्तींतील काव्यात्मता जास्त कारण झाली. आपल्या पूर्वायुष्याबद्दल आणि गृहस्थितीबद्दल ते अगदीं मुग्ध असत. त्यांचें वाचन चांगलें होतें; पण तात्त्विक चर्चेचा त्यांना कंटाळा होता. त्यांना वाचा फुटावयाची, त्यांच्या दबलेल्या भावनांना भरती यावयाची,

ती फक्त निसर्गाच्या सान्निध्यांत. नक्षत्रमंडित आकाश ज्याच्यावर सगळ्या बाजूंनीं टेकलें आहे असा माळ, झाडींतून लपतछपत वाहणारा संथ कालवा, उंटाच्या पाठीसारखी दिसणारी निर्वृक्ष टेकडी आणि जो कधींहि संपेल असें वाटत नाहीं असा मनुष्यवस्तीबाहेरचा शांत रस्ता हीं ज्योतिबाबूंचीं आवडतीं विहारस्थलें असत.

पण, त्यांना वेड जर खरोखरी कसलें असेल, तर तें पाण्याचें. आभाळांतून ठिबकणारें दंव, धो-धो पडणारा मुसळधार पाऊस, नदीचें खळखळ वाहणारें पाणी, कालव्याचा आवाज न करतां घरंगळणारा ओघ, तलावाच्या सपाटीवरील सौम्य तरंग आणि समुद्राच्या सपाटीवरील क्षुब्ध लाटांचें थैमान हीं वरुणाचीं सगळीं विविध रूपें त्यांना अत्यंत प्रिय होतीं. सृष्टीच्या रोमरंध्रांतून निनादित होणारें चिरंतन संगीत जलाशय आणि जललहरी व्यक्त करतात असें ते नेहमीं म्हणावयाचे. त्यांच्या या पाण्याच्या वेडापायीं आम्ही दोन वेळां भर श्रावण महिन्यांत पावसाच्या झडीमध्यें खंडाळ्यापासून लोणावळ्यापर्यंत घाटमाथ्यावर मनसोक्त हिंडलों व कालव्याच्या कांठाकांठानें किती वेळां भटकलों असूं तें आमचें आम्हांलाच माहीत !

त्यांच्या या पाण्याच्या वेडाचा अगदीं विलक्षण असा अनुभव आम्ही मुंबईला दोघे एकत्र गेलों त्या वेळीं मला आला. त्यांना समुद्र पाहण्याची जणूं तळमळ लागली होती. पुण्याहून निघतांना त्यांनीं माझ्याकडून करार करून घेतला होता कीं, मुंबईला पोंचल्याबरोबर मीं त्यांना समुद्र दाखवावयाचा. त्या प्रमाणें एक्सप्रेसनें मुंबईला आल्यावर जेवण उरकून रात्रीं साडे-नऊच्या सुमारास आम्ही समुद्रावर जावयाला निघालों. सँडहर्स्ट पुलावर आम्ही आलों तरी समुद्र दिसेना. ज्योतिबाबूंनीं तर मला अगदीं भंडावून सोडलें होतें. पुलाच्या उतारावरून आम्ही पुढें येतों न येतों, तोंच समुद्राचा तो भव्य विस्तार त्यांच्या दृष्टीस पडला, त्याची गंभीर गर्जना त्यांच्या कानावर आदळली. त्याबरोबर साऱ्या रस्त्यानें बडबड करीत असलेले ज्योतिबाबू एकदम मुग्ध झाले. आम्ही वाळवंटांत उतरून समुद्राच्या लाटांपर्यंत जाऊन पोंचलों मात्र—ज्योतिबाबूंच्या डोळ्यांतून अश्रूंच्या धारा वाहूं लागल्या.

त्यांच्या या काव्यात्मतेप्रमाणेंच त्यांच्या वृत्तींत एक प्रकारची मोहक ( Innocence अनघता ) होती. त्यांच्या मनाइतकें खोल, पण निष्पाप मन मीं

अद्याप तरी पाहिलेलें नाहीं. जणूं डोंगराच्या खबदाडींतील अगोचर झऱ्याचें अमृतोदकच! त्यांच्या मनाची ती अनघता!—ती पाहून मी केव्हां मोहित तर केव्हां विस्मित होत असें. सृष्टीची शब्दातीत भाषा त्या अनघतेमुळेंच त्यांना समजत असे आणि तिच्यांत ओतप्रोत भरलेला आनंदहि पण त्या अनघतेमुळेंच त्यांना लुटतां येत असे. घाटमाथ्यावर ढगांमागून धावतांना, चांदण्यांत सावल्यांचे खेळ पाहतांना किंवा कोवळ्या गवतावर पडून सृष्टीचें स्पर्शसुख अनुभवतांना जो आनंद त्यांच्या दृष्टींतून आणि वृत्तींतून प्रकट होत असे, तसा अनघ आनंद मीं त्यानंतर बघितला नाहीं. यौवनाचा बहर पुरता उमलण्यापूर्वींच त्यांचें मन, कोणत्या कारणामुळें असेल तें असो, एका परीनें करपून गेल्यासारखें झालें होतें. त्यामुळें संसाराला पाठमोऱ्या झालेल्या त्यांच्या उदास मनानें जणूं बेफाम होऊन सृष्टिमातेकडे धाव घेतली.

त्यांच्या अनघतेइतकीच त्यांची तादात्म्य पावण्याची शक्तीहि विलक्षण होती. ईस्टरच्या सणांत डॉ. झकरायस यांच्याबरोबर आम्ही शुक्रवारीं दुपारीं सेंट मेरीच्या देवळांत प्रार्थनेला गेलों. हा प्रार्थनेचा कार्यक्रम साधारण दुपारीं ११ वाजल्यापासून ३॥ वाजेपर्यंत चालला होता. तो संपल्यानंतर आम्ही तिघे कॉर्नेलियांत गेलों. डॉ. झकरायस यांचा उपास सुटावयाचा होता. त्यांनीं चहाबरोबर भरपूर खाण्याचे पदार्थहि मागविले; पण देवळांत गेल्यापासून भावाविष्ट झालेल्या ज्योतिबाबूंचें मन कांहीं केल्या त्या भावसमाधींतून बाहेर पडेना आणि चहा कांहीं त्यांच्या घशाखालीं उतरेना! डॉ. झकरायस हे इतके भाविक; पण त्यांनाहि या आपल्या हिंदु मित्राचा भावावेश पाहून ओशाळल्यासारखें झालें. सोसायटींत परत आल्यावर ज्योतिबाबू पॅपिनीचें ख्रिस्त-चरित्र जे एकदां हातांत घेऊन बसले, ते रात्रीं फिरावयाला बाहेर पडेपर्यंत!

त्या दिवशीं रात्रीं ख्रिस्त आणि बुद्ध यांच्या चरित्रांवरून बोलतांना ते अचानक उद्गारले, "वस्तींतून बाहेर पडल्याखेरीज सृष्टीचं खरं स्वरूप दिसत नाहीं आणि हातांत भिक्षापात्र घेतल्याखेरीज जगाचं खरं स्वरूप कळत नाहीं!"

१९२८ सालीं ज्योतिबाबू नागपूरला आले होते. तीच आमची शेवटची भेट. या त्यांच्या नागपूरच्या मुक्कामांत तेलंखेडीच्या तलावावर आम्हीं बसलों

असतां मीं त्याना सहज म्हटलें—

"ज्योतिबाबू, पुणं सुटल्यावर मी पुष्कळ गोष्टी विसरलों; पण तुमचा विसर मात्र पडत नाहीं. चांदण्यांतल्या सावल्या बघितल्या आणि तलावांतलीं प्रतिबिंबं पाहिलीं, म्हणजे मला तुमची आठवण होते."

त्यावर ज्योतिबाबू हसत हसत उद्गारले—

"खरं आहे तुमचं म्हणणं. मी मेल्यावरसुद्धां माझा काळा रंग सावल्यांत मिसळून तुम्हांला माझी आठवण देईल आणि माझ्या डोळ्यांतली चमक पाण्यांत मिसळून तुमच्याकडे बघेल!"

हें त्यांचें विनोदवचन अक्षरशः खरें झालें. कारण पुण्याच्या ससून हॉस्पिटल-मध्यें ज्योतिबाबू अनिकेत स्थितींत वारल्याला आतां दहा वर्षे होऊन गेलीं असतील; पण, त्यांच्याबरोबर केलेल्या त्या मनसोक्त भटकेगिरीची आठवण मला झाली नाहीं, अशी एकहि रात्र मला आठवत नाहीं.

किर्लोस्कर, मे १९४०

---

# नागपुरांत असतांना प्रो. फडके : : २

प्रो. ना. सी. फडके यांच्याशीं माझी ओळख १९२४ सालच्या सप्टेंबरमध्यें मी नागपुरास राहावयाला आल्यानंतर झाली. त्यापूर्वी मीं त्यांचीं 'अल्ला हो अकबर', 'डी व्हॅलेरा' वगैरे पुस्तकें वाचलीं होतीं; एक-दोन भाषणें ऐकलीं होतीं; व पुण्यास विजय छापखान्यांत आणि मुंबईस लोटवाला यांनीं काढलेल्या सोशॅलिस्ट होस्टेलमध्यें त्यांना पाहिलें होतें. पण आमचा परिचय होण्याचा योग मात्र नागपुरास आला; व आम्ही दोघेहि तेथें त्या वेळीं अगदीं नवखे असे असल्यामुळें या परिचयाची परिणति लवकरच स्नेहामध्यें झाली. शुक्रवार तलावांत मी त्यांच्याबरोबर चांदण्या रात्रीं केलेला नौका-विहार, शामियाना उभारून तयार केलेल्या एल्फिन्स्टन थिएटरमध्यें पाहिलेले मूक चित्रपट आणि अप्पासाहेबांनीं स्वतः पेटी वाजवून गाइलेलीं पदें यांचें स्मरण अद्याप माझ्या मनांत अगदीं ताजें असें आहे.

नागपुरास सुमारें सहा-सात महिने घडलेल्या या निकट सहवासांत त्यांची रसिकता, कुटुंबवात्सल्य, खेळकरपणा, व्यासंगी वृत्ति आणि हौसेनें अंगावर घेतलेल्या कामासाठीं वाटेल ते कष्ट करण्याची तयारी हे त्यांचे गुण माझ्या

अनुभवाला आले. नागपूरच्या कोणत्याहि कॉलेजांत त्या वेळीं मराठीच्या पद्धतशीर अभ्यासाची सोय झालेली नव्हती; व मराठीसाठीं एकाहि कॉलेजांत स्वतंत्र अध्यापक नेमला गेलेला नव्हता. तरीसुद्धां अप्पासाहेबांनीं हिस्लॉप कॉलेजांत महाराष्ट्र भाषासंवर्धक मंडळ काढून मराठी भाषेच्या कॉलेजांतील वाङ्मयनिर्मितीला आणि चळवळीला जोराची चालना दिली. या त्यांच्या अभिनव उपक्रमांत आचार्य दादा धर्माधिकारी आणि मी उत्साहानें सामील झालों. महाराष्ट्र भाषासंवर्धक मंडळानें त्या आपल्या पहिल्याच वर्षांत जितके विविध आणि उद्‌बोधक कार्यक्रम केले, तितके त्यानंतर कधीं झालेले मला आठवत नाहींत.

महाराष्ट्र भाषासंवर्धक मंडळाशिवाय अप्पासाहेबांचे दुसरे आवडते दोन विषय म्हणजे फिलॉसॉफिकल सोसायटीचे कार्यक्रम आणि कॉलेजांतील खेळांचे सामने. दुपारीं कॉलेजांतील काम आटोपल्यावर त्यांचे दीड-दोन तास तरी टेनिस-कोर्टावर नेमानें खर्च होत असत. त्याचप्रमाणें फिलॉसॉफिकल सोसायटीच्या निरनिराळ्या कार्यक्रमांतहि ते हौसेनें भाग घेत असत. या विद्यालयीन वातावरणाच्या बाहेरहि त्यांच्या अभिरुचीला अनुकूल असे जे इतर कार्यक्रम होत, त्यांतहि ते आनंदानें सामील व्हावयाचे. श्री. शंकरराव प्रवर्तक यांनीं काढलेल्या अभिनव संगीत विद्यालयाची स्थापना त्यांच्याच हातून झाली; व शहरांतील गायनवादनाच्या किंवा आर्ट सर्कलच्या सगळ्या समारंभांना ते साक्षेपानें हजर राहत असत. नागपुरांत विद्यार्थ्यांच्या सुसंघटित अशा संस्था त्या वेळीं बहुतेक नव्हत्याच. पण, ज्या दोन-तीन संस्था अस्तित्वांत होत्या, त्यांच्या संमेलनांना किंवा वादसभांना अप्पासाहेब अध्यक्ष आणि परीक्षक अशा बहुधा दोन्ही नात्यांनीं हजर असत. शिवाय श्रीमान् शंकरगिरी किंवा इतर गुलहौशी नागरिक यांच्याकडे ज्या गायनवादनाच्या बैठकी मधून मधून होत, त्याहि ते चुकवीत नसत.

त्यांचें कुटुंबवात्सल्य त्यांच्या घरांत पाऊल ठेवल्याबरोबर नजरेस पडत असे. मीं 'कुटुंबवात्सल्य' हा व्यापक शब्द मुद्दामच योजिला आहे. कारण त्यांची वात्सल्यभावना आणि प्रेम हीं स्वतःचीं मुलें किंवा पत्नी यांच्या-पुरतीच मर्यादित नव्हतीं; तर वडील, आई आणि धाकटा भाऊ यांच्यावरहि त्यांचें तितकेंच उत्कट प्रेम असल्याचें मीं पाहिलें होतें. १९२७ सालच्या मे

महिन्यांत मी पुण्यास गेलों असतां, मला त्यांनीं सपत्नीक जेवावयाला बोलाविलें. आम्हांला जावयाला थोडा उशीर झाला. मीं दारांत पाऊल ठेवल्याबरोबर अप्पासाहेब किंचित् नाराजीनेंच उद्गारले, "मी तुमच्या-साठीं वाटेल तितका वेळ थांबलों असतों; पण आईला किती वेळ तिष्ठत ठेवायची हो!" वडिलांशीं ते जितक्या विनयानें वागत, तितक्याच वात्सल्यानें ते आपल्या धाकट्या भावाशीं वागत असत. आपल्या आई-वडलांविषयीं बोलतांना त्यांचा प्रत्येक शब्द जणूं भक्तिभावानें ओथंबून येत असे. 'अटकेपार' या कादंबरींतील श्रीधर आणि लक्ष्मीबाई यांचीं हृदयंगम शब्दचित्रें वाचतांना माझ्या डोळ्यांपुढें त्यांचे उग्रदर्शन वडील आणि प्रेमळ मातुश्री यांच्या मूर्ति उभ्या राहिल्या! आपल्या धर्मशील वडिलांना मरणसमयीं दुखण्यापायीं ज्या यातना सोसाव्या लागल्या, त्यांमुळें आपली देवावरील श्रद्धा उडाली असे उद्गार त्यांनीं एकदां मजजवळ काढल्याचें आठवतें. हे उद्गारहि त्यांच्या वडिलावरील नितान्त भक्तीचे द्योतक आहेत.

पण त्यांच्या घरांत पाऊल ठेवतांच जें प्रेमळ दृश्य नजरेस पडे, तें अर्थातच त्यांच्या अपत्यवात्सल्याचें. ते नागपुरास असतांना त्यांचीं मुलें अगदीं लहान होतीं; व त्यांच्या बैठकीच्या जागींच मुलांचा धुडगूस दिवसभर चालूं असावयाचा. एकीकडे मुलें खेळत आहेत, दंगा-मस्ती करीत आहेत किंवा खेळांत सामील होण्यासाठीं अप्पासाहेबांना सारखा त्रास देत आहेत आणि त्यांच्या त्या गलक्यांतच अप्पासाहेबांचें वाचन किंवा लेखन चालू आहे, अशा प्रकारचीं दृश्यें मीं अनेकदां बघितल्याचें आठवतें. गेल्या जानेवारींत मी कोल्हापुरास त्यांच्या घरीं गेलों असतां, आतां मोठ्या झालेल्या मुलांशीं मी त्यांचे जे संबंध पाहिले, तेहि मला अत्यंत मोकळेपणाचे वाटले. ते संततिनियमनाचे पुरस्कर्ते असूनहि त्यांना स्वतःला त्या मानानें बरींच मुलें आहेत. त्यावरून मीं त्यांची एकदां थट्टा केली असतां ते मला म्हणाले, "संततिनियमन म्हणजे नियमानं संतति!" ज्याच्या स्वतःच्या मनाचें शैशव आणि यौवन कायम राहिलेलें असतें, तोच मनुष्य आपल्या मुलांशीं समरस होऊं शकतो; त्यांचा स्नेह आणि विश्वास संपादन करूं शकतो. प्रो. फडके यांचे स्वतःच्या मुलांशीं असलेले मोकळेपणाचे प्रेमळ संबंध हे त्यांच्या मनाचें तारुण्य अद्याप कायम असल्याचे निदर्शक आहेत.

अप्पासाहेबांची व्यासंगी वृत्ति आणि त्यांचा कष्टाळूपणा हे दोन्ही गुण ते नागपुरास असतांना पावलोपावलीं माझ्या अनुभवाला आले. त्यांच्या लोकप्रियतेच्या आजच्या उधाण भरतीची पहिली लाटहि त्या वेळीं आलेली नव्हती. 'रत्नाकर' अद्याप निघावयाचा होता आणि 'कुलाब्याची दांडी'हि प्रसिद्ध व्हावयाची होती. त्या काळांत त्यांचा लेखनापेक्षां वाचनावर भर जास्त होता; व माझी आठवण जर चुकत नसेल, तर त्यांचें 'युगांतर' हें नाटक त्या वेळीं लिहिलें जात होतें. टॉल्स्टॉय, हार्डी आणि रोमां रोलां यांचें वाङ्मय याच दिवसांत त्यांनीं वाचलें व त्यांच्या कादंबऱ्यांच्या गुणावगुणांची चर्चाहि आम्ही नेहमीं करीत असूं. उन्हाळा सुरू झाल्यावर कपाळावर थंड पाण्याची पट्टी ठेवून ते वाचीत किंवा लिहीत असावयाचे. स्वतःच्या वेळेच्या बाबतींत ते अत्यंत काटकसरी आणि कठोरहि आहेत. नागपूरच्या एका वृद्ध विमा-एजंटाला त्यांनीं गॅलरींतूनच उत्तर दिलें होतें कीं, "तुम्ही जिना चढण्याची तसदी घेऊं नका! मला तुमच्याशीं बोलायला वेळ नाहीं!," त्यांची अभिरुचि अतिशय सूक्ष्म आणि तीक्ष्ण आहे; व त्यांना एका विशिष्ट प्रकारचींच माणसें आवडतात. त्यामुळें त्यांच्या या काटेकोर अभिरुचीला न उतरण्यासारख्या एखाद्या माणसाला घेऊन मी क्वचित् त्यांच्या घरीं गेलों, म्हणजे माझीहि बोळवण घड्याळाच्या कांट्याकडे बघून केली जात असे!

या माझ्या आठवणी सोळा वर्षांपूर्वीच्या आहेत. बर्नार्ड शॉनें असें म्हटलें आहे कीं, 'सोळा वर्षांत मनुष्य दोन वेळां कांत टाकतो!' प्रो. फडके यांच्यांतहि अलीकडे पुष्कळ बदल झाला असावा. पण, त्यांच्या ज्या स्वभाव-विशेषांचें ओझरतें वर्णन मीं या आठवणींत केलें आहे, त्या विशेषांच्या मनोज्ञ छटा त्यांच्या कादंबऱ्यांत प्रतिबिंबित झालेल्या निःसंशय आढळतील.

नवयुग, ५ मे १९४०

# मीं शेगांवला काय पाहिलें? : : ३

शेगांवला जाण्याची उत्कट इच्छा जी मला एकाएकीं झाली, ती नीरा-प्रकरणामुळें गाजलेला खजुरीकुंज पाहण्यासाठीं; गांधीजींचें दर्शन घेण्यासाठीं किंवा त्यांचा आश्रम बघण्यासाठीं नव्हे. पण, शेगांवहून परत येतांना माझ्या मनावर जो संस्कार शिल्लक उरला, तो मात्र पहाटेच्या अंधुक प्रकाशांत बघितलेल्या खजुरीकुंजाचा किंवा तेथें केलेल्या नीरापानाचाहि नव्हे; तर गांधीजींच्या वैचित्र्यपूर्ण माहात्म्याचा!

गांधीजींचें सान्निध्य अनुभविण्याचा तो कांहीं माझा पहिलाच प्रसंग नव्हता. १९२१ सालच्या जुलैमध्यें पहिल्या टिळक पुण्यतिथीसाठीं गांधीजी हे, सौ. सरोजिनी नायडू आणि मौ. महमदअली यांच्यासह, पुण्यास आले असतां त्यांचा मुक्काम श्री. तात्यासाहेब केळकर यांच्याकडे त्या वेळीं होता; व मीहि श्री. केळकर यांच्याजवळ तेव्हां राहत असल्याकारणानें, त्या दिवशीच्या त्या साऱ्या धावपळींतहि गांधीजींच्या व्यक्तित्वाच्या ओझरत्या छटा मला बऱ्याच पाहावयाला मिळाल्या. त्यानंतर तीन वर्षांनीं अॅपेंडिसायटिसच्या शस्त्रक्रिये-निमित्त पुण्याच्या ससून हॉस्पिटलमध्यें त्यांचा मुक्काम असतांना डॉ. झकरायस

यांच्याबरोबर मी दोन-तीन वेळां त्यांच्याकडे गेलों होतों. पण शेगांवला त्यांच्या आश्रमांत तीन तास घालविल्यावर त्यांच्या व्यक्तित्वाची जी कांहीं जाणीव माझ्या मनाला झाली, ती जितकी चमत्कारिक तितकीच अपूर्वहि होती.

ता. ३ सप्टेंबर रोजीं दुपारीं शेगांवला जाण्यासाठीं जेव्हां मी मोटारींत बसलों, तेव्हांच मीं मनाशीं असा निश्चय केला होता, कीं गांधीजींच्या ज्या प्रार्थनेचें एवढें वर्णन बार्नेसपासून तों लोथियनपर्यंत अनेक प्रमुख पाश्चात्यांनीं केलें आहे तिला हजर राहावयाचें; व हा माझा निश्चय सुदैवानें सफळहि झाला. सुदैवानें म्हणण्याचें कारण असें, कीं वर्ध्याला पोंचल्यावर रात्रीं जेव्हां मीं गांधीजींच्या प्रार्थनेबद्दल चौकशी केली, तेव्हां मला असें कळलें, कीं सकाळची प्रार्थना पहाटे चारच्या सुमाराला होते. पावसाळ्याच्या दिवसांत अंधारांतून त्या कच्च्या रस्त्यानें पांच मैलांवर असलेल्या शेगांवला जावयाचें म्हणजे खरोखरी ती तपश्चर्याच होती एक. पण मोटारीच्या साहाय्यानें तीहि तपश्चर्या आम्हीं कशीबशी पार पाडली; व पहाटे बरोबर चार वाजतां माझ्या चार मित्रांसह मी शेगांवच्या आश्रमांत येऊन दाखल झालों. आश्रमाच्या आवारांत शिरल्याबरोबर आम्ही सरळ, गांधी ज्या प्रशस्त झोपडीवजा घरांत राहतात, तिथें गेलों; व ओवरींत जाऊन बसलों. गांधीजी आपल्या अंथरुणावर बसून कंदिलाच्या प्रकाशांत लिहीत होते. त्यांनीं एकवार आमच्याकडे दृष्टिक्षेप केला; व पुन्हा लिहावयाला सुरुवात केली. कंदिलाच्या अंधुक प्रकाशांत त्यांची ती कुरूप, जराग्रस्त, शरीराला जागोजाग सुरकुत्या पडलेली मूर्ति पाहून माझ्या मनांत त्या वेळीं तरी उबग उत्पन्न झाला. आदर वाटला, तो फक्त त्यांच्या उद्योगशीलतेबद्दल. विशेषतः त्यांच्या अंथरुणाच्या आसपास पसरलेल्या पथाऱ्यांवर निद्रासुख अनुभवीत असलेलीं माणसें बघितल्यावर तर, त्यांच्या त्या ब्राह्ममुहूर्तावर चाललेल्या लेखनाविषयीं कोणालाहि कौतुकच वाटलें असतें. आम्ही बसून पांच मिनिटें होतात न होतात, तोंच पंचा नेसलेले एक गृहस्थ आमच्याजवळ आले; व त्यांनीं आम्हांला उठवून चटया घातल्या.

त्या चटयांवर आम्ही बसणार, तोंच गांधीजींनीं लाकडी चमचा भांड्यांत खडखडावून आवाज दिला. प्रार्थनेची घंटा होती ती! ती झाल्याबरोबर जवळच्या झोपड्यांतून कांहीं व्यक्ति बाहेर पडून जांभया देत देत ओवरींत

आल्या व प्रार्थनेला सुरुवात झाली. आमच्याशिवाय जीं आठ-नऊ माणसें प्रार्थनेला हजर होतीं त्यांत पुरुष निम्मेहि नव्हते. तरुणींचा भरणाच जास्त होता; व त्या गांधींच्या बिछान्यालगत घातलेल्या चटईवर भिंतीला टेकून बसल्या होत्या. प्रार्थनेची ही पूर्वतयारी झाल्याबरोबर गांधींनीं एकदम आपल्या समोरचा कंदील उचलून खालीं अंगणांत ठेवला. त्यामुळें ओवरींत काळोख पडून कोणाचाहि चेहरा चांगल्या रीतीनें दिसणें अशक्य झालें. पण सौ. कस्तूरबा आणि कु. मिराबेन या दोघीहि प्रार्थनेला हजर नव्हत्या, हा चमत्कारिक प्रकार मात्र त्या अंधारांतहि आमच्या पुरतेपणीं लक्षांत आला!

गांधींच्या अगदीं जवळ उजव्या हाताला बसलेल्या एका धवलवसना श्यामलेच्या कंठांतून तुलसीदासाच्या भजनाचे सूर बाहेर पडले व लगेच इतरांचा सुस्त बेसूर कंठरव त्यांत मिसळला! गांधीजी मात्र, बहुधा मौनामुळें, स्तब्ध होते.

तें भजन चालू असतांनाच माझ्याबरोबर वर्ध्यास राहणारे जे आमचे खादी-धारी स्नेही आले होते त्यांना मीं हळूच विचारलें, "का हो, या बाई कोण?"

"डॉ. सुशीला नायर!—" त्यांनीं उत्तर दिलें.

प्रार्थनेचें नेतृत्व डॉ. सुशीला नायर यांच्याकडेच होतें. कारण, त्या ज्या श्लोकाला, भजनाला किंवा स्तोत्राला प्रारंभ करीत, त्याला इतर मंडळी साथ देत असत; व गीतेचे अध्याय तर बहुंशीं त्यांनीं एकट्यांनींच वाचले. त्यांचा आवाज कांहीं सुरेल म्हणतां येणार नाहीं. शिवाय, प्रार्थनेच्या वेळीं थोड्याबहुत प्रमाणांत त्यांच्यासकट सारीच मंडळी जांभया देत असल्यामुळें व पहाटे आवाजाला येणाऱ्या एक प्रकारच्या घोगरेपणामुळेंहि सुरेलपणाबरो-बरच गांभीर्याचाहि अभाव—निदान आम्हांला तरी—त्या प्रार्थनेंत दिसून आला. त्यांतच पुन्हा बाईच्या अशुद्ध संस्कृत उच्चारांची आणि वाचनाची भर. मला तर त्यांचें तें अशुद्ध संस्कृतवाचन अगदीं दुःसह झालें. त्यापेक्षांहि गमतीची गोष्ट ही कीं, प्रार्थना चालू असतांनासुद्धां गांधीजी मधून मधून लिहीत होते आणि तेंहि दोन्ही हातांनीं! मला तो प्रकार पाहून अंधारांत शब्दवेध करणाऱ्या अर्जुनाच्या सव्यसाचित्वाची आठवण झाली. त्या शुभ्रवेषधारी तरुणी, ते पंचे नेसलेले तीनचार व्रती आणि त्या दोन रांगांच्या

अग्रभागीं बसलेला तो वृद्ध लिखाणपुरुष !—माझ्या मनांत आलें, बुद्ध-विहारांतील सांघिक प्रार्थनेचें दृश्य असेंच असेल काय ?

अशा प्रकारची ती प्रार्थना, मला वाटतें, अर्धा तास चालली असावी. ती संपून मंडळींची पांगापांग झाल्यावर गांधीजींचें डॉ. सुशीला नायर यांच्याशीं थोडेंसें लेखी संभाषण झालें; व त्यांनीं पुन्हा बिछान्यावर देह टाकला. नंतर बाईनीं गांधीजींची नाडी पाहिली, उष्णतामान घेतलें व रक्तदाबहि तपासला. वैद्यकीय तपासणीचा हा विधि उरकल्यावर बाईनीं आणखी एका तरुणीच्या सहकारितेनें त्यांची शरीरसेवा करावयाला सुरुवात केली. तेव्हां आम्ही तिथून उठलों; व गांधींच्या त्या जगद्विख्यात शेळीचें दर्शन घेतलें. वसिष्ठ ऋषींची जशी नंदिनी, तशी गांधींची ही शेळी ! त्यांनीं तिला काय नांव ठेवलें आहे, हें मला माहीत नाहीं. पण अद्याप ठेवलें नसलें, तर 'कॉँग्रेस' हें नांव तिला ठेवणेंच समर्पक होणार नाहीं काय ? तसें केल्यास 'शेळीचे कान गोसाव्याच्या हातीं' ही म्हण अक्षरशः खरी ठरेल !

काळोख अजून बराच होता; व गांधींजीहि निजले होते. म्हणून आम्हीं खजुरीकुंजांत जाण्याचें ठरविलें. गांधींच्या आश्रमापासून शेगांव सुमारें अर्धा मैल असून खजुरीकुंज गांवाच्या पलीकडे सुमारें अर्ध्या मैलावर आहे. आश्रम जितका स्वच्छ तितकेंच गांव गलिच्छ वाटलें. 'खजुरीकुंज' असें मोठें मोहक नांव ज्या या जागेला देण्यांत आलें आहे, तिच्यावर ताडीची कांहीं पद्धतशीर लागवड केली आहे असें नाहीं. पूर्वीपासून जीं झाडें तिथें अस्ताव्यस्त वाढलेलीं आहेत, त्यांच्यापासून ताडी काढण्यांत येते एवढेंच. या ताडीपासून गूळ तयार करण्यासाठीं एक गांवठी कारखाना, मातीची कच्ची इमारत बांधून, तींत काढण्यांत आला आहे. या कारखान्याचे व्यवस्थापक श्री. गजाननराव नाईक हे आम्हांला गूळ तयार करण्याची प्रक्रिया समजावून सांगत असतांनाच ताज्या ताडीचीं म्हणजे नीरेचीं मडकीं तिथें आलीं. आम्हीं लगेच त्यांना चव घेण्यापुरती नीरा आम्हांला देण्याची विनंति केली, व त्यांनींहि ती सौजन्यपूर्वक मान्य केली. प्रथम ते स्वतः पेला दोन पेले नीरा प्याले. नंतर आम्हांला मागितली तेवढी नीरा त्यांनीं सढळ हातानें दिली. त्यांनीं दिलेल्या ताडीच्या गुळाच्या क्षारयुक्त चिपा खातांना आमच्यापैकीं एकानें चॉकोलेटची आठवण काढली. नीरेचें तें इच्छाप्राशन करीत असतांना

श्री. काकासाहेब कालेलकर यांच्यासारख्या रसज्ञ पुरुषानें तिला दिलेल्या कोर्ल्ड्रिकच्या मार्मिक उपमेचें स्मरण न होणें अशक्य होतें!

खजुरीकुंजांतून आम्ही आश्रमांत परत येतों न येतों, तोंच गांधीजी एका छत्रधारिणीसह झपाट्यानें पावलें टाकीत फिरावयाला जात असलेले आमच्या दृष्टीस पडले. आतां चांगलेंच उजाडलें होतें. म्हणून आम्हीं आश्रम पाहण्याचें ठरविलें. गांधीजींच्या मृत्तिकागृहाशीं आम्ही आल्याबरोबर पतिदेवाचें अंथरूण गुंडाळीत असलेल्या सौ. कस्तूरबा आमच्या दृष्टीस पडल्या. गांधींचें सान्निध्य आणि शरीरसेवा ही त्यांच्या या वृद्ध, अशिक्षित सहधर्मचारिणीच्या ऐवजीं तरुण विद्याविभूषित शिष्यिणींच्या वाट्याला आलेली आम्ही पहाटेपासून पाहतच होतों. त्यामुळें 'बा' ना, गांधींजी आपल्या शिष्येसह फिरावयास गेल्यानंतर, त्यांचें अंथरूण काढतांना पाहून मला काउंटेस टॉलस्टॉय हिच्या रोजनिशीची आठवण झाली. 'बा' सुशिक्षित नाहींत, हें खरोखरीच जगाचें दुर्दैव होय. नाहीं तर गांधींनीं गुरु मानलेल्या टॉलस्टॉयच्या त्या पत्नीनें स्वतः-ची रोजनिशी लिहून आपल्या जगद्वंद्य पतीच्या आंतरजीवनावर जसा विदारक प्रकाश पाडला, तशी 'बा'नींहि महात्माजींच्या सत्याच्या प्रयोगांची त्यांना जाणवलेली बाजू जगापुढें मांडली असती. तेथून आम्ही थोडे पुढें जातों, तोंच एक मुंडण केलेली, शुभ्रवस्त्रधारी उंच व्यक्ति ओवरींत खाटेवर निजलेल्या जपानी इसमाशीं बोलत उभी असलेली दिसली. आम्ही जवळ जातांच त्या व्यक्तीनें आमच्याकडे तोंड वळविलें तत्क्षणींच माझ्या लक्षांत आलें,—याच त्या सुप्रसिद्ध मिराबेन! तरुण स्त्रीचें वपन करून तिला आपल्या सेवेला ठेवावयाची हा तरी एक मनोविकृतीचाच प्रकार नव्हे काय? मिराबेनचें तें भादरलेलें उघडें डोकें म्हणजे संयमाच्या गांधीप्रणीत विकृत कल्पनेचें मूर्तिमंत प्रदर्शनच होय!

आश्रम पाहत असतांना तेथील वातावरणाचा जर कोणता एक विशेष मला तीव्रतेनें जाणवला असेल, तर तो म्हणजे बहुतेक आश्रमवासीयांचीं दुबळीं शरीरें आणि सुतकी चेहरे हा होय. ऐन ज्वानींत पोक आलेले हडकुळे तरुण आणि तोंडावर दाट लव वाढलेल्या रोड तरुणी!—विल्यम मॅक्डुगल आणि हॅवेलॉक एलिस यांनीं मनोविश्लेषणाची प्रयोगशाळा उघडावयाला हरकत नाहीं या आश्रमांत! शिष्यिणींना पत्रें घालून स्वतःच्या स्खलनांची

पुनः पुन्हा चर्चा करण्याच्या गांधींच्या अवचट हव्यासापासून स्फूर्ति घेऊन जर त्यांच्या आश्रमांत राहणाऱ्या या गलितगात्र व्यक्तींनीं आपले लैंगिक अनुभव प्रामाणिकपणानें प्रसिद्ध केले, तर एलिसच्या लैंगिक प्रश्नावरील ग्रंथ-मालेचा एक पुरवणीखंडच होईल तो! आश्रमांतील या साऱ्या दुर्बलतेचा आणि उदासीनतेचा वचपा शिष्यिणींच्या तैनातींत आनंदानें काळ कंठणाऱ्या गांधींच्या लालबुंद शरीरानें आणि निर्भर हास्यानें दामदुपटीनें भरून काढला आहे, हें मात्र कबूल केलें पाहिजे. त्याचप्रमाणें वर्ध्याच्या बाहेर शेगांवच्या वाटेवर असलेल्या हरिजन बोर्डिंग, महिलाश्रम, ग्रामोद्योग संघ वगैरे संस्थां-तील व्यक्तींचीं पुष्ट शरीरें आणि प्रसन्न चेहरे यांचाहि उल्लेख करणें जरूर आहे. कदाचित् गांधीजींपासून दूर आणि जमनालालजींच्या जवळ राहिल्या-चाहि तो परिणाम असावा! वर्धा शहराच्या आंत आणि बाहेर पसरलेल्या जमनालालजींच्या जिंदगीचा हा महात्म्याच्या कृपेनें नाममात्र सार्वजानिक स्वरूप पावलेला अफाट विस्तार पाहत असतां माझा एक वर्धावासी मित्र उद्गारला, "शेठजींचा हा सारा व्याप गेल्या अठरा वर्षांत वाढला आहे बरं!" हे त्याचे उद्गार ऐकून मला गांधीजींची महात्मेगिरी आणि जमनालालजींची खजीन-दारी यांपैकीं कशाचें अधिक कौतुक करावें हें समजेना!!

आश्रमाचा दुसरा गौण पण एका परीनें उल्लेखनीय विशेष म्हणजे गांधींच्या निवासस्थानीं आढळलेला वृत्तपत्रांचा अभाव. मागाहून चौकशी केल्यावर मला असें कळलें, कीं वर्ध्याहून रोज सकाळीं श्री. महादेव देसाई शेगांवला येतात व ते जीं वृत्तपत्रांचीं कात्रणें देतील तेवढींच फक्त गांधी वाचतात. याशिवाय हिंदुस्थानांतील बहुतेक प्रमुख कार्यकर्त्यांशीं गांधींचा खाजगी पत्र-व्यवहार असल्यामुळें त्याहि मार्गानें त्यांना माहितीचा पुरवठा होतो. हा प्रकार कळल्यावर 'हरिजन'मध्यें जें एकतर्फी आणि पक्षपाती लिखाण अलीकडे सारखें येत असतें, त्याचा मला एकदम उलगडा झाला. खात्यांच्या कार्यवाहांनीं पुरवलेल्या गाळीव माहितीवर विसंबून गव्हर्नर ज्याप्रमाणें निर्णय किंवा अभिप्राय देतो, त्यांतलाच हाहि प्रकार नव्हे काय? आणि गांधींच्या लिखाणाची ही पार्श्वभूमि माहीत असल्यामुळेंच तर त्रावणकोरचे दिवाण सर रामस्वामी अय्यर यांनीं त्यांच्या न्यायबुद्धीबद्दल निराशेचे उद्गार काढले नसतील ना? एरवीं मद्रास प्रांतांतील आपल्या पट्टशिष्याच्या फर्मानशाहीची नंगी तरफदारी

करणारा हा महात्मा त्या प्रांताशेजारच्या त्रावणकोरच्या दिवाणाला माल दडपशाही थांबविण्याचा उपदेश करण्याचा विसंगतपणा कां करता ?

अशा रीतीनें आश्रम पाहून आम्ही परत फिरतों न फिरतों, तोंच आमच्या मोटारीपासून अर्ध्या फर्लांगाच्या अंतरावर गांधीजी फिरून परत येत असलेले आमच्या दृष्टीस पडले. लगेच आम्ही खालीं उतरलों; व त्यांच्या जवळ गेलों. त्या वेळीं जें दृश्य मीं पाहिलें तें माझ्या मनःफलकावरून कधींहि लोपून जाणार नाहीं. हातांत स्वतःपेक्षां हातभर उंच असलेली काठी घेतलेले गांधीजी झपाझप पावलें टाकीत होते; व पावसाची बुरबुर चालू असल्यामुळें त्यांच्यावर छत्री धरणारी ती त्यांची शिष्या त्यांच्या मागून जणूं धावत होती. ती त्यांच्याशीं एकसारखी कांहीं तरी बोलत होती; व हा मौनी गुरु हसून, माना हलवून किंवा हातवारे करून तिला उत्तरें देत होता !

त्या दोघांच्या अगदीं जवळ गेल्यावर माझ्या लक्षांत आलें, कीं महात्म्याच्या मागून पावसांतून चिखल तुडवीत अनवाणी धावत असलेली ती छत्रधारिणी शिष्या म्हणजे कपूरथळ्याची राजकुमारी अमृतकुंवर होती. नागपूर येथें गेल्या डिसेंबरमध्यें भरलेल्या महिला परिषदेच्या वेळीं मीं राजकुमारीला पाहिली होती. तीच ही तेव्हां अध्यक्षपदीं विराजमान झालेली राजीवलोचना राजकुमारी आज त्या मनस्वी महापुरुषाच्या मागून मंत्रमुग्ध झाल्याप्रमाणें निस्संकोच धावत होती ! तें विचित्र पण विलोभनीय दृश्य पाहून, 'स्त्रिया या प्रभावपूजक असतात', हें बायरनच्या एका पत्रांतील मार्मिक वाक्य आठवलें मला !

शेगांवची जेव्हां जेव्हां मला आठवण होते, तेव्हां तेव्हां पावसांतून झपाझप चालत असलेला तो अर्धनग्न महात्मा आणि त्याचें अंग भिजूं नये म्हणून छत्री घेऊन त्याच्या मागून धावत असलेली ती मुक्तकेश राजकुमारी माझ्या डोळ्यांपुढें उभी राहते !

चित्रा, सप्टेंबर १९३८

---

# डॉ. खरे आणि डॉ. राघवेंद्र राव : : ४

" डॉ. खरे आणि डॉ. राव या दोघांशीं एकाच वेळीं तुमचे इतके निकट संबंध असावेत, हें आश्चर्य आहे खरोखरी !—"

'महाराष्ट्र' कचेरींतील माझ्या एका सहकाऱ्यानें मला म्हटलें. या उद्गारांतील खोंच अगदीं उघड होती.

डॉ. खरे आणि डॉ. राव हे परवां-परवांपर्यंत एकमेकांचे प्रतिस्पर्धी किंबहुना प्रतिपक्षी समजले जात असत. फार कशाला, गेल्या वर्षी मार्चच्या पहिल्या आठवड्यांत त्या वेळीं मुख्य प्रधान असलेले डॉ. खरे यांच्याविषयीं 'a disgruntled assistant surgeon' असा अनुचित शब्दप्रयोग केल्याबद्दल आणि तो परत घेतांना जरूर ती दिलगिरी व्यक्त न करण्याचा हटवादीपणा दाखविल्याबद्दल मध्यप्रांतीय कायदेमंडळाचे अध्यक्ष ना. घनश्यामसिंग गुप्ता यांनीं डॉ. राव यांना सभागृहांतून बाहेर काढून दिलें होतें. त्याचप्रमाणें 'महाराष्ट्रा'चे मुख्य संपादक श्री. दादासाहेब ओगले यांच्याशींहि डॉ. राव यांचे संबंध गेलीं दहा बारा वर्षें सलोख्याचे नव्हते; व सोलापूर प्रकरणीं

लिहिलेल्या एका उपाग्रलेखाच्या निमित्तानें श्री. ओगले यांच्यावर जो राजद्रोहाचा खटला १९३१ सालीं याच दिवसांत भरण्यांत आला, तो त्या वेळीं गृहमंत्री असलेल्या डॉ. राव यांच्या 'महाराष्ट्र'वरील अवकृपेचाच परिपाक होता, हें प्रसिद्धच आहे.

पण कालगति अशी विचित्र कीं, ता. २४ मार्च १९३९ रोजीं डॉ. राव यांना नागपूरच्या नागरिकांतर्फे महाराजबागेंत जो बादशाही उपाहार देण्यांत आला, त्याला डॉ. खरे आणि श्री. ओगले हे दोघेहि हजर होते; व त्यांच्या या उपस्थितीबद्दल डॉ. राव यांनींहि मनःपूर्वक समाधान व्यक्त केलें. इतकेंच नव्हे, तर त्यानंतर पंधरा दिवसांनीं डॉ. राव हे पुन्हा नागपुरास आले असतां डॉ. खरे आणि श्री. ओगले या दोघांनाहि अनाहूतपणें त्यांच्या घरीं जाऊन भेट देऊन, त्यांनीं दाखविलेल्या सौजन्याची डॉक्टरसाहेबांनीं परतफेड केली. याचा अर्थ असा मात्र खचित नव्हे कीं, डॉ. खरे, श्री. ओगले आणि डॉ. राव हे आज राजकीय मतांच्या दृष्टीनें समान भूमिकेवर आले आहेत. पण मतभेद हा गुणग्रहणबुद्धीच्या आड नेहमींच येतो, असें नाहीं. सार्वजनिक जीवनांतील कारणपरत्वें उत्पन्न होणाऱ्या वैमनस्याची धार जी कालांतरानें बोथट होते, तिचेंहि मर्म झालें तरी हेंच होय. डॉ. खरे यांच्या चारित्र्याची डॉ. राव हे जितक्या मुक्तकंठानें प्रशंसा करितात, तितक्याच मुक्तकंठानें डॉ. राव यांच्या कर्तृत्वाची प्रशंसा करितांना डॉ. खरे यांना मीं पाहिलें आहे.

अर्थात् डॉ. खरे आणि डॉ. राव यांच्याशीं एकाच वेळीं माझा निकट संबंध असावा, यांत वस्तुतः नवल मानण्यासारखें कांहींच नाहीं.

## ( १ )

डॉ. खरे यांच्याशीं माझा निकट संबंध १९३० सालच्या सप्टेंबरमध्यें आम्ही नागपूरच्या तुरुंगांत असतांना आला. तत्पूर्वी मी त्यांना कै. बॅ. अभ्यंकर यांच्याबरोबर 'महाराष्ट्र' कचेरींत अनेकदां पाहिलें होतें. पण, बॅरिस्टरसाहेबांच्या व्यक्तित्वाचा प्रभाव इतका कांहीं जबरदस्त होता कीं, त्यांचा

सहकारी मनुष्य हा कितीहि गुणी असला, तरी त्यांच्या सान्निध्यांत असतांना त्याची अवस्था विजेच्या झगझगीत दिव्याजवळ ठेवलेल्या हरिकेन कंदिला-सारखी होत असे. अभ्यंकरांचें नेतृत्व डॉ. खरे यांनीं इतकें कांहीं निष्ठेनें शिरोधार्य मानलें होतें कीं, ते हयात असेपर्यंत राजकीय क्षेत्रांत डॉक्टर-साहेबांना स्वतंत्र असें अस्तित्व मुळीं नव्हतेंच; व आपली पक्षातीत, व्यक्तिगत लोकप्रियता हा अभ्यंकरांच्या नेतृत्वाचा केवढा भक्कम आधार आहे, याचीहि जाणीव त्यांना नव्हती. त्यांच्या या निष्ठेचा एक प्रसंग मला चांगला आठवतो. डॉ. हेडगेवार यांचा राष्ट्रीय स्वयंसेवकसंघ आणि नागपुरांतील कॉंग्रेस पक्ष यांच्यांतून विस्तव जात नव्हता. तरीसुद्धां डॉ. खरे यांनीं संघाच्या दसऱ्याच्या उत्सवाचें अध्यक्षस्थान बिनदिक्कत स्वीकारलें. अभ्यंकरांना ही गोष्ट अर्थातच रुचली नाही; व अखेर डॉ. खरे यांना कांहीं निमित्तानें त्याच दिवशीं परगांवीं पाठवून त्यांनीं तो अप्रिय प्रसंग टाळला. “डॉ. खरे हे माझे ‘खरे’ मित्र आहेत,” अशी जी एक ठरीव कोटी अभ्यंकर पुष्कळदां जाहीर सभांतून करीत ती कांहीं उगाच नव्हे!

नागपूरच्या तुरुंगांत डॉ. खरे हे एकटेच ‘अ’ वर्गाचे कैदी होते; व म्हणून बंदिवासाबरोबरच आणखी एकान्ताचीहि शिक्षा त्यांना नाहक भोगावी लागूं नये या उद्देशानें श्री. रुईकर, आचार्य धर्माधिकारी, शेठ पुनमचंद, बाबासाहेब देशमुख आणि श्री. साळवे या ‘ब’ वर्गांतील पांच बंदींना त्यांच्या बराकींत ठेवण्यांत आलें होतें. ‘क’ वर्गांतील आम्ही इतर सुमारें सत्तेचाळीस बंदी तुरुंगाच्या दुसऱ्या भागांत राहत होतों. या दोन्ही भागांतील राज-बंदींचा, तुरुंगाच्या नियमानुसार, एकमेकांशीं अर्थात्‌च कांहींहि संबंध येत नसे. पण, डॉ. खरे यांच्या बराकींत श्री. साळवे यांच्यासाठीं दर रविवारीं मांसा-हाराचें जेवण मिळण्याची जी सोय केलेली होती, तिचा फायदा घेऊन मला त्या बराकींत आणण्याच्या हेतूनें श्री. रुईकर यांनीं मला मारून मुटकून मांसा-हारी बनविलें; व अशा रीतीनें सुपरिंटेंडंटची खास परवानगी आणून दर रविवारीं मी या बराकींत जेवावयाला येऊं लागलों. आमचें हें रविवारचें जेवण म्हणजे हास्य-विनोदाची चमचमीत मेजवानीच असे. डॉ. खरे यांच्या दिल-दार आणि थट्टेखोर स्वभावाची प्रतीति याच वेळीं मला प्रथमतः आली. ते ‘अ’ वर्गाचे कैदी असल्याकारणानें त्यांना सर्वच प्रकारच्या सवलती

मिळालेल्या होत्या; व शिवाय वैद्यकीय पाहणीच्या कामांत ते सुपरिंटेंडंटला मदत करीत असल्यामुळें तुरुंगाच्या इतरहि भागांत त्यांचा संचार असे. श्री. माधवराव दातार यांची प्रकृति तपासण्याच्या मिषानें आमच्या बराकींत येऊन आमच्या-साठीं मुद्दाम खिशांतून चोरून आणलेली पुरणाची पोळी डॉक्टरसाहेबांनीं आम्हांला कशी गुपचूप दिली, याची मला अद्याप चांगली आठवण आहे!

डॉ. खरे यांच्याशीं तुरुंगांत असतांना जो हा माझा संबंध आला, तो पुढें सारखा वाढतच गेला. या संबंधाला अतिशय जिव्हाळ्याचें स्वरूप जर केव्हां आलें असेल, तर तें १९३७ सालच्या प्रांतिक कायदेमंडळाच्या निवडणुकीच्या वेळीं. बॅ. अभ्यंकर यांच्या अनपेक्षित मृत्यूमुळें मराठी मध्यप्रांताच्या नेतृत्वाची जबाबदारी अचानक डॉ. खरे यांच्या शिरावर पडली. वस्तुतः उण्यापुऱ्या चार जिल्ह्यांच्या चिमुकल्या प्रांताचें हें पुढारीपण. पण ब्राह्मण-ब्राह्मणेतर आणि हिंदी-मराठी या दोन वादांमुळें या नेतृत्वाचा मूर्धाभिषेक म्हणजे नागपूरच्या पहिलवानी वातावरणांत एक प्रकारचा रुधिराभिषेकच होऊन बसला होता. बॅ. अभ्यंकर यांच्यासारख्या जिद्दी आणि झुंजार सेनानीचेंहि मरण या अंतः-कलहामुळेंच एका परीनें जवळ आलेलें. तेव्हां त्या मानानें किती तरीच कमी कणखर आणि अत्यंत सरळ स्वभावाचे असलेले डॉ. खरे हे नागपूर-च्या राजकारणाची धुरा कशी काय सांभाळून नेतात, याबद्दल सर्वांचींच मनें सांशक होतीं. संघटनचातुर्य, मुत्सद्देगिरी आणि वक्तृत्व हे अव्वल दर्जाच्या पुढारीपणाला अवश्य असलेले गुण त्यांच्या ठिकाणीं जवळ जवळ नाहींतच. त्यांची सारी भिस्त त्यांचें निर्मल चारित्र्य, कोणाच्याहि उपयोगी पडण्याची निरपेक्ष प्रवृत्ति आणि या दोन गुणांमुळें लाभलेली असाधारण लोकप्रियता यांच्यावर होती. मध्यप्रांत-वऱ्हाडला मॉंटफोर्ड सुधारणा लागू होऊन प्राति-निधिक कायदेमंडळें अस्तित्वांत आल्यापासून ज्या ज्या निवडणुकीला ते उभे राहिले, तींत त्यांनीं पहिल्या नंबरचीं मतें मिळवून विजय संपादन केलेला आहे. आपल्या या लोकप्रियतेची त्यांना इतकी खात्री कीं, गेल्या निवडणुकींत मत-दानकेंद्रांची पाहणी करीत हिंडत असतां ते प्रत्येक ठिकाणीं गेल्याबरोबर फक्त एकच प्रश्न विचारीत—"काय, मला सपाटून मतें पडताहेत ना?" (Am I polling heavily?) आणि या लोकप्रियतेनेंच त्यांचें पुढारीपण केवळ निभावूनच नव्हे, तर शोभवूनहि नेलें. मराठी मध्यप्रांत, वऱ्हाड आणि

हिंदी मध्यप्रांत या तिघांच्याहि संयुक्त पार्लमेंटरी बोर्डाचे जेव्हां ते अध्यक्ष निवडून आले, तेव्हां त्यांच्या मस्तकावर हा कांटेरी मुकुट घातला गेला आहे, असें वर्णन 'महाराष्ट्रां'त आलें होतें. निवडणुकींतील त्यांच्या एकंदर यशामुळें त्या वेळीं तरी लोकांना तो सुवर्णमुकुट असल्याचाच भास झाला; व 'महाराष्ट्रां'त स्वतः केलेल्या त्या वर्णनापेक्षां "डॉक्टरसाहेब मोरूभाऊंसारखे कमनशिबी नाहींत, ते दैववान् आहेत" हें माधवराव दातारांचें विधान मलाहि तेव्हां मान्य करावेंसें वाटलें.

पण अखेर तो मुकुट कांट्यांचाच ठरला. आणि त्याला कारण आपलें निष्कलंक चारित्र्य आणि तज्जन्य लोकप्रियता यांच्याविषयीं डॉ. खरे यांना असलेला अपरंपार अभिमानच होय. त्या अभिमानाच्या धुंदींत ते बोलूं नयेत तें बोलले, त्यांनीं धरूं नयेत तीं माणसें हाताशीं धरलीं आणि करूं नयेत त्या गोष्टी केल्या. त्यांच्या प्रांजळ स्वभावानें आणि फटकळ जिभेनें त्यांचा जितका घात केला, तितका त्यांच्या हितशत्रूंनाहि करतां आला नसता. त्यांचे त्या वेळचे प्रसिद्ध आणि विश्वस्त सहमंत्री ना. पं. द्वारकाप्रसाद मिश्रा यांनीं त्यांचे चिरंजीव डॉ. विद्याधरराव यांची नेमणूक मेयो हॉस्पिटलमध्यें ऑनररी सर्जनच्या जागेवर केली. त्या नेमणुकीबद्दल वर्तमानपत्रांतून गवगवा झाल्यानंतर डॉक्टरसाहेबांना तिचा पत्ता लागला. त्यांच्या जागीं दुसरा एखादा धूर्त मनुष्य असता, तर त्यानें ताबडतोब आपल्या मुलाला राजीनामा द्यावयाला लावून, आपल्यावर नाहक आलेल्या या वशिलेबाजीच्या आळाचें निरसन केलें असतें. किंबहुना, सध्यांचे मुख्य प्रधान ना. पं. शुक्ला यांच्या चिरंजीवांच्या लॉ कॉलेजांतील प्रोफेसरीच्या जागेवर झालेल्या नेमणुकीबद्दल जेव्हां वर्तमानपत्रांतून टीकेचा मारा सुरू झाला, तेव्हां पंडितजींनीं ताबडतोब त्याला राजीनामा द्यावयाला लावून तें वादळ तत्परतेनें शमविलें. उलट, डॉ. खरे हे उघड उघड असें म्हणत कीं, "माझा मुलगा जर या जागेला खरोखरीच पात्र आहे, तर वशिलेबाजीच्या नसत्या आरोपाला भिऊन त्यानें राजीनामा कां द्यावा?" एवढें बोलूनच ते थांबले नाहींत. आपल्या चिरंजीवांच्या नेमणुकीबद्दलचें सारें फाईल गांधीजींना दाखवून त्यांच्याहि जवळ डॉक्टरसाहेबांनीं त्या नेमणुकीची तरफदारी केली. जाफर हुसेन प्रकरणांत तर त्यांनीं कसलाच सुमार ठेवला नाहीं. त्यांचे दुसरे एक त्या

वेळचे विश्वस्त सहमंत्री ना. शरीफ यांनीं जबरीसंभोगाच्या गुन्ह्याबद्दल शिक्षा भोगीत असलेल्या जाफर हुसेनला गुपचूप माफी दिली. दयाधिकाराच्या या धादान्त दुरुपयोगामुळें सारें नागपूर चिडून उठलें. तेव्हां, डॉक्टरसाहेबांनीं, आपला सल्ला न घेतां करण्यांत आलेल्या दयेच्या त्या अप्रशस्त प्रदर्शनाबद्दल शरीफ यांना दिलगिरी व्यक्त करावयाला न लावतां, उलट त्याचें समर्थन करण्यासाठीं आपल्या मतलबी सहकाऱ्यांच्या दुर्मंत्राला बळी पडून जाहीर सभा बोलाविली. त्या सभेच्या आदल्याच रात्रीं त्यांची आणि माझी भेट झाली असतां मीं त्यांना म्हटलें, "डॉक्टरसाहेब, तुम्ही आपली लोकप्रियता असल्या भलत्याच कामांत इरेला घालूं नका!" तेव्हां ते एकदम रागावून उद्गारले, "पाहूं या, नागपुरांत माझा अपमान करण्याची कोणाची हिंमत आहे ती!" आणि, व्यक्तिशः त्यांचा उपमर्द जरी त्या सभेंत झाला नाहीं, तरी तींत झालेली जोडेफेक त्यांच्या अगदीं जिव्हारीं लागली.

आपल्या लोकप्रियतेच्या या अपरंपार अभिमानाच्या धुंदीमुळेंच ते गांधींशीं सामना द्यावयाला उद्युक्त झाले. मला वाटतें, अभ्यंकरांच्या खालोखाल जर त्यांची श्रद्धा कोणावर असेल, तर ती गांधींवर. गांधींचें तत्त्वज्ञान आणि कार्यपद्धति हीं त्यांना सर्वस्वी मान्य होतीं, असें नव्हे. पण गांधींच्या साधुत्वा-वर आणि नेतृत्वावर मात्र त्यांचा गाढ विश्वास होता. गांधींवरील ही त्यांची अनिर्वचनीय श्रद्धा, भूकंपानें एखादी प्रचंड इमारत क्षणार्धात जमीनदोस्त व्हावी त्याप्रमाणें, एका प्रसंगांत किंवा एका दिवसांत ढासळली नाहीं; तर १९३८ च्या मेमध्यें उद्भवलेल्या पचमढीच्या प्रकरणापासून ती हळूहळू ढासळावयाला प्रारंभ होऊन, गांधींनीं ज्या वेळीं आपल्या पवित्र हातांनीं तयार केलेला त्यांचा राजकीय मृत्युलेख त्यांच्यापुढें सहीसाठीं ठेवला, त्या वेळीं त्या श्रद्धेचा समूळ विध्वंस झाला. गांधींच्या साधुत्वावरील आणि नेतृत्वावरील त्यांच्या श्रद्धेचें हें मरण मीं अगदीं साक्षित्वानें पाहिलें आहे. आपल्या सहकाऱ्यांकडून आपल्याला होणारा उपद्रव आणि त्यांपैकीं एकाचीं नाना प्रकारचीं अपकृत्यें यांची माहिती गांधींच्या कानांवर घालून ते ज्या दिवशीं शेगांवहून परत आले, त्या दिवशीं रात्रीं मी त्यांना नेहमींप्रमाणें भेटावयाला गेलों असतां, ते अगदीं सुन्न होऊन बसले होते. मला त्यांनीं शेगांवला झालेलें सारें बोलणें सांगितलें आणि। "महात्माजींनीं मला सल्ला

देण्याचें नाकारलें (The Mahatma refused to give me any advice)" या वाक्यानें त्या हकीकतीचा त्यांनीं समारोप केला. त्या वेळची त्यांची मुद्रा आणि मनःस्थिति मी कधींहि विसरणार नाहीं. गांधींच्या साधुत्वावरील त्यांची बहुतेक श्रद्धा, मला वाटतें, त्या दिवशींच ढासळली; व उंदराला खेळवीत खेळवीत त्याचा प्राण घेणाऱ्या मांजराप्रमाणें आपल्याला अप्रिय झालेल्या माणसाला गोड शब्दांनीं हुलकावण्या दाखवीत गाडण्याची गांधींची जी अमानुष कला तिचा प्रत्यय त्यांना त्या दिवशींच्या भेटींत पुरेपूर आला. त्यांच्या जागीं जर दुसरा व्यवहारचतुर मनुष्य असता, तर त्यानें मुकाट्यानें गांधीगटाशीं नमतें आणि जमतें घेऊन आपली जागा कायम राखली असती. पण, महात्म्याच्या त्या अर्थपूर्ण मुग्धतेमुळें ते इतके कांहीं चिडले, कीं आपलें चारित्र्य आणि लोकप्रियता हीं दोन्ही इरेला घालून त्या निढावलेल्या मुरब्बी सत्पुरुषाशीं सामना देण्याचा त्यांनीं चंग बांधला; व ता. २२ जुलै रोजीं रात्रीं शेगांवहून राजीनामा देऊन परत आल्या-नंतर दुसऱ्या दिवशीं सकाळीं, "आतां हा माझ्या आणि गांधींच्या चारित्र्या-चा लढा आहे व त्यांत मी गांधींवर मात करीन," असे जे विलक्षण शब्द त्यांनीं आम्हां सर्वांना उद्देशून उच्चारले, त्यांत त्यांच्या एकंदर वर्तनाचें सारें मर्म साठविलेलें आहे.

तथापि, वर्किंग कमिटीची बैठक चार दिवसांवर आली असतां ती भरण्याची वाट न पाहतां स्वतः राजीनामा देऊन नवें मंत्रिमंडळ बनविण्याचें जें अचाट कृत्य त्यांनीं केलें, तें स्वतःच्या बुद्धीनें केलें नसून कोणाच्या तरी बदसल्ल्याला बळी पडून केलें, असें पुष्कळांना वाटतें. पण, आपण करीत असलेल्या या कृत्याचें स्वरूप काय आहे आणि त्याचे परिणाम काय होतील, याची जाणीव त्यांना नव्हती असें समजणें वेडेपणाचें होईल. कारण, राजीनामा दिल्यावर ता. २० रोजीं मध्यरात्रीं नवें मंत्रिमंडळ बनविण्यासाठीं जेव्हां त्यांना ना. गव्हर्नर यांचें बोलावणें आलें, त्याच्या थोडा वेळ आधीं श्री. रामराव देशमुख आणि श्री. दादासाहेब गोळे यांच्याशीं बोलतांना त्यांनीं असे उद्गार काढले होते, कीं "मी डाव टाकून चुकलों आहे. आतां जर मीं नरकांत जायचें ठरविलें, तर तुम्हांला माझ्याबरोबर यावें लागेल! (The die has been cast. Now if I choose to go to hell you

will have to accompany me.)" या त्यांच्या उद्गारांत केवढी तीव्र मनोवेदना भरलेली होती, याची कल्पना त्यांचा त्या दिवसांतील दुर्धर मनस्ताप ज्यांनीं प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहिला होता, त्यांनाच आली असेल. पचमढीहून ते परत आले, ते मुळीं याच निश्चयानें, कीं आपल्या उपद्यापी सहकाऱ्यांच्या उपद्रवांतून शक्य तितक्या लवकर सुटावयाचें! सरदार पटेल यांची मदत आपल्याला या बाबतींत होणें शक्य नाहीं, हें त्यांना पचमढीसच कळून चुकलें होतें. उरतां उरले गांधी. त्या महात्म्यानेंहि जेव्हां साळसूदपणानें कानांत तुळशीपत्रें घातलीं, तेव्हां डॉक्टरसाहेबांची दृष्टि घटना-कायद्यांतील जालीम उपायांकडे वळली असावी, हें उघड आहे. शिवाय बंगालचे मुख्य प्रधान ना. फझलूल हक् यांनीं एका रात्रींत मंत्रिमंडळ मोडून लगेच नवें घडविण्याची जी करामत त्याच सुमारास केली, तीहि त्यांच्या डोळ्यांपुढें ताजीच होती. त्यामुळें, आत्यंतिक निराशेच्या दारुण आवेगांत त्या सरळ स्वभावाच्या मानी आणि उतावळ्या पुरुषानें, एका परीनें आपल्या राजकीय अस्तित्वावर उदार होऊन, स्वतः राजीनामा दिला आणि आपल्या इच्छेनुसार नवें मंत्रिमंडळ बनविलें. जुलैच्या शेवटच्या आठवड्यांतली ती त्यांची बेडर आणि बेफाम वृत्ति पाहून त्यांचे अंतेवासी सहकारी श्री. ए. श्री. पटवर्धन हे एकदां मला म्हणाले सुद्धां, "डॉक्टरसाहेब हे सध्यां डेलिरियम झाल्यासारखे वागताहेत!" आणि, खरोखरीच ज्या विलक्षण ईर्ष्येच्या धुंदींत, गांधी आणि त्यांची प्रभावळ ही आपल्याविरुद्ध आहे हें माहीत असतांनाहि, पंडितमंत्र्यांना अर्धचंद्र देऊन त्यांनीं स्वतःचें मंत्रिमंडळ स्थापन केलें, आणि वर्किंग कमिटीनें तें मोडावयाला लावल्यानंतर महात्म्यानें स्वहस्तानें तयार करून ठेवलेला आपला राजकीय मृत्युलेख खिशांत घालून पुन्हा त्याचें तोंड न बघण्याच्या निर्धारानें नागपूरची वाट धरली, ती त्यांची त्या वेळची लोकोत्तर ईर्ष्या त्यांच्या भोंवतालच्या गांगरलेल्या मित्रांना जर उन्मादवायूसारखी वाटली असली, तर त्यांत नवल काय?

त्या ईर्ष्येमुळें डॉ. खरे हे पदच्युत झाले ही गोष्ट खरी; तथापि, "डॉ. खरेने मुझे पदभ्रष्ट किया" अशी केंविलवाणी कबुलीहि पण त्यांनीं त्याबरोबरच महात्म्याच्या तोंडून वदविली, हेंहि तितकेंच खरें आहे. डॉ. खरे यांनीं मुख्य प्रधानपद गमावलें असलें, तरी गव्हर्नरशीं संगनमत केल्याचा नीच आरोप

गांधींसारख्या पुण्यश्लोकानें त्यांच्यावर करूनहि, लोकांचा त्यांच्या चारित्र्यावरील विश्वास अणुमात्रहि ढळला नाहीं. उलट, खरे-प्रकरणामुळें जगभर महात्मा म्हणून गाजलेल्या गांधींच्या अंतरंगाचा कारखाना किती अमानुष आहे, हें लोकांच्या प्रत्ययाला येऊन, त्यांच्या चारित्र्यावरील सुशिक्षितांची श्रद्धा अजीबात नष्ट झाली; व हिंदी राजकारणांत अजिंक्य मानल्या गेलेल्या गांधीशाहीच्या विनाशाला प्रारंभ झाला. त्या दृष्टीनें "The Khare-Episode has completely unmasked Gandhi" (खरे-प्रकरणानें गांधींच्या तोंडावरील मुखवटा पूर्णपणें दूर केला) असे जे उद्गार डॉ. राव यांनीं नंतर काढले, त्यापेक्षां डॉ. खरे यांच्या कामगिरीचें वर्णन करावयाला अधिक समर्पक शब्द खास सापडणार नाहींत.

धनुर्धारी, ६ मे १९३९

## ( २ )

डॉ. खरे आणि डॉ. राव यांच्याविषयीं विचार करतांना पुष्कळदां मला मुद्राराक्षस नाटकांतील राक्षस आणि चाणक्य यांच्या व्यक्तिदर्शनाची आठवण होते.

मध्यप्रांतीय असेंब्लींतील कॉंग्रेसपक्षांत फूट पाडण्याचे जे पद्धतशीर प्रयत्न डॉ. राव यांनीं केले, ते डॉ. खरे यांच्या पदच्युतीला कितपत कारण झाले, हें सांगण्याचा काल अद्याप आलेला नाहीं, हें खरें. पण एका चमत्कारिक योगायोगाचा मात्र येथें उल्लेख केल्याशिवाय माझ्यानें राहवत नाहीं. डॉ. खरे यांनीं मुख्य प्रधानपदाचा राजीनामा देऊन स्वतःचें नवें मंत्रिमंडळ स्थापन केल्यावर आम्ही त्याच्या भवितव्याविषयीं बोलत असतां मीं सहज माझे मित्र श्री. फुले यांना म्हटलें, " गेले आठ दिवस डॉक्टरसाहेबांच्या टेबलावर जेनिंग्जचें 'कॅबिनेट गव्हर्मेंट' हें पुस्तक पडलेलें आहे; व त्यांत जागोजाग तांबड्या पेन्सिलीनें खुणा केलेल्या आहेत!" त्यावर श्री. फुले हे मिस्किलपणें हसून उद्गारले, 'तुम्हांला माहिती आहे का तें पुस्तक सेक्रेटरीएटच्या लायब्ररीला

कोणी नजर केलें हें ! –डॉ. राव यांची देणगी आहे ती ! डॉ. खरे यांना ती या वेळीं अशा रीतीनें उपयोगी पडावी, हें किती विलक्षण आहे ! '

रघुवंशांतील राजांच्या मुत्सद्देगिरीचें वर्णन करतांना कालिदासानें असें म्हटलें आहे, कीं त्यांच्या उद्योगांचा पत्ता त्या उद्योगांचीं फळें दृष्टीस पडल्यावर लोकांना लागत असे ! ( फलानुमेयाः प्रारंभाः ) श्री. फुले यांनीं सांगितलेली त्या पुस्तकाची माहिती ऐकून, मला कविकुलगुरूच्या या वचनाची आठवण झाली. १९३७ सालच्या जूनमध्यें डॉ. राव हे हंगामी मुख्य प्रधान असतांना माझे मित्र असोसिएटेड प्रेसचे श्री. ग. रा. पोंक्षे हे 'चित्रे'साठीं त्यांची मुलाखत घ्यावयाला गेले होते. त्या वेळीं प्रांतिक असेंब्लींत प्रचंड बहुमतानें निवडून आलेल्या कॉंग्रेसपक्षाविषयीं बोलतांना डॉक्टरसाहेबांनीं किंचित् तुच्छतेनें असे उद्गार काढले होते, कीं "मध्यप्रांतीय असेंब्लींतील कॉंग्रेस पक्ष ही सहज फोडतां येण्यासारखी चीज आहे ! आणि मी ती फोडून दाखविल्याशिवाय राहणार नाहीं !!" (The C. P. Assembly Congress party is an easily breakable commodity and I shall see that it breaks in no time ! ] ही मुलाखत डॉ. राव यांनीं दिली आणि त्यानंतर लगेच कॉंग्रेसनें मंत्रिपदांचा स्वीकार केला. त्यामुळें ती 'चित्रे'तून प्रसिद्ध करण्याची परवानगी त्यांनीं आम्हांला दिली नाहीं. पण ते त्यांचे उद्गार वर्षाच्या आंतच किती भयंकर रीतीनें खरे ठरले ! आणि ते खरे व्हावयाला त्यांची स्वतःची मुत्सद्देगिरीहि कांहीं कमी कारण झाली नाहीं. म्हणूनच मी म्हणतों कीं, राक्षसाच्या गुणांची तारीफ करीत करीत त्याला हतप्रभ करणाऱ्या चाणक्याची आठवण मला डॉ. खरे आणि डॉ. राव यांच्याविषयीं विचार करतांना नेहमीं होते.

डॉ. खरे आणि डॉ. राव यांच्या राजकीय दृष्टिकोनांत आणि मनोवृत्तींतहि एरवीं कितीहि अंतर असलें, तरी एक साधर्म्य मात्र मला सतत आढळून आलें आहे. तें म्हणजे आपलें चारित्र्य आणि कर्तबगारी यांच्याविषयीं जबरदस्त अहंकार आणि तज्जन्य बौद्धिक मस्तवालपणा (Intellectual arrogance). डॉ. खरे यांना आपलें चारित्र्य आणि वैद्यकव्यवसायांतील निपुणता यांचा जितका अभिमान आहे, तितकाच अभिमान डॉ. राव यांना आपलें चारित्र्य आणि राजकारणांतील प्रवीणता यांच्याविषयीं आहे. ता. १२ एप्रिल

रोजीं श्रीमंत गणपतराव बुटी यांच्याकडे आम्ही प्रातरुपाहार करीत असतां, मद्रासच्या 'हिंदु' पत्रांत आदल्याच दिवशीं डॉ. राव यांच्यावर जी टीका आली होती, तिच्यावरून बोलतांना मीं सहज त्यांना म्हटलें, "हिंदूनें तुम्हांला दिलेली बर्कनहेडची उपमा मला समर्पक वाटली." मीं त्यांना लगेच कारणहि सांगितलें; व तें म्हणजे त्यांचा बौद्धिक मस्तवालपणा. त्यावर ते हसून म्हणाले, "तुमचें म्हणणें कदाचित् बरोबर असेल, पण मीं बर्कनहेड-सारखा डामडौली (Vainglorious) मात्र खास नाहीं!" तेव्हां मी त्यांना म्हणालें, "मला स्वतःला मात्र तुम्हांला नेहमीं डिस्राएलीची उपमा द्यावीशी वाटते; व तुम्ही गृहमंत्रिपदावरून निवृत्त झाल्यावर 'महाराष्ट्रां'त तुमच्या कारकीर्दीचें समालोचन करतांना तीच उपमा मीं तुम्हांला दिली होती." त्याबरोबर ते एकदम किंचित् गंभीर होऊन उद्गारले, "होय, मला आठवतें. पण डिस्राएली हा बायकांचा षोकी होता; मी तसा नाहीं, हें तुम्हांला माहीतच आहे!" (Yes, I remember; but you know, Disraeli was fond of women, while I am not.) त्यांनीं काँग्रेस पक्षांत यावें म्हणून, धूर्त गांधीजींनीं त्यांचा कांहीं कमी अनुनय केला, असें नाहीं. पण डॉ. राव यांनीं त्या बाबतींत गांधींशीं जें उद्दाम वर्तन केलें, त्याला बॅ. जिना यांच्या उर्मटपणाचीच उपमा खरोखरी शोभेल. गेल्या वर्षी याच दिवसांत डॉ. राव आणि म. गांधी यांच्यांत मध्यप्रांतीय मंत्रिमंडळाच्या नादानपणाविषयीं झालेला गुप्त पत्र-व्यवहार जेव्हां 'महाराष्ट्रां'तून अचानक प्रसिद्ध झाला, तेव्हां डॉ. राव यांचा उर्मटपणा आणि म. गांधी यांचा लाघवीपणा यांचें उत्कृष्ट प्रदर्शन झालें.

डॉ. खरे यांचा मस्तवालपणा केव्हां केव्हां बालिश वाटतो. कारण, त्या मस्तवालपणाला मुत्सद्देगिरीची जोड नाहीं. उलट डॉ. राव हे मुत्सद्देगिरीच्या साऱ्या ढंगांत इतके कांहीं तरबेज आहेत, कीं युरोपांतील अव्वल दर्जाच्या राजकारणी पुरुषांत ते सहज शोभून जातील. मध्यप्रांतीय काँग्रेस मंत्रिमंडळानें असेंब्लीच्या सभासदांचे भत्ते कमी केले खरे; पण त्याबरोबरच त्यांना दरमहा पाऊणशें रुपये तनखा सुरू केला. हें कृत्य इतकें कांहीं परस्परविसंगत होतें, कीं विरोधी पक्षानें मंत्रिमंडळाचे त्याबद्दल वाभाडे काढले. पण डॉ. राव हे नुसते टीका करूनच थांबले नाहींत; तर त्यांनीं हा तनखा घेण्याचेंहि

नाकारलें. त्यांनीं न घेतल्यामुळें साचलेली ही त्यांच्या तनख्याची रक्कम नागपुरांतील एका संस्थेच्या त्यांच्या लोभांतील चालकानें जेव्हां देणगी म्हणून त्यांच्याजवळ मागितली, तेव्हां त्याला डॉ. राव यांनीं असें स्पष्ट सांगितलें कीं, "तो तनखा घेण्याचें मी तत्त्वाच्या दृष्टीनें (on Principle) नाकारलें आहे. तुम्हांला हवी असल्यास मी लंडनला गेल्याबरोबर माझ्या पहिल्या पगारांतून मागाल तेवढी देणगी देईन!" त्यांचा खादीचा पोषाक हाहि त्यांच्या मुत्सद्देगिरीच्याच ढंगाचा एक प्रकार आहे; व त्यांच्या नागपूरच्या गेल्या मुक्कामांत, 'इंग्लंडमध्येंहि तुम्ही खादीचेच कपडे वापराल काय?' असा प्रश्न एका मित्रानें त्यांना सहज केला असतां, डॉ. राव ताडकन् उद्गारले, "जर जवाहरलाल एडनपलीकडे गेल्यावर खादीला रजा देतात, तर मला कपडे बदलायला काय हरकत आहे?" डॉ. खरे यांचें वागणें जितकें अहेतुक असतें, तितकेंच डॉ. राव यांचें वागणें सहेतुक असतें. डॉ. खरे हे मुख्य प्रधान झाल्यावर कांहीं कामानिमित्त मी प्रथमच त्यांच्याकडे गेलों असतां, त्यांना सहज गमतीनें विचारलें, "मुख्य प्रधानांच्या खोलींत यायला परवानगी आहे ना?" तेव्हां ते हसत हसत उद्गारले, "अहो, मी मुख्य प्रधान असलों, तरी इतरांना; तुम्हांला नव्हे! तुम्हांला मीं नेहमींचाच डॉ. खरे आहे!" ता. ६ एप्रिल रोजीं श्री. ओगले यांना भेटण्यासाठीं डॉ. राव हे 'महाराष्ट्र' कचेरींत आले असतां त्यांना भेटल्यावर ते माझ्या खोलींत आले. आंत आल्यावर ते खुर्चीवर बसतां बसतां मला म्हणाले, "ही तुमची खोली आहे? मग, मला वाटतं, मी थोडा वेळ तरी बसलं पाहिजे इथं! (Oh! is this your room? Then, I think, I must sit here for some time!") पण डॉ. खरे यांच्या त्या खरखरीत आवाजांत उच्चारलेल्या शब्दांत जें हार्द होतें, तें डॉ. राव यांच्या या सफाईदार इंग्रजी वाक्यांत जाणवलें नाहीं. त्यांत फक्त कला होती! त्यांचा प्रत्येक शब्द आणि प्रत्येक कृति यांत इतकी कांहीं सहेतुकता आणि इतकें कांहीं नाट्य असतें, कीं त्यांच्या सान्निध्यांत असतांना "न प्रयोजनमन्तरा चाणक्यः स्वप्नेऽपि चेष्टते" हे चाणक्यानें स्वतःविषयीं काढलेले उद्गार मला सारखे आठवत असतात.

मस्तवालपणा आणि मुत्सद्देगिरी यांचा जो हा विलक्षण मिलाफ त्यांच्या

ठिकाणीं झाला आहे, त्यामुळें त्यांचें व्यक्तित्व उग्र खरें पण आकर्षक वाटतें. माणसांना खेळविण्याची काय किंवा लोळविण्याची काय दोन्ही कला त्यांना उत्कृष्ट साधलेल्या आहेत; व मध्यप्रांताचे गृहमंत्री असतांना एका बाजूनें प्रांताधिपति आणि दुसऱ्या बाजूनें प्रांतिक कायदेमंडळ यांना आपल्या मुठींत ठेवून त्यांनीं आपली कारकीर्द सर्वच दृष्टींनीं गाजविली. मध्यप्रांत-वऱ्हाडचें कायदेमंडळ म्हणजे जणूं त्यांच्या मेजावर मांडलेला बुद्धिबळाचा डावच असे. तो डाव खेळतांना, स्वतःचा कार्यभाग साधण्यासाठीं, केव्हां केव्हां त्यांनीं स्वतःवर मातहि होऊं दिलेली आहे. बेंडा-प्रकरणाबाबत श्री. काशीप्रसाद पांडे यांनीं आणलेली आणि त्यांच्या विरोधाला न जुमानतां पसार झालेली कामतहकुबीची सूचना ही या त्यांच्या स्वतःवर मात होऊं देण्याच्या चेष्टितांतच घालावी लागेल; व बेंडा-प्रकरणाचा खरा इतिहास जेव्हां पुढें कधीं प्रसिद्ध होईल, तेव्हां डॉ. राव यांचा देशाभिमान आणि मुत्सद्देगिरी यांचें लोकांना कौतुक वाटल्याविना राहणार नाहीं. निरनिराळ्या माणसांना हाताशीं धरून त्यांचा उपयोग करून घेण्याची त्यांची हातोटी पाहिली, म्हणजे "युद्धाप्रमाणें राजकारणांतहि माणसें हीं निव्वळ हत्यारें आहेत, माणसें नव्हत. (In politics as in war men are tools snd not animals.)" या आयरिश पुढारी पार्नेल याच्या उक्तीची मला आठवण होते. माणसांशीं वागण्याची त्यांची ती बाह्यतः लाघवी पण वस्तुतः अनासक्त पद्धत बघून मला पुष्कळदां असें वाटलें आहे, कीं बुद्धिबळांतल्या प्याद्यापेक्षां त्यांच्या हिशेबीं माणसांची जास्त मातब्बरी नाहीं! आपण कोणत्या गोष्टींचा कसा फायदा घेत आहों आणि त्याचे परिणाम काय होतील याची त्यांना अचूक जाणीव असते. गेल्या सप्टेंबरांत डॉ. खरे यांनीं आपल्या राजीनाम्यांतून उद्‌भवलेल्या प्रकरणासंबंधीं जो खुलासा कायदेमंडळांत केला व ज्यामुळें त्या वेळीं सर्व हिंदुस्थानांत खळबळ उडाली, त्याच्याविषयीं बोलतांना नंतर त्याच दिवशीं रात्रीं ते आम्हांला म्हणाले, "हा खुलासा केल्याबद्दल गांधींना एक डॉ. खरे यांना तरी कॉंग्रेस पक्षांतून बाहेर पडावें लागेल किंवा स्वतः तरी कॉंग्रेसमधून बाहेर पडावें लागेल!" आणि खरोखरीच त्यानंतर आठच दिवसांनीं दिल्ली येथें भरलेल्या ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीच्या बैठकींत डॉ. खरे यांच्यावर शिस्तभंगाचें हत्यार चालविण्यांत आलें!

डॉ. राव यांच्या मुत्सद्देगिरीचे ढंग त्यांच्या कायदेमंडळांतील भाषणांतच केवळ नव्हे, तर खाजगी बैठकींतील संभाषणांतहि दिसून येतात. अनेक वर्षे अरेरावी अधिकार भोगल्यामुळें आणि माणसांना कळसूत्री बाहुल्यांप्रमाणें नाचविण्याची सवय झाल्यामुळें त्यांना विरोध असा कोणत्याच प्रकारचा सहन होत नाहीं; व प्रतिपक्षाच्या अत्यंत सोज्ज्वळ टीकेला उत्तर देतांनाहि ते अगदीं तीक्ष्ण उपरोधाचा अवलंब करितात. त्यांच्या त्या भेदक घाऱ्या डोळ्यांत जी एक क्रूरपणाची चमक आढळते, ती त्यांच्या भाषणांत आणि त्याहिपेक्षां हास्यांत दृग्गोचर झाल्याविना राहत नाहीं. त्यांच्या खाजगी संभाषणांत ही तीक्ष्णता अर्थातच तितक्या प्रमाणांत नसते. पण ना. पं. द्वारकाप्रसाद मिश्रा यांच्या उपरोधिक अशाहि संभाषणांत जी लालित्याची खुमारी अनुभवाला येते, तिचा मात्र डॉ. राव यांच्या संभाषणांत पूर्ण अभावच दृष्टीस पडतो. पंडितजींच्या बोलण्यांत महाभारतांतील भारदस्त वचनांपासून तों खड्या बोलींतील भेदक म्हणीपर्यंत साऱ्या प्रकारचीं सुभाषितें मुबलक येतात; व त्यांच्या नर्मसंभाषणांत नाजूक अभिजातपणा असतो. 'डॉ. राव यांच्या संभाषणांतहि अभिजातपणाची ऐट असते, हें खरें. पण त्या ऐटींत देखील एक तऱ्हेचा ताठरपणा, एक तऱ्हेची परुषता आहे, असें जाणवल्याविना राहत नाहीं. इतिहासांतील दाखले, घटनाशास्त्रांतील सिद्धांत, बर्कसारख्या मुत्सद्द्यांच्या वक्तृत्वांतील मार्मिक वाक्यें किंवा मिल्टनसारख्या कवींच्या महाकाव्यांतील सुंदर उक्ति असा सारा प्रौढ अभिजातपणा त्यांच्या भाषणांत काय किंवा संभाषणांत काय भरलेला असतो. सर्वसामान्य मद्रासी लोकांप्रमाणें तेहि झपाझप बोलतात. पण तरीसुद्धां शब्दांच्या समर्पक योजनेवर त्यांचा विलक्षण कटाक्ष असतो. प्रांतिक कायदेमंडळाच्या गेल्या सप्टेंबरच्या अधिवेशनांत कै. दादासाहेब खापर्डे यांच्या मृत्यूविषयीं बोलतांना त्यांनीं असें मर्मभेदक विधान केलें होतें कीं, "He cautioned his conutrymen and Maharashtra fighting for the freedom of the country against what he conceived to be the psychical domination of monkish forces." या वाक्यांतील forces या शब्दाच्या ऐवजीं influences हा शब्द वापरणें अधिक योग्य झालें असतें, असे उद्गार त्यांनीं त्या भाषणाविषयीं बोलतांना नंतर किती तरी वेळां काढले!

खाजगी बैठकींत बोलतांना माहिती सांगण्याची इच्छा नसल्यामुळें ते जेव्हां उडवाउडवी करतात तेव्हां फार मजा वाटते. गेल्या मार्चमध्यें त्यांचा मुक्काम दिल्लीस असतांना व्हाइसरॉय, मध्यप्रांताचे गव्हर्नर आणि गांधीजी यांच्याशीं त्यांची एकाच वेळीं दीर्घ काळ मुलाखत झाल्याची बातमी कांहीं वर्तमानपत्रांतून आली होती. तिचा उल्लेख करून मीं त्यांना विचारलें, “त्या बातमींत कितपत तथ्य आहे?” तेव्हां ते म्हणाले, “नाहीं. मी संधि आली असूनसुद्धां गांधींना भेटलों नाहीं.” (No, I did not see Gandhi though I had a chance.) त्यावर मीं विचारलें, “याचा अर्थ असा समजायचा का कीं, बाकीच्या दोघांना तुम्ही भेटलांत?” या माझ्या प्रश्नाला त्यांनीं हसून उत्तर दिलें, “तुमच्या प्रश्नाच्या या भागाला मीं कुठें काय उत्तर दिलें आहे?” रोज रात्रीं दहानंतर आपल्या लोभांतले सी. आय. डीं. तील अधिकारी, वृत्तपत्रांचे वार्ताहर किंवा निरनिराळ्या पक्षांतील उभयान्वयी व्यक्ति यांच्याबरोबर दिवसभर झालेल्या राजकीय घडामोडींची चर्चा करितांना त्यांना ऐकणें, हें खरोखरी एक शिक्षणच असतें.

डॉ. खरे यांच्या हृदयांतील ज्वलत् आकांक्षा (burning passion) कोणती, असा प्रश्न जर मला कोणी विचारला, तर मी ‘देशाभिमान’ असें त्याचें उत्तर अगदीं निःशंक मनानें देईन. त्यांच्या दोन तपांच्या सार्वजनिक आयुष्यक्रमांत त्यांनीं नेतृत्व किंवा अधिकार यांची अपेक्षा कधीं केली होती, असें मला वाटत नाहीं. कै. अभ्यंकर यांच्यापेक्षां त्यांचा सामाजिक दर्जा कोणत्याहि प्रकारें कमी नव्हता; व त्यांच्याइतकी लोकप्रियता तर नरकेसरींना कधींहि लाभली नाहीं. तरीसुद्धां अभ्यंकर जिवंत असेपर्यंत त्यांची पायकी करण्यांत त्यांच्यापेक्षां वयानें वडील असलेल्या डॉक्टरसाहेबांना कधींहि कमीपणा वाटला नाहीं; व अभ्यंकर काय किंवा गांधी काय यांच्या निशाणाखालीं उभें राहून मुकाट्यानें देशसेवा करण्यांत त्यांनीं धन्यता मानली. ते स्वतःचा उल्लेख पुष्कळदां ‘शिपाई गडी’ म्हणून करितात; व त्यांची कोणत्याहि रीतीनें मानखंडना न करितां, गांधींनीं जर गौरवपूर्वक त्यांना दिवाणगिरी सोडावयाला सांगितली असती, तर डॉक्टरसाहेबांनीं आनंदानें अधिकारन्यास केला असता. ही निरपेक्ष बुद्धि डॉ. राव यांच्या ठिकाणीं दिसत नाहीं. त्यांच्या हृदयांतील ज्वलत् आकांक्षा कोणती असें जर मला कोणी विचारलें, तर मी ‘सत्ता’ असें

उत्तर देईन. त्यांना संपत्तीची मातब्बरी बिलकुल वाटत नाहीं. पैसा हें केवळ ते एक साधन समजतात. आणि, मनुष्य हा जेव्हां स्वतःच्या कर्तबगारीनें सत्ता संपादन करतो, तेव्हां कीर्ति ही त्या सत्तेच्या मागून आपोआपच येत असल्यामुळें, ते कीर्ति हा सत्तेचा फक्त अलंकार मानतात. त्यांना सत्तेशिवाय जीवन शून्य वाटतें. गेल्या वर्षी या दिवसांत जेव्हां ते मध्यप्रांतीय कायदे-मंडळाचे फक्त एक सामान्य सभासद होते, तेव्हां त्यांच्या वृत्तींत या शून्यतेचा विषाद ओतप्रोत भरलेला दिसत असे!

मुद्राराक्षसाच्या शेवटीं चाणक्यानें, "गृह्यतामिदं शस्त्रम्" असे उद्गार काढून स्वेच्छेनें अधिकारन्यास केल्याचा उदात्त प्रसंग आहे. डॉ. राव हे जरी चाणक्याप्रमाणें राजनीतिनिपुण आणि कर्तृत्वसंपन्न असले, तरी त्यांच्या हातून अशा प्रकारचा त्याग होण्याचा मात्र संभव नाहीं!

धनुर्धारी, १२ मे १९२९

---

## गोपाळ अनंत ओगले : : ५

“ कोंकणांतून एक लोटा घेऊन हे नागपुरास गेले ! असें श्री. गोपाळराव ओगले यांचें वर्णन मुंबईच्या एका वर्तमानपत्रानें केलें होतें. हें वर्णन करण्यांत त्याचा हेतु अर्थातच कुचेष्टेचा होता; पण मला वाटतें दादासाहेबांच्या कर्तबगारीचें उज्ज्वल चित्र रेखाटावयाला या तुच्छतागर्भ वाक्यांत सूचित केलेल्या वस्तुस्थितीइतकी अनुकूल पार्श्वभूमि दुसरी क्वचित्‌च आढळेल. त्यांचा जन्म १८७९ सालीं रत्नागिरी जिल्ह्यांत विजयदुर्ग येथें झाला. त्यांचे वडील शाळामास्तर होते; व पांच रुपये पगारावर नोकरीला प्रारंभ करून सतत तीन तपें साक्षरतेच्या प्रसाराच्या किचकट कामांत घालविल्यावर पंधरा रुपये पगार असतांना त्यांनीं पेन्शन घेतलें. अर्थात्‌ श्री. ओगले यांना प्राथमिक शिक्षण झाल्यानंतर पुढील शिक्षणाकरितां जर स्वतःच्या पायांवर उभें राहावें लागलें असलें तर काय आश्चर्य ! त्यांचें दुय्यम शिक्षण सर्व कोंकणांतच, रत्नागिरी, दापोली वगैरे निरनिराळ्या ठिकाणीं झालें. मॅट्रिक झाल्यावर त्यांनीं पुण्याच्या फर्ग्युसन कॉलेजमध्यें प्रवेश केला; पण घरगुती अडचणींमुळें त्यांना उच्च शिक्षण अर्ध्यावर सोडावें लागलें; व त्यांच्या वडिलांची इच्छा जरी त्यांनीं

सरकारी नोकरींत शिरावें अशी होती, तरी मनाचा स्वाभाविक कल देशसेवेकडे असल्यामुळें, ते लवाटे-भोपटकर यांनीं काढिलेल्या महाराष्ट्र विद्यालयांत शिक्षकाची नोकरी धरून पुण्यांतच राहिले. इथूनच त्यांच्या सार्वजनिक आयुष्याला प्रारंभ झाला.

ओगले यांना देशसेवेची स्फूर्ति कोठून मिळाली असेल याची कल्पना करणें कठीण नाहीं. मराठ्यांच्या आरमारी इतिहासांतील जितक्या अद्भुतरम्य स्मृति त्यांच्या जन्मभूमीशीं संलग्न झालेल्या आहेत, तितक्या त्या कोंकणांतील प्रायः इतर कोणत्याही गांवाशीं संलग्न झालेल्या नसतील.

**तेथें होता दुस्मानाला अखंड वितरुनि भया**
**दर्यावर दावीत दरारा विजयवंत घेरिया**

असें ज्याचें हृदयंगम वर्णन माधव कवींनीं केलें आहे, त्या विजयदुर्गाच्या सान्निध्यांत त्यांचें बाळपण गेलेलें; व विद्यार्थिदशेंतील अत्यंत उमेदीचा काळ त्या वेळीं राजद्रोहाबद्दल गाजलेल्या पुणें शहरीं गेलेला. वंशवेणूंतून संचरणाऱ्या वायुलहरींच्या सुराबरोबर विजयदुर्गाच्या वास्तुदेवतांनीं गाइलेल्या गतवैभवाच्या मूकगीतांनीं कदाचित् त्यांच्या हृदयांत देशाभिमान जागृत केला असेल! स्वातंत्र्याच्या अभिनव तत्त्वज्ञानाचा पुरस्कार करण्यासाठीं अवतरलेल्या 'काळ' पत्राच्या हृदयस्पर्शी लेखांनीं कदाचित् त्यांना देशसेवेची स्फूर्ति दिली असेल? किंवा, १८९७ सालच्या खटल्यांत लोकमान्य टिळकांचें जें झुंजारपण पहिल्यांदाच उफाळून प्रगट झालें, त्यानेंहि कदाचित् त्यांचें मन नवोदित राष्ट्रीय पक्षाकडे आकृष्ट केलें असेल! कारण कोणतेंहि असो. एवढी गोष्ट मात्र खरी, कीं महाराष्ट्र विद्यालयांतलें आपलें काम सांभाळून, ते उरलेला वेळ लेखनांत, व्याख्यानांत आणि निरनिराळ्या राष्ट्रीय चळवळींत घालवूं लागले. त्यामुळें टिळकांचें लक्ष लवकरच या होतकरू लेखकाकडे वेधले जाऊन, राष्ट्रीय पक्षांतील तरुण कार्यकर्त्यांत त्यांची गणना होऊं लागली.

वर्तमानपत्राच्या धंद्यांत जें लोकोत्तर यश ओगले यांनीं पुढें संपादन केलें, त्याची पूर्वतयारी त्यांनीं याच काळांत केली. बुद्धिमान् मनुष्याच्या लेखनाला प्रायः काव्यरचनेनें प्रारंभ होतो, असें एका इंग्रज टीकाकारानें म्हटलें आहे. याचें कारण कदाचित् असें सांगतां येईल कीं, यौवनाच्या आरंभीं मनुष्याच्या विचारांना स्थैर्य आणि गंभीरता आलेली नसल्यामुळें,

त्या चंचल, प्रवाही विचारांना कवितेच्या छंदोमय स्वरूपांत प्रगट होणें अधिक मानवत असावें. ओगले यांच्या लेखनाला आरंभ कवितेपासूनच झाला. संपादक म्हणून नांव कमवण्यापूर्वी ते कवि म्हणून नांवाजलेले होते, ही गोष्ट नव्या पिढींतील वाचकांना बहुधा माहीत नसेल. मला स्वतःलाहि '**जरी पाहिजे मध्यदेशीय वार्ता**' या त्यांच्या 'महाराष्ट्र'च्या जाहिरातीसाठीं लिहिलेल्या श्लोकाशिवाय त्यांची दुसरी कविता माहीत नव्हती. पण, कै. अनंततनय यांनीं सहा वर्षांपूर्वी मला सहज एकदां गमतीनें असें म्हटलें कीं, "तुम्ही जरी पुणें सोडून नागपूरला गेला, तरी तिथेंहि तुमचा 'अनंततनया'शीं रोजचा संबंध आहेच!" हे दुसरे 'अनंततनय' म्हणजेच श्री. गोपाळराव ओगले. आणि लगेच त्यांनीं 'काव्यदोहनां'तून मला ओगले यांची "मेघराजाला नोटीस" ही विनोदी कविता काढून दाखविली. आतां ओगले यांचा काव्यरचनेशीं इतकाच संबंध उरलेला आहे कीं, आपल्या वर्तमानपत्राकडे कधीं काळीं येणाऱ्या कविता ते दाक्षिण्यबुद्धीनें सुधारून, व क्वचित् सारीच कविता स्वतः लिहूनहि प्रसिद्ध करीत असतात. तारुण्यांतील त्यांचें हें हौशी कवित्व त्यांच्या व्यासंगाचें आणि वाङ्मयाभिरुचीचें निदर्शक म्हणून सांगतां येईल. इंग्रजी आणि विशेषतः संस्कृत या दोन भाषांतील वाङ्मयाचें त्यांचें परिशीलन मार्मिक असून, संस्कृत काव्यांचें त्यांचें गाढ पाठांतर त्यांच्या सहवासांत राहणाऱ्या मनुष्याच्या नेहमीं अनुभवाला येतें; व ते आजारी पडून तापाच्या भरांत बडबडत असले, म्हणजे तर कालिदासादिकांच्या उत्कृष्ट संस्कृत श्लोकांचा जवळ बसलेल्या माणसावर भडिमार होऊन, त्याच्या पाठांतराला सहजासहजीं उजळा मिळतो!

पण, दैवयोग असा होता कीं, ओगले यांचें आयुष्य काव्यरचनेंत न जातां आपल्या लेखणीच्या प्रभावानें लोकमत जागृत आणि संघटित करण्यांत जावें. नागपूरच्या 'देशसेवक' पत्राचे संपादक श्री. माधवराव पाध्ये यांना मदतनीस पाहिजे होता. त्या कामासाठीं टिळकांनीं ओगले यांची शिफारस करून, १९०६ सालच्या नोव्हेंबरमध्ये त्यांना नागपूरला पाठविलें.

—श्री. ओगले नागपुरास आले, तो काळ अत्यंत धामधुमीचा होता. बंगालच्या फाळणीमुळें स्वदेशी आणि बहिष्कार यांची प्रभावी चळवळ जोरानें सुरू झाली होती; व लोकमान्य टिळक यांनीं १८९५ सालापासून ज्या

लढाऊ धोरणाचा पुरस्कार महाराष्ट्रांत मोठ्या धडाडीनें चालविला होता, त्याला भावनाप्रधान बंगाली पुढाऱ्यांच्या पाठिंब्यामुळें एकदम विलक्षण तेज चढलें. देशांतलि या विचारक्रांतीचा परिणाम नागपूर-वऱ्हाडच्या स्तिमित राजकारणावरहि झाल्याशिवाय राहिला नाहीं. त्याची चुणूक नागपूरच्या लोकांच्या प्रत्ययाला प्रथम 'देशसेवक' पत्राच्या 'धर्मांतरा'च्या रूपानें आली. श्री. पाध्ये यांच्यासारख्या धिम्या, पोक्त कार्यकर्त्यांच्या हातीं असलेलें हें पत्र १९०६ सालच्या राष्ट्रीय सभेनंतर कै. अच्युतराव कोल्हटकर यांच्यासारख्या ताज्या दमाच्या आणि उसळत्या रक्ताच्या तरुण लेखकाच्या हातीं गेलें व नागपूरच्या आगामी कॉंग्रेसचें अध्यक्षपद टिळकांना देण्यासंबंधींचा मतप्रचार 'देशसेवका'नें नंतर इतक्या कांहीं हिरीरीनें केली कीं, नागपुरांतील जनता देशसेवकाच्या धोरणांतील हें आकास्मिक परिवर्तन पाहून त्याचें 'धर्मांतर' झालें असें म्हणूं लागली. 'देशसेवक' चालविण्याच्या कामीं श्री. ओगले हे अच्युतरावांचे मुख्य मदतनीस होते. इतकेंच नव्हे, तर कॉंग्रेसच्या बैठकीचें स्थलांतर नागपुराहून सुरतेस झाल्यानंतर कै. दादासाहेब खापर्डे, कै. शिवरामपंत परांजपे आणि कै. अच्युतराव कोल्हटकर यांनीं तेथें जाऊन नेमस्त पक्षाशीं सामना देण्यासाठीं राष्ट्रीय पक्षाची जी छावणी उघडली, तिचे एक सूत्रचालक म्हणून श्री. ओगले हे कोल्हटकरांबरोबर सुरतेस गेले होते. कै. दादासाहेब उधोजी, कै. गोपाळराव बुटी, डॉ. मुंजे, अळेकर प्रभृति सोळा कार्यकर्त्यांचें जें राष्ट्रीय मंडळ टिळक-तत्त्वावर राजकीय चळवळ करण्यासाठीं नागपुरांत स्थापन झालें, त्याच्या निरनिराळ्या कार्यांतहि श्री. ओगले हे मोठ्या ईर्ष्येनें भाग घेत असत. १९०७ च्या मे महिन्यांत लाला लजपतराय आणि सरदार अजितसिंग यांना हद्दपार केल्यावर नागपुरास निषेधाची जी प्रचंड सभा भरली होती तींत तरुण गोपाळरावजींनीं इतकें जळजळीत भाषण केलें कीं, त्यामुळें त्यांची 'गोरक्षण' कचेरींतील नोकरी सुटून सी. आय. डी. चा ससेमिरा त्यांच्या मागें कायमचा लागला.

सुरतेची राष्ट्रीय सभा मोडल्यानंतर, नागपुरास प्लेगची गडबड सुरू झाल्यामुळें १९०८ च्या मार्च महिन्यांत श्री. ओगले हे पुण्यास आले व भोपटकरबंधूंनीं तेथें काढलेल्या महाराष्ट्र विद्यालयांत काम करायला त्यांनीं सुरुवात केली. याच सुमारास लोकमान्य टिळकांनीं मद्यपानबंदीच्या कार्याला उठाव मिळावा

म्हणून निरोधनाची प्रतिकारक चळवळ सुरू केली होती. या नव्या चळवळींत भाग घेऊन श्री. ओगले यांनीं दंडाची शिक्षा भोगली. कै. शिवरामपंत परांजपे यांच्या 'काळ' पत्रावर राजद्रोहाचा खटला झाल्यावर गोपाळरावजींनीं त्या पत्राचें संपादकत्व स्वीकारावें, अशी कल्पना निघाली होती. पण, पुणें हें श्री. ओगले यांचें कार्यक्षेत्र व्हावें असा विधिसंकेत नसल्यामुळेंच बहुधा त्यांनीं या कल्पनेस नकार दिला. तोंच 'देशसेवक' पत्राचे संपादक कै. अच्युतराव कोल्हटकर यांच्यावर राजद्रोहाचा खटला होऊन, त्या पत्राची धुरा शिरावर घेण्यासाठीं गोपाळरावजींना नागपुरास निघून यावें लागलें. सर रेजिनाल्ड क्रॅडॉक यांच्यासारखा करडा नोकरशहा त्या वेळीं मध्यप्रांत-वऱ्हाडचा कमिशनर होता. त्यांनीं नागपूर-वऱ्हाडांतील नवोदित जहाल पक्षाचीं पाळेंमुळें खणण्याचा निश्चय करून निरनिराळ्या मिषांनीं राष्ट्रीय मंडळ आणि जहाल पुढारी यांच्यावर शस्त्र धरलें. अखेर १९०९च्या मार्चमध्यें श्री. ओगले यांच्यावर १०८ कलमाखालीं खटला भरण्यांत आला व त्यांच्याकडून तीन हजार रुपयांची जमानत मागण्यांत आली. गोपाळरावजींनीं या खटल्यांत केलेलें स्वतःच्या बचावाचें भाषण इतकें जळजळीत होतें कीं, "त्यांचा बचाव हा त्यांच्या लेखापेक्षां जास्त राजद्रोही आहे (His argument is more seditious than his writings) असे उद्गार न्यायमूर्तींनीं आपल्या निकालांत काढले. अशा रीतीनें 'देशसेवका'चा संबंध तुटल्यावर श्री. ओगले हे मुंबईस येऊन 'राष्ट्रमत' कचेरींत राहिले. पण त्या दैनिकावरहि लवकरच प्रेस ॲक्टाची झडप पडली व नंतर नाशिक येथील जॅक्सन खुनाचा कट आणि लॉर्ड हार्डिंज यांच्या गाडीवर टाकलेल्या बॉबचें प्रकरण या दोहोंशीं त्यांचा संबंध असल्याचा वहीम पोलिसांना येऊन त्यांच्यामागें सी. आय. डी. चें सुदर्शन लागल्यामुळें दडपशाहीच्या तमोयुगांतील पुढील चार वर्षें त्यांनीं जवळजवळ अज्ञातवासांत काढलीं.

मोर्ले-मिंटो सुधारणांचा मनु सुरू होऊन राष्ट्रीय पक्षाच्या पुनरुज्जीवनाला अनुकूल काळ आलेला दिसतांच डॉ. मुंजेप्रभृति नागपूरच्या पुढाऱ्यांनीं वर्तमानपत्र काढण्यासाठीं पुन्हा ओगले यांना आग्रहानें बोलाविलें; व १९१४ सालच्या फेब्रुवारी महिन्यांत 'महाराष्ट्र'चा जन्म झाला. 'महाराष्ट्र'ची स्थिति आरंभीं किती बिकट होती, याची कल्पना आजचा त्याचा भव्य विस्तार

पाहाणाराला येणें कठीण. सरकारनें पत्र काढावयाला परवानगी देतांनाच मुळीं दोन हजार रुपयांची जमानत घेतली; व ओगले यांचा सरकारशीं असलेला ऋणानुबंध सर्वश्रुत असल्यामुळें त्यांना गांवांत भाड्यानें घर द्यावयाला सुद्धां कोणी धजेना! पण अंगीकृत कार्य तडीला न्यावयाला अवश्य असलेली चिकाटी व त्यासाठीं जरूर तो स्वार्थत्याग करण्याची तत्परता हे गुण त्यांच्या अंगीं असल्यामुळें, आज दीड तपाच्या तपस्येनंतर, 'महाराष्ट्रा'ला थोडें तरी स्वास्थ्य लाभलेलें दिसत आहे. बातमी देण्यापासून तों अग्रलेख लिहिण्यापर्यंत हरएक प्रकारचें संपादकीय काम ते आस्थेनें करितात; व घड्या करावयाला येणाऱ्या मुलांपैकीं एखादा जर गैरहजर असला, तर मध्यरात्रीं मशिनजवळ आसनमांडी घालून घड्या करीत बसलेले मीं त्यांना अनेकदां पाहिलेले आहेत. परंतु 'महाराष्ट्र' इतका लोकप्रिय व्हावयाला त्यांच्या या व्यावहारिक गुणांपेक्षांही त्यांची तेजस्वी राष्ट्रीय वृत्ति अधिक कारण झालेली आहे. त्यांच्या बाणेदारपणाचा एक संस्मरणीय प्रसंग माझ्या डोळ्यांसमोर घडलेला मला आठवतो. पांच वर्षांपूर्वी मध्यप्रांतीय कायदेमंडळांतील राष्ट्रीय पक्षांत फूट पाडून ना. राघवेंद्र राव यांनीं स्वतःच्या इच्छेनुसार मंत्रिमंडळाची पुनर्घटना केली; व आपले नवे सहकारी ना. केदार यांच्यासह ते ओगले यांना भेटावयाला मुद्दाम 'महाराष्ट्र' कचेरींत आले. या भेटीचा उद्देश अर्थातच आपल्या नव्या दिवाणगिरीला 'महाराष्ट्र'चा पाठिंबा मिळविण्याचा होता. आणि इतर औपचारिक प्रश्नोत्तरें झाल्यावर, ना. राव यांनीं तशी स्पष्ट विनंति ओगले यांना केलीहि. पण गोपाळरावांनीं त्यांना स्पष्ट उत्तर दिलें कीं, 'स्वतःची वैयक्तिक महत्त्वाकांक्षा तृप्त करण्यासाठीं स्थापन झालेल्या व राष्ट्रीयत्वाची चाड नसलेल्या तुमच्या दिवाणगिरीचा पुरस्कार करणें मला शक्य नाहीं!' या स्पष्टोक्तीचें प्रायश्चित्त, ना. राव हे गृहमंत्रिपदावर आरूढ होतांच, सोलापूर प्रकरणाच्या रूपानें, ओगले यांना मिळालें. आणि गेलीं तीन वर्षें निरनिराळ्या खटल्यांच्या धमकीची नंगी तरवार 'महाराष्ट्रां'च्या डोक्यावर सारखी लटकत आहे!

श्री. ओगले यांच्या लेखनाचा आत्मीय गुण कोणता असें जर मला कोणी विचारलें, तर मी 'उपरोध' असें उत्तर देईन. मात्र त्यांच्या व्याजोक्तीचा बाणा हा, परांजपे किंवा केळकर यांच्या लेखनशैलीप्रमाणें, उपमालंकारांच्या सुंदर पिसांनीं भूषविलेला नसतो; तर त्याच्या शाणनिशित अग्राला फक्त

उपरोधाचें गरळ तेवढें मुबलक माखलेलें असतें. कोंकणी माणसें हीं स्वभावतःच उपरोधिक असतात. कदाचित् खाऱ्या हवेंत आणि खडकाळ जमिनींत त्यांच्या मनाचा विकास होत असल्यामुळें त्यांच्या बोलण्यांत खोंच आपोआप उत्पन्न होत असावी. ओगले यांच्या अगदीं साध्या बोलण्यांतसुद्धां उपरोधाची छटा उमटल्याशिवाय राहत नाहीं; व त्यांच्या त्या रोखून पाहणाऱ्या शोधक डोळ्यांत तर उपरोधाची चमक नेहमींच खेळत असते. प्रतिपक्षावर कडक किंवा सडेतोड टीका करण्यापेक्षां त्याची रेवडी उडवून त्याला पाण्यापेक्षां पातळ करून सोडणें त्यांना फार आवडतें आणि तें त्यांना साधतेंहि पण उत्कृष्ट. डुकराप्रमाणें सरळ मुसंडी देऊन प्रतिस्पर्ध्याला लोळविणें त्यांना रुचत नाहीं; तर अस्वलाप्रमाणें मनसोक्त गुदगुल्या करून हसत-खेळत त्याचा प्राण घेणें त्यांना मानवतें. या आपल्या उपरोधकौशल्याच्या जोरावरच १९२६ सालच्या असेंब्लीच्या निवडणुकींत आपल्या दणदगीत वक्तृत्वानें विरोधकांना नामोहरम करणाऱ्या बॅ. अभ्यंकरासारख्या नरकेसरीला त्यांनीं हातोहात जेरीस आणलें. अभ्यंकरांनीं सभेंत जय मिळवावा व गोपाळरावांनीं वर्तमानपत्रांतून त्यांच्यावर मात करावी असा प्रकार सारखा तीन महिने चालू होता. अभ्यंकर हे सभा-जेते खरे; पण त्यांचें वक्तृत्व म्हणजे मोर्चे बांधून एका जागीं डामलेली तोफ. तिचा भडिमार कितीहि भयानक असला तरी मर्यादित. उलट ओगले यांचे 'महाराष्ट्रां'तील उपरोधपूर्ण लेख म्हणजे विषारी धूर. त्या धूमास्त्राचा फैलाव सबंध प्रांतभर व्हावयाचा. त्यामुळेंच मुख्यतः त्या निवडणुकीच्या लढ्यांत बॅरिस्टरसाहेबांचा पाडाव झाला. निवडणुकीची ती सर्वच मोहीम गोपाळरावांनीं इतक्या कुशलतेनें चालविली कीं, नवोदित प्रतिसहकार पक्षाला कॉंग्रेसविरुद्ध उभारलेल्या त्या बंडांत मिळालेल्या विजयाचें श्रेय बहुंशीं ओगले यांनाच दिलें पाहिजे, असे उद्गार नंतर लोकनायक अणे यांनीं काढले. मध्यप्रांत-वऱ्हाडांतील लोकमत जागृत आणि सुशिक्षित करण्याच्या बाबतींत खापर्डे, मुंजे, अणे, बाबासाहेब परांजपे व बॅ. अभ्यंकर यांच्याबरोबरीनें ओगले यांचा उल्लेख करावा लागेल.

व्यक्तिशः श्री. ओगले हे उदारमतवादी आणि दिलदार असून, वर्तमानपत्रासारखी प्रातिनिधिक संस्था चालवायला अवश्य असलेला मनाचा समावेशकपणा त्यांच्या ठिकाणीं पुष्कळच आहे. म्हणूनच त्यांच्या संपादकमंडळांत कट्टर साम्यवादी, हिंदु सभेचा कडवा पुरस्कर्ता किंवा माझ्यासारखा हरएक

विषयावर विचक्षण मतें असलेला मनुष्य निर्वेधपणानें नांदूं शकतो. १९२४ सालच्या सप्टेंबरमध्यें मी जेव्हां त्यांच्याजवळ येऊन राहिलों, तेव्हां माझें त्यांच्याशीं फार दिवस पटणार नाहीं असें भाकित आमच्या एका परिचितानें वर्तविलें होतें; पण तें सपशेल खोटें ठरून, मला पुण्याहून नागपुरास आणतांना, श्री. नारायणराव बेहेरे यांनीं ओगले यांच्या सौजन्याबद्दल दिलेला निर्वाळा मात्र सोळा आणे खरा ठरला. एकाच संस्थेंत काम करणाऱ्या दोन व्यक्तींच्या वयांत जेव्हां एका पिढीचें अंतर असतें, तेव्हां मतभेदाचे प्रसंग साहजिकच अनेकदां उद्भवतात, व वडीलकीच्या जाणीवेनें विशेष न खुपणारे मतभेद पोटांत घालण्याचा उदार समंजसपणा जर ज्येष्ठ सहकाऱ्याच्या ठिकाणीं नसेल, तर हाताखालच्या कनिष्ठांच्या मनाचा कोंडमारा होऊन, त्यांच्या जोमदार विचारांचे कोंवळे अंकुर खुरटून जातात. या गोष्टीची जाणीव असल्यामुळेंच बहुधा दादांचें वर्तन आपल्या सहकाऱ्यांशीं सामान्यतः सहिष्णुतेचें असतें. माझें लिहिणें त्यांना न आवडल्याचे योग, मला वाटतें, गेल्या सात वर्षांत फार तर चार-पांचदांच आले असतील. टिळक-चरित्रांतील शुद्धलेखनाच्या निरर्गल निरनुस्वारतेवर मीं केलेली टीका त्यांना फारशी पसंत पडली नव्हती. त्याचप्रमाणें श्री. दप्तरी यांच्या 'धर्मरहस्य' या ग्रंथावर टीका करितांना, त्यांच्या भूमिकेविषयीं जरूर ती सहानुभूति मीं दाखविली नाहीं, म्हणूनहि मजवर ते बरेच रागावले होते. अशाच प्रकारचा अगदीं अलीकडचा प्रसंग म्हणजे श्री. वरेरकर यांच्या बडोदें येथील भाषणावर मीं केलेल्या टीकेचा. वरेरकर हे त्यांच्या स्नेहीमंडळींत मोडतात; तेव्हां त्यांच्या भाषणावर 'महाराष्ट्रां' त इतकी कडक टीका आलेली ओगले यांना खपणार नाहीं, याची कल्पना मला अर्थातच होती; व श्री. दिनकरशास्त्री कानडे यांच्याजवळ मीं तसें बोलूनहि दाखविलें होतें. दादांचें म्हणणें या बाबतींत असें पडलें कीं, वरेरकरांच्या भाषणाला इतकें महत्त्व देऊन त्यावर तुटून पडण्याची गरज नव्हती; त्यांची थोडीशी कुचेष्टा केल्यानें काम भागलें असतें ! पण त्यानंतर मी त्या भाषणांतील कांहीं उतारे वाचून दाखवून जो खुलासा केला, त्यामुळें त्यांच्या रागाचा पारा बराच खालीं उतरला !

तथापि आमच्यांत क्वचित् प्रसंगीं उद्भवलेले अशा तऱ्हेचे मतभेद विकोपास मात्र कधींच गेले नाहींत. या दृष्टीनें एक प्रसंग मला विशेष उल्लेखनीय

वाटतो. खान-मालिनी विवाहावर श्री. रुईकर यांच्या 'स्वतंत्र भारत' पत्रांत अनुकूल लेख लिहून मी त्याच्या आक्षेपकांवर जळजळीत टीका केली होती. त्या टीकेमुळें नागपुरांतील लोकमत मजवर इतकें बिथरून गेलें कीं, माझ्यासारख्या धर्मद्रोही लेखकाला चवाठ्यावर "लिंच" (Lynch) करावा, असे उद्गार एका बड्या पुढाऱ्यानें काढले! व 'महाराष्ट्र'च्या संपादक मंडळांतून ओगले यांनीं मला काढून टाकावें, असाहि ध्वनि क्वचित् उठला. पण त्या लेखांतील माझी टीकेची पद्धति जरी दादांना पसंत नव्हती, तरी त्यांच्या सहानुभूतीचा कल एकंदरींत माझ्याच मतांकडेच होता. आणि या विषयावर बोलतांना नंतर त्यांनीं मला असें म्हटलें कीं, "तुम्हीं जर यापेक्षां थोडा आटपसर व सौम्य लेख लिहिला असता, तर तो 'महाराष्ट्रांत घ्यायला मीं नाहीं म्हटलें नसतें.

त्यांनीं स्वतः सतरा वर्षांपूर्वी आपले एक तरुण स्नेही श्री. उमाकांत श्रीरंग देसाई यांनीं पारशी युवतीशीं केलेल्या विवाहाला मंगलाशीर्वाद दिला होता. त्याचीहि हकीगत त्यांनीं मला सांगितली. बर्नार्ड शॉनें म्हटलें आहे कीं, "कोणताहि मनुष्य दुसऱ्या माणसाचा मालक व्हावयाला लायक नाहीं! (No man is fit to be another man's master) या त्यांच्या विधानाला अपवाद म्हणता येण्यासारख्या ज्या दोनतीन व्यक्ति मला आढळल्या, त्यांत आमच्या दादांची गणना मी करीन.

'प्रतिभा', १२ मार्च १९३२

* * *

"ते दिसायला अत्यंत साधे पण आपल्या प्रांतांतील अत्यंत सामर्थ्यशाली वृत्तविशारद आहेत तें! (He is the most unassuming but the most powerful journalist in our province,)–" ना. डॉ. राघवेंद्र राव यांचे उद्गार आहेत हे. तीन वर्षांपूर्वी नागपूरच्या रेस्ट हाउसमध्यें रात्रीच्या वेळीं आम्ही गप्पा मारीत बसलों असतां, श्री. दादासाहेब ओगले यांच्या प्रकृतीवरून बोलतांना डॉ. राव यांच्या तोंडून अगदीं अभावितपणें हा उद्गार निघाला. मध्यप्रांत-वऱ्हाडचे शिक्षणमंत्री असतांना

काय किंवा नंतर गृहमंत्री झाल्यावरहि काय, डॉ. राव यांनीं श्री. ओगले यांच्या उपरोधगर्भ लेखणीच्या प्रभावाची चुणूक पुरेपूर अनुभविली होती; व तिचा दंश मनांत ठेवूनच, सोलापूर प्रकरणाच्या निमित्तानें, त्यांनीं दादासाहेबांना तुरुंगाची वाट दाखविली. म्हणून त्यांनीं दादांविषयीं बोलतांना 'अत्यंत सामर्थ्यशाली वृत्तविशारद' असें त्यांचें वर्णन अगदीं सहजासहजीं केलें.

दादांच्या या सामर्थ्यशालितेचें मर्म, माझ्या दृष्टीनें, त्यांचें सौजन्य आणि त्यांची उपरोधकुशलता या दोनच गुणांत खरोखरी आहे. एका परीनें हे गुण परस्परविरोधी भासतात. पण माधुर्य आणि कंटक यांची सांगड विधात्यानें इतक्या ठिकाणीं घातलेली आढळते, कीं गुलाब, केवडा आणि फणस हीं मनसोक्त पाहिलेल्या कोंकणांतल्या माणसाला तरी दादांच्या ठिकाणीं झालेल्या या विरोधी गुणांच्या मिलाफाबद्दल नवल वाटण्याचें कारण नाहीं. वऱ्हाड-मध्यप्रांतांत स्थायिक झाल्यावर गेल्या तीस वर्षांत त्यांनीं केलेला लोकसंग्रह आणि मिळविलेली लोकप्रियता हा केवळ त्यांच्या सौजन्याचा परिपाक आहे. आपल्या या निरुपम सौजन्यानें त्यांनीं शत्रूंना मारलें आहे आणि लोकांना भारलें आहे. त्यामुळेंच त्यांचा 'महाराष्ट्र' हा कॉंग्रेस आणि महासभा या दोहोंचाहि टीकाकार समजला जात असतांनासुद्धां त्यांचा शब्द नागपुरांतील या दोन्ही पक्षांच्या धुरीणांत शिरोधार्य समजला जातो.

छत्तीस वर्षांपूर्वी ज्या भावनेनें त्यांनीं वृत्तपत्रव्यवसायांत प्रवेश केला, त्या भावनेंतच खरोखरी त्यांच्या या सौजन्याचें बीज सापडेल. ते वर्तमानपत्राच्या धंद्यांत पडले ते व्यावहारिक दृष्टीनें नव्हे; तर राष्ट्रीय पक्षाचा नैष्ठिक कार्यकर्ता म्हणून मतप्रसाराच्या इर्ष्येनें. अर्थात् वर्तमानपत्राकडे त्यांनीं निव्वळ धंदा या दृष्टीनें पूर्वीं कधीं पाहिलें नाहीं. आणि आजहि ते पाहत नाहींत. वर्तमानपत्र ही एक शाळा आहे, तें एक सामर्थ्य आहे; व त्या शाळेचा आणि त्या सामर्थ्याचा सदुपयोग करून लोकमत सुशिक्षित आणि सुसंघटित करणें, हें वृत्तविशारदांचें कर्तव्य आहे असें त्यांना वाटतें. 'महाराष्ट्रां'त सिनेमाचें पान सुरू करण्या-संबंधीं मीं त्यांना एकदां आग्रहपूर्वक सुचविलें असतां त्यांनीं पटदिशीं मला उलट असें विचारलें कीं, "तुम्ही सिनेमाचं पेज सुरू करणार असाल तर मग भविष्य 'महाराष्ट्रां'त कां देऊं नये?" या प्रश्नात्मक उत्तरांतली खोंच अगदीं

उघड आहे. चित्रपटांचा लोकशिक्षणाला कितीहि उपयोग होण्यासारखा असला तरी आज जे चित्रपट निघतात, त्यांमुळें सामान्यतः असद्भावांच्याच परि-पोषाला जास्त मदत होतें, हें नाकारण्यांत अर्थ नाहीं; व म्हणूनच खपाच्या किंवा जाहिरातींच्या लोभानें सिनेमाचें सचित्र पेज 'महाराष्ट्रा'मध्यें घालण्यांत आणि भविष्याचें सदर सुरू करण्यांत आपल्या वर्तमानपत्राची अवनति आहे, असा त्यांचा अभिप्राय पडला.

वृत्तव्यवसायाविषयींच्या त्यांच्या या उदात्त कल्पनेमुळेंच 'महाराष्ट्रां'त कोणत्याहि प्रकारची कडक किंवा विपर्यासकारक टीका आलेली त्यांना आवडत नाहीं. त्यांच्या दृष्टीनें मराठी वृत्तविशारदांना योग्य असा टीकाविषय एकच; व तो म्हणजे हिंदुस्थानचा रक्तशोष करणारी परकी ब्रिटिश सत्ता आणि तिचे हिंदी हस्तक ! त्यांच्याव्यतिरिक्त अन्य विषयांवर टीकेची झोड उठविणें म्हणजे वर्तमानपत्राच्या सामर्थ्याची नाहक उधळपटी करणेंच होय. पंधरा वर्षांपूर्वी त्यांच्या हाताखालीं जेव्हां मी प्रथम काम करावयाला आलों तेव्हां माझ्या लेखणीची धार फाजील तीक्ष्ण होती; व त्यामुळें 'महाराष्ट्रां'-तील ग्रंथपरीक्षणें अतिशय निष्ठुर अशीं येत असत. मराठी वाङ्मय आणि लेखकवर्ग यांचे वाभाडे काढण्याची ही प्रवृत्ति त्यांना मुळींच पसंत नाहीं. ते नेहमीं म्हणतात, " आपल्या या परतंत्र देशांत कोणत्याहि नवीन उपक्रमा-ला राजाश्रय मिळण्याची आशा नाहीं. म्हणून वर्तमानपत्रांनींच लोकांना हरएक बाबतींत गुणग्राहक बुद्धीनें उत्तेजन दिलें पाहिजे. दोष अशा खुबीनें दाखवावेत कीं, माणसाला त्याचें वैगुण्य तर कळावें; पण तो नाउमेद मात्र होऊं नये. महाराष्ट्रांतल्या सगळ्या लोकोपयोगी उपक्रमांना वर्तमानपत्र हाच एक काय तो सद्यःस्थितींत आधार आहे."

अर्थात् व्यक्तिविषयक टीकेचेंहि त्यांना अगदीं वावडें आहे. विशेषतः महाराष्ट्रांतील ज्या व्यक्तींनीं कांहीं ना कांहीं लोकोपयोगी कार्य करून समाजा-च्या प्रगतीला हातभार लावला आहे. त्यांच्यावर आपल्या 'महाराष्ट्रां'तून अमर्याद टीका आलेली त्यांना अगदीं आवडत नाहीं. इतकेंच नव्हे तर कोणती व्यक्ति कितीहि टीकास्पद असो, तिचीं खाजगी बिंगें बाहेर काढून तीं चव्हाट्यावर चिवडीत बसण्याच्या प्रवृत्तीची तर त्यांना अत्यंत चीड आहे. म. गांधी यांचें तत्त्वज्ञान आणि कार्यपद्धति यांची 'महाराष्ट्रां'तून

त्यांनीं स्वतः जितकी पद्धतशीर शोभा केली आहे तितकी राष्ट्रीय पक्षाच्या दुसऱ्या कोणत्याहि वृत्तपत्रानें केली नसेल. पण गांधीजींच्या व्यक्तिविषयक चारित्र्याबद्दल 'महाराष्ट्रां'त एक अवाक्षरहि येऊं नये, याबद्दल ते तितकेच दक्ष असतात. कलकत्त्याच्या 'अमृतबझारपत्रिकें'त, खरे-प्रकरणाच्या ऐन धामधुमीच्या वेळीं, महात्माजी आणि डॉ. सुशीला नायर यांच्यासंबंधीं एका अमेरिकन पत्रांत आलेली टीका उद्धृत करण्यांत आली होती. त्या टीकेचा अनुवाद आम्हीं 'महाराष्ट्रां'त दिला. त्याच दिवशीं भरलेल्या हिंदु मुलींच्या कार्यकारिणीच्या सभेंत डॉ. सौ. इंदिराबाई नियोगी यांनीं त्या टीकेबद्दल दादांजवळ तक्रार केली. सभा आटोपून घरीं येतांक्षणींच त्यांनीं मला बोलावून रागारागानेंच विचारलें, "का हो, काय लिहिलें आहे तुम्हीं गांधीं-विषयीं आपल्या अंकांत ? इंदिराबाई तक्रार करीत होत्या माझ्याजवळ !" मीं त्यांना 'पत्रिके'च्या अंकांतील मूळ मजकूर वाचून दाखविल्यावर त्यांचा राग थोडा निवळला. पण, तत्क्षणींच त्यांनीं मला बजावलें कीं, "अमेरिकन पत्रें गांधींविषयीं काय वाटेल तें लिहितील! पण तुम्हीं असला मजकूर 'महाराष्ट्रां' त पुन्हा देतां कामा नये. गांधींच्या राजकारणावर सडकून टीका करा; पण असल्या गोष्टी आपल्या पत्रांत देऊं नका."

पण त्यांचा अगदीं रुद्रावतार असा जो मीं पाहिला, तो नागपुरांतील साहित्यसंमेलनाच्या वेळीं श्री. काकासाहेब खाडिलकर यांच्यावर 'महाराष्ट्रां'त आलेल्या टीकेच्या बाबतींत. श्री. खाडिलकर यांच्या अलीकडील राजकीय मतांविषयीं त्यांना काडीइतकाहि आदर नाहीं; व स्वतः त्यांनींच 'नवाकाळ'-वर 'महाराष्ट्रां'तून अनेकदां टीका केली आहे. पण साहित्यसंमेलनांतील काका-साहेबांच्या अध्यक्षीय भाषणाविषयीं आणि एकंदर वर्तनाविषयीं जी टीका 'महाराष्ट्रां'त आली ती अप्रशस्त असून शिवाय अगदीं चुकीचीहि होती. मी स्वतः संमेलनाला हजर राहूं शकलों नाहीं; व ती टीका संमेलनाला हजर असलेल्या आमच्या नेहमींच्या प्रतिनिधीनें लिहिलेली असल्यामुळें काळजीपूर्वक वाचून न पाहतां मीं ती छापून टाकली; पण दादांच्या लक्षांत ती टीका आल्यावर त्यांचा जो रुद्रावतार त्या दिवशीं प्रकट झाला, तो मी जन्मांत कधीं विसरणार नाहीं. ब्रह्मास्त्राविषयीं असें सांगतात, कीं तें अस्त्र एकदां आविर्भूत झालें, म्हणजे त्याच्यापुढें गुडघे टेकून त्याला प्राणिपात केल्याशिवाय

कांहीं मनुष्य त्याच्या तडाक्यांतून वांचत नाहीं. तसेंच एरवीं अत्यंत शांत दिसणाऱ्या दादांच्या रागाचेंहि आहे. मी त्या दिवशीं मुकाट्यानें माफी मागून मोकळा झालों. १९३१ सालीं 'तुतारी' पत्र बंद पडल्यावर माझे सहकारी श्री. बाळासाहेब ढवळे यांनीं त्यासंबंधीं एक मृत्युलेख-वजा उपरोधिक चुटका लिहिला. तो चुटका दृष्टीस पडल्यावर दादांना जो राग आला, तो कांहीं विलक्षणच! एका वर्तमानपत्रानें दुसरें वर्तमानपत्र बंद पडल्यावर त्याविषयीं आनंद व्यक्त करणें हें त्यांच्या मतें वृत्तपत्रीय शिष्टाचाराला सोडून होतें; व त्यामुळें त्यांना तो चुटका अगदीं अनुचित वाटला. त्यानंतर दोनतीन दिवस ते रागानें जणूं धुमसत होते. १९३० सालीं जंगलसत्याग्रहाच्या धामधुमींत नागपूर कॉंग्रेस कमिटीचे उपाध्यक्ष बिरूळचे श्री. बाबासाहेब देशमुख यांच्या जिव्हालौल्यावर माझे सहकारी श्री. बाबूराव उळाभाजे यांनीं एक विनोदी चुटका लिहिला. योगायोग असा, कीं तो चुटका ज्या दिवशीं 'महाराष्ट्रां'तून प्रसिद्ध झाला त्याच दिवशीं बाबासाहेबांना अटक झाली. मग त्या दिवशीं जें कोपास्त्र आमच्यावर सुटलें, त्याचा गुडघे टेकून 'क्षमस्व' म्हटल्यावरच किंचित् उपशम झाला!

अर्थात् दुसऱ्यावर टीका करण्याच्या बाबतींत जो संपादक सदभिरुचीला इतका जपणारा आणि हळवा आहे, त्याची 'अजातशत्रु' म्हणून कीर्ति व्हावी यांत नवल काय? पण, दुसऱ्यावर होतां होईतों टीका न करणें हा त्यांच्या सौजन्याचा एक भाग असला, तरी तो गौण आहे. त्यांच्या सौजन्याचा अत्यंत प्रभावी भाग म्हटला म्हणजे त्यांचें औदार्य हा होय. हें औदार्य वैचारिक आणि आर्थिक असें दुहेरी असून त्यामुळेंच ते नागपुरांत आज सर्व पक्षांना मान्य अशी शुभशक्ति (Power for good) होऊन बसले आहेत. त्यांच्या या वैचारिक औदार्यामुळेंच पक्षाभिमानापेक्षां राष्ट्राभिमानाला त्यांनीं आपल्या धोरणांत वरची जागा दिली असून, त्या पायीं 'केसरी'शीं सामना देण्याचा अत्यंत अप्रिय प्रसंगहि त्यांनीं अपरिहार्य म्हणून बिनदिक्कत पत्करला. 'महाराष्ट्र' पेक्षां 'केसरी' हा जास्त विद्वत्तापूर्ण आणि वाङ्मय-गुणसंपन्नहि असेल; पण, 'केसरी' पेक्षां सामाजिक, राजकीय आणि आर्थिक बाबतींत 'महाराष्ट्र' चा दृष्टिकोण अधिक व्यापक आणि प्रगमनशील असून, त्याचें श्रेय सर्वथैव दादांच्या वैचारिक औदार्यालाच खरोखरी

दिलें पाहिजे. सामाजिक बाबतींत ते कर्ते सुधारक आणि जगांतील नव्या विचारप्रणालीला अभिमुख असे आहेत. त्यांच्या छापखान्यांतच केवळ नव्हे, तर राहत्या घरांतहि हरिजन नोकरांचा संचार जितक्या मोकळेपणानें सर्वत्र होतो, तितका तो महाराष्ट्रांतल्या दुसऱ्या कोणत्याहि राष्ट्रीय किंवा कॉंग्रेसपक्षीय पुढाऱ्याच्या घरांत होत नसेल. स्वतःच्या मुलीचें आणि पुतणीचें लग्न करतांना त्यांनीं ब्राह्मणांतील पोटजाति मोडल्या; व त्यांच्या 'महाराष्ट्रां'त ब्राह्मणापासून महारापर्यंत सर्व जातींचे नोकर आहेत. सामाजिक बाबतींतील त्यांच्या उदार दृष्टिकोणाची निदर्शक अशी आणखी एक महत्त्वाची गोष्ट सांगतां येईल ती अशी कीं, त्यांचे तरुण स्नेही श्री. उमाकांत श्रीरंग देसाई यांनीं जेव्हां पंचवीस वर्षांपूर्वी पारशी युवतीशीं विवाह केला, तेव्हां दादांनीं त्या विवाहाला मंगलाशीर्वाद दिला होता. बिरूळचे श्री. बाबासाहेब देशमुख हे मला एकदां म्हणाले होते, कीं 'महाराष्ट्रा'च्या व्यापक सामाजिक धोरणा-मुळेंच नागपूर प्रांतांत ब्राह्मणेतर चळवळीची नांगी मऊ पडली."

त्यांच्या या मानसिक औदार्याला शोभेल असेंच त्यांचें दातृत्वहि आहे. 'महाराष्ट्रां'तून उत्पन्न होणारा पैसा हा 'महाराष्ट्रा'ची अभिवृद्धि आणि इतर अनेक प्रकारचीं लोकोपयोगी कार्यें यांवर खर्च झाला पाहिजे, अशा भावनेनें ते वागत असल्याचें मीं गेलीं पंधरा वर्षें पाहत आहे. त्याचें एक हृदयंगम प्रत्यंतर असें कीं, स्वतःच्या मुलींना त्यांचें प्रेम आणि पैसा यांचा फायदा जितका मिळाला नसेल, तितका तो 'महाराष्ट्रा'चें पाठचें भावंड जी हिंदु-मुलींची शाळा तिला लाभला आहे. १९२० सालच्या कॉंग्रेसनंतर 'महाराष्ट्रा'-च्या मागची योगक्षेमाची विवंचना कमी झालेली दिसतांच त्यांनीं प्रथम कांच-कारखाना आणि नंतर बरण्यांचा कारखाना काढला. गेल्या तीस वर्षांत त्यांनीं किती संस्थांना, किती चळवळींना, किती गुणी लोकांना आणि किती निराश्रित विद्यार्थ्यांना किती प्रकारांनीं साह्य केलें असेल, याचा हिशेब देणें कठीण आहे. त्यांच्या या निरंकुश दातृत्वबुद्धीमुळें 'महाराष्ट्रा'ला मात्र अद्याप यावें तितकें स्थैर्य आलेलें नाहीं आणि त्या संस्थेचीं अंगोपांगेंहि व्हावीं तितकीं परिपुष्ट झालेलीं नाहींत. आपल्याकडे कसल्याहि प्रकारच्या मदतीची याचना करावयाला येणाऱ्या माणसाला नकार देऊन परत लावणें हें त्यांच्या इतकें कांहीं जिवावर येतें, कीं त्यामुळें ते स्वतः पुष्कळदां अडचणींत

येतात व त्यांच्या हाताखालीं काम करणाऱ्या संपादकांवर आणि व्यवस्थापकांवर तर अनेकदां फजीत होण्याची पाळी येते. ते नकार देऊन कधीं कुणाला विन्मुख वाटेला लावीतच असतील तर ते फक्त राजकीय मतभेदामुळें. राष्ट्रीय पक्षांतून फुटून निघून, आपण स्थापन केलेल्या स्वतंत्र दिवाणगिरीच्या बाबतींत सहकार्य मागावयाला डॉ. राव हे मुद्दाम त्यांच्या घरीं श्री. केदार यांच्यासह आले असतां त्यांना दादांनीं दिलेला खणखणीत नकार हा त्यांच्या या प्रवृत्तीचें एक उज्ज्वल उदाहरण म्हणून सांगतां येईल. एरवीं त्यांच्या ठिकाणीं नकार देण्याचें सामर्थ्य जवळ जवळ नाहींच व त्या सामर्थ्याचा अभाव हा त्यांच्या अजातशत्रुत्वाच्या कीर्तीचा फार मोठा घटक आहे. नकार न देण्याच्या या त्यांच्या प्रवृत्तीमुळें होणारें 'महाराष्ट्रा'चें एकंदर नुकसान आणि आम्हां सर्वांना होणारा उपद्रव पाहिला, म्हणजे मला पुष्कळदां असें वाटतें कीं, कोंकणांतल्या या फणसाचे अमृतासारखे मधुर गरे बहुशीं बाहेरच्या लोकांच्या वाट्याला आले व त्याच्या छायेखालीं काम करणाऱ्या संपादकांना काय, व्यवस्थापकांना काय किंवा कुटुंबीयांना काय त्याच्या काट्यांचा खरखरीतपणा रात्रंदिवस सोसावा लागतो!

डॉ. राव यांनीं त्यांचें वर्णन 'साधे दिसणारे' (unassuming) या विशेषणानें केलें आहे; व तेंहि अत्यंत समर्पक आणि मार्मिक आहे, हें त्यांच्या हाताखालीं काम करणाऱ्या कोणत्याहि माणसाच्या सहज लक्षांत येईल. दादांचा वेष अतिशय बावळा आहे व त्यामुळें ते अतिशयच साधे दिसतात हें खरें. पण, ते साधे दिसले तरी वस्तुतः साधे नाहींत. उलट "वेष असावा बावळा। अंतरीं असाव्या नाना कळा" हे समर्थांचे उद्गार त्यांना अक्षरशः लागू पडतात. किंबहुना त्यांचा बावळा वेष हेंसुद्धां त्यांच्या उपरोधपटुतेचेंच एक अंग असावें! स्वतःच्या लोकोत्तर कर्तबगारीची आणि मध्यप्रांत-वऱ्हाडच्या सार्वजनिक जीवनांतील आपल्या श्रेष्ठस्थानाची त्यांना पूर्ण जाणीव आहे; पण त्याबरोबरच त्यांच्या उपरोधलोलुपबुद्धीला हेंहि जाणवत असावें कीं, जगांतल्या अत्यंत कर्तबगार माणसानेंहि आपल्या कर्तृत्वाकडे आणि यशाकडे तारतम्य भावानें पाहावें, उगाच उतून किंवा फुगून जाऊं नये. ता. १ मे १९४० रोजीं दुपारीं मुंबईला जाण्याच्या ऐन धांदलींत त्यांनीं जे चार शब्द 'ज्योत्स्ने'साठीं आपल्या हस्ताक्षरांत माझ्या

आग्रहामुळें मोठ्या अनिच्छेनें लिहून दिले, त्यांत त्यांची ही भावना उत्कृष्ट रीतीनें प्रतिबिंबित झाली आहे; व ते लिहीत असतांनाच मीं त्यांना म्हटलें कीं, 'हा तुमचा संदेश तुमच्या स्वभावाला शोभेसाच आहे.' अर्थात् त्यांची शालीनता ही कमावलेली आणि म्हणून अत्यंत मनोज्ञ आहे. या शालीनतेमुळेंच त्यांनीं आपला एकसष्टावा वाढदिवस किंवा 'महाराष्ट्रा'चा रौप्य-महोत्सव आम्हांला साजरा करूं दिला नाहीं. त्यांच्या या शालीनते-बरोबरच त्यांच्या स्वभावांतील आणखीहि एका विशेषाचा उल्लेख केला पाहिजे. हा स्वभावविशेष म्हणजे त्यांची मनस्विता. त्यांच्या मनानें एकदां एखादी गोष्ट घेतली म्हणजे मग ते त्या बाबतींत कुणाचेंहि ऐकावयाचे नाहींत. त्यांच्या प्रकृतींत अलीकडे उत्पन्न झालेलें पंगुत्व पाहून पुष्कळांना असें वाटतें कीं, 'महाराष्ट्रा'च्या धोरणावरील त्यांची पकड सैल पडली आहे व 'केसरी' आणि 'महाराष्ट्र' यांच्यामधील वादाच्या वेळीं खुद्द 'केसरी'कारांनींहि अशा समजुतीनें 'महाराष्ट्रा'च्या उपसंपादकांना कोपरखळी मारली होती; पण ही समजूत अगदीं चुकीची आहे. 'महाराष्ट्रां'तील बहुतेक साऱ्या महत्त्वाच्या विषयांचा परामर्श हा त्यांच्या मतानुसारच अजूनहि घेतला जातो व नागपुरास असले म्हणजे अग्रलेख बहुंशी ते स्वतःच लिहितात. त्यांचे एक बिनतोड प्रत्यंतर असें कीं 'केसरी'शीं 'महाराष्ट्रा'नें वाद करूं नये अशा मताचे आम्ही सामान्यतः सारे उपसंपादक असतांना त्यांनीं स्वतः रुग्ण-शय्येवरून तो वाद मोठ्या ईर्ष्येनें चालविला! दादांच्या या विलक्षण मनस्वी स्वभावामुळें 'महाराष्ट्रा'ला अद्याप संस्थेचें स्वरूप न येतां तें एका परीनें संस्थान राहिलें आहे.

संपादकीय कर्तबगारीच्या दृष्टीनें त्यांची गणना आगरकर, टिळक, परांजपे, केळकर, खाडिलकर आणि अच्युतराव कोल्हटकर या महाराष्ट्रांतील अग्रगण्य संपादकांच्या प्रणालिकेंत करावी लागेल; व सर यज्ञेश्वर चिंतामणी यांनीं 'लीडर' पत्र काढून युक्तप्रांतांत जसें लोकजागृतीचें कार्य केलें, तसें दादा-साहेबांनीं 'महाराष्ट्र' काढून मध्यप्रांत-वऱ्हाडांत केलें आहे. त्यांची लेखन-शैली ही केळकर किंवा खाडिलकर यांच्या लेखनशैलीपेक्षां, परांजपे आणि कोल्हटकर यांच्या लेखनशैलीला अधिक जवळ असल्याचें आढळेल. वर्तमान-पत्रांतील लिखाण हें जितकें विद्वत्ताप्रचुर, तितकें तें सामान्य वाचकवर्गाच्या

आटोक्यापलीकडचें असतें. शिवाय, एखादा विचार लोकांच्या मनावर बिंबवायचा म्हणजे तो खुलवून सांगण्याकरितां पुनरुक्ति किंवा पाल्हाळ हाहि अपरिहार्य असतो. दादांची लेखनशैली अतिशय सोपी, किंचित् पाल्हाळिक पण अत्यंत खोंचदार आहे; व अच्युतरावांप्रमाणें पांच कॉलमी अग्रलेखापासून तों एकांकी प्रहसनापर्यंत उपरोध, कल्पकता आणि आवेश यांनीं युक्त असें नाना प्रकारचें लिखाण 'महाराष्ट्रा'च्या रकान्यांतून गेल्या पंचवीस वर्षांत त्यांनीं पैदा केलें आहे. निवडणुकीच्या हंगामांत टेबलापाशीं एका पायावर उभें राहून आठ-आठ, दहा-दहा तास अखंड लिहितांना मीं त्यांना पाहिलें आहे. अशा भाऊ-गर्दीच्या वेळीं वारंवार विझणारी विडी पेटविण्याच्या किंवा पानाला चुना लावण्याच्या निमित्तानें जी काय विश्रांति त्यांच्या बोटांना मिळेल, तेवढीच! एरवीं किरटीं वळणदार अक्षरें कुरुकुरु प्रसवणाऱ्या त्यांच्या टाकाची गति अखंड चालावयाची आणि 'महाराष्ट्रा'चा अंक अक्षरशः एकटाकी निघावयाचा. प्रकृतीच्या पंगुतेमुळें त्यांच्या हातून अलीकडे पूर्वीइतकें लिहिणें होत नाहीं. तरीसुद्धां अजूनहि एखाद्या मंगळवारीं किंवा शनिवारीं सकाळीं सातपासून तों सायंकाळीं चारपर्यंत निरनिराळ्या कामाच्या लकडयांतून सवड काढून चारपांच कॉलम मजकूर ते लिहितात आणि अंक डाकेच्या वेळेवर काढण्यासाठीं धडपडत असलेल्या आपल्या मॅनेजिंग एडिटरला रडकुंडीला आणतात. त्यांच्या सुबोध, खोंचदार आणि जोरकस लेखनशैलीमुळेंच 'महाराष्ट्र' इतका लोकप्रिय झाला असून, मध्यप्रांत-वऱ्हाडांत प्रांतिक सरकारला प्रतिस्पर्धी अशी ती एक राष्ट्रशक्ति होऊन बसली आहे.

उदार दृष्टिकोन, व्यापक सहानुभूति, परमतसहिष्णुता आणि राष्ट्राच्या सर्वांगीण सुधारणेविषयीं जिवंत कळकळ या गुणांमुळें त्यांचा 'महाराष्ट्र' आज मराठी वर्तमानपत्रांत आघाडीला राहिला आहे; व त्यांचें स्वतःचेंहि आयुष्य सर्व बाजूंनीं यशस्वी झालें आहे. हे त्यांचे गुण जर या मंगलप्रसंगीं आम्हीं उचलले नाहींत, तर त्यांच्या हाताखालीं वृत्तव्यवसायाचें शिक्षण व्यर्थ घेतलें, असें होईल.

आशा, ९ जून १९४०

---

# सिनफेन चळवळीची मीमांसा : : ६

## (१)

"Live Ireland—Perish the Empire" —*Grattan*

महायुद्धाचा वणवा शांत झाल्यापासून आयर्लंडांतील सिनफेन पक्षाच्या चळवळीनें धारण केलेल्या विराट् स्वरूपाकडे आज सर्व जगाचें लक्ष वेधलें आहे. सिनफेन चळवळीला आज जें विराट् स्वरूप प्राप्त झालें आहे, त्याची कल्पनाहि त्या चळवळीच्या प्रवर्तकांना आरंभीं कदाचित् आली नसेल. ब्रिटिश सरकारशीं सहकारिता केल्यानें आपला निभाव लागणें शक्य नाहीं असा अनुभव महायुद्धाच्या ऐन गर्दींत आल्यामुळें, आयरिश जनतेला सिनफेन पक्षाचीं तत्त्वें पटलीं आणि तेव्हांपासून सिनफेन चळवळीला तेज चढूं लागलें. स्वावलंबन हाच स्वातंत्र्यप्राप्तीचा एकमेव उपाय आहे असें सिनफेन पक्षाचें मत असून, या पूर्ण स्वावलंबनाच्या तत्त्वावरच सिनफेन चळवळीची उभारणी झालेली आहे. इंग्लंडच्या साम्राज्यछत्राच्या सावलीखालीं आयर्लंडची स्वतंत्र आणि पूर्ण वाढ होणें अशक्य आहे अशी खात्री झाल्यामुळें, सिनफेन पक्ष आयर्लंडच्या निर्भेळ स्वातंत्र्याचा पुरस्कार करितो. हिंदुस्थानांत ज्या साम्राज्यनिष्ठेचें एवढें स्तोम माजविण्यांत येतें, त्या साम्राज्यनिष्ठेला आयर्लंडांत आतां कोठेंहि थारा उरलेला नाहीं.

स्वावलंबनाचें खडतर असिधाराव्रत आचरून आयर्लंडला पूर्ण स्वातंत्र्य प्राप्त करून घ्यावयाचें हें सिनफेन पक्षाचें ध्येय कांहीं नवीन नाहीं. पंधराव्या शतकाच्या अखेरीस इंग्लंडची राजसत्ता आयर्लंडवर कायद्यानें स्थापित झाल्या काळापासून तों आतांपर्यंत आयरिश जनतेच्या अंतःकरणांत ही पूर्ण स्वातंत्र्याची आकांक्षा निरंतर जागृत आहे. १७८२ सालीं आयरिश पार्लमेंटला स्वातंत्र्य दिल्यानंतर आयर्लंडच्या आर्थिक उत्कर्षाविषयीं इंग्लंडनें जें असहिष्णुतेचें धोरण स्वीकारिलें, आणि ज्या धोरणाचें पर्यवसान अखेर आयरिश पार्लमेंटचें स्वातंत्र्य नष्ट होण्यांत झालें, त्या धोरणानें आयरिश जनतेच्या अंतःकरणांतली ही पूर्ण स्वातंत्र्याची आकांक्षा दृढतर केली. इंग्लंडच्या स्वार्थी धोरणाचा असा अनुभव येऊन हताश झाल्यामुळेंच 'इंग्रजी साम्राज्य गेलें—नष्ट झालें तरी बेहत्तर, आयर्लंड जगलें पाहिजे—स्वतंत्र झालें पाहिजे!' असे तळमळीचे उद्गार ग्रॅटनसारख्या जबाबदार लोकनायकाच्या मुखांतून बाहेर पडूं लागले. सिनेफन चळवळीच्या आजच्या यशाचें रहस्य या अनुभवांत आणि या उद्गारांतच भरलेलें आहे. आयर्लंडला नुसतें स्वतंत्र पार्लमेंट मिळूनहि आयर्लंडची धार्मिक आणि आर्थिक स्थिति बदलत नाहीं, असें पाहून निराश झालेल्या वुल्फटोननें आयर्लंडच्या मानेवर असलेलें हें इंग्रजी पार्लमेंटच्या जुलमाचें जूं झुगारून देण्याच्या उद्देशानें १७९८ सालीं बंड केलें. वुल्फटोनच्या या प्रयत्नाला यश न येऊन अखेर १८०० सालीं इंग्रजी मुत्सद्द्यांच्या कुटिल नीतीनें आयरिश पार्लमेंट मात्र नाहींसें झालें. सनदशीर साधनांचा अवलंब करणारा 'चळवळ्या' ग्रॅटन आणि निराश होऊन शस्त्र उपसणारा 'बंडखोर' वुल्फटोन यांचे मार्ग कितीहि भिन्न असले, तरी त्यांचें ध्येय मात्र अगदीं एक होतें.

राष्ट्राच्या स्वातंत्र्याकरितां निर्दोष रक्ताचा एक थेंब सुद्धां सांडणें योग्य नाहीं असें प्रतिपादणारा डॅनियल ओकोनेल आणि आयर्लंडच्या स्वातंत्र्याकरितां रक्ताचा सडा शिंपणारा जॉन मिचेल या उभय देशभक्तांनीं आपल्या वाणीनें आणि करणीनें, अत्यंत प्रतिकूल काळांत सुद्धां, हें पूर्ण स्वातंत्र्याचें ध्येय आयर्लंडच्या दृष्टीपुढून हलूं दिलें नाहीं. पूर्ण स्वातंत्र्याच्या या ध्येयाला, इंग्रजी पार्लमेंटला मानवेल असें शक्यतेचें व्यवहार्य स्वरूप देण्याच्या बुद्धीनें, १८७० सालीं आयझॅक बटनें होमरूलची चळवळ अस्तित्वांत आणली.

स्वतः आयझॅक बटला इंग्लंड आणि आयर्लंड यांचा संबंध तुटणें अवश्य आणि इष्ट वाटत नव्हतें. परंतु बटनें आरंभिलेली ही होमरूलची चळवळ कार्यक्षम करून दाखविणारा तडफदार पुढारी पार्नेल याचें मत मात्र बटच्या अगदीं पूर्ण विरुद्ध होतें. 'राष्ट्राच्या प्रगतीला मर्यादा घालणें अशक्य आहे,' असें त्याचें मत होतें; व या मताला अनुसरून 'पूर्ण स्वातंत्र्याच्या मार्गावरील होमरूलची मागणी हें पहिलें पाऊल आहे' असें तो स्पष्ट म्हणत असे. पण सनदशीर चळवळ यशस्वी करून दाखविण्याकरितां धडपडत असतांना सुद्धां आयर्लंडच्या या अंतिम ध्येयाचा विसर पार्नेल याला पडला नाहीं. या त्याच्या तडफेला, तेजस्वितेला आणि तत्त्वनिष्ठेला भुलूनच जेम्स स्टीफन्सननें आरंभिलेल्या 'फीनियन' नामक क्रांतिकारक चळवळीच्या पुरस्कर्त्यांनीं, आपला बंडाचा उद्देश बाजूला ठेवून, पार्नेलनें पार्लमेंटांत चालविलेल्या होमरूलच्या सनदशीर चळवळीला मनःपूर्वक साहाय्य केलें. पार्नेलची तत्त्वनिष्ठा आणि तेजस्विता अशी अद्वितीय होती म्हणूनच त्याच्या अमदानींत आयर्लंडांतील सर्व पक्षांची अभूतपूर्व अशी एकी घडून येऊन त्याच्या चळवळीला केवळ अलौकिक असें यश आलें.

पार्नेलच्या मृत्यूनंतर ही परंपरा सुटली; व त्याचा पक्ष होमरूलच्या या किमान मागणीवरच सर्व भर देऊन इंग्लंड आणि आयर्लंड यांचा संबंध कायम राहावा असें म्हणूं लागला. पार्नेलचा पक्ष—आयरिश राष्ट्रीय पक्ष—या पूर्ण स्वातंत्र्याच्या ध्येयापासून च्युत होतांच त्या पक्षाची लोकप्रियता ओसरूं लागली. सिनफेन पक्षाच्या उत्कर्षाला आरंभ या आयरिश राष्ट्रीय पक्षाच्या अपकर्षापासूनच झाला. पूर्ण स्वातंत्र्याच्या या ध्येयाप्रमाणें स्वावलंबनाचें तत्त्वहि जुनेंच आहे. डॅनियल ओकोनेलच्या धरसोडीच्या धोरणाला विरोध करणारा आयरिश देशभक्त डेव्हिस यानें 'स्वातंत्र्याकरितां धडपडणाऱ्या मनुष्याचा स्वावलंबन हाच एक आधार आहे' ही कल्पना आयरिश जनतेच्या मनावर बिंबविण्याचा प्रथम प्रयत्न केला. परंतु डेव्हिसची ही स्वावलंबनाची कल्पना अगदीं परवांपर्यंत—पार्लमेंटांतील चळवळीवरील विश्वास पूर्ण उडेपर्यंत—आयरिश जनतेच्या आचरणांत उतरली नाहीं. या तत्त्वाचा पुरस्कार सिनफेन पक्षानें अगदीं आरंभापासून केला; व कालाच्या अनुकूलतेनें आणि सिनफेन पक्षाच्या उद्योगानें या तत्त्वाचा अखेर जय होऊन आयरिश जनतेनें सरकारशीं सहकारिता करण्याचें आज सोडलें आहे.

आयर्लंडांतील क्रांतिकारक पक्ष, राष्ट्रीय पक्ष आणि सिनफेन पक्ष यांची आयर्लंडच्या अंतिम ध्येयासंबंधानें जरी अशी एकवाक्यता असली, तरी साधनां-संबंधानें त्यांचा अगदीं परवांपर्यंत तीव्र मतभेद होता. आणि आजहि सिनफेन चळवळीच्या रणघोषांत हा 'मतामतांचा गलबला' जरी विरल्यासारखा दिसतो आहे, तरी तो समूळ नष्ट झालेला नाहीं. क्रांतिकारक आणि राष्ट्रीय या दोनहि पक्षांचे मार्ग सिनफेन पक्षाला सारखेच अमान्य आहेत. क्रांतिकारक पक्षाचा बंडाचा उपाय सिनफेन पक्षाला बिलकुल पसंत नाहीं. रणांगणावर एकवटलेल्या इंग्रजी साम्राज्याच्या अफाट लष्करापुढें शस्त्रें वापरण्याचा सराव नसलेल्या मूठभर बेशिस्त बंडखोरांचा टिकाव लागणें शक्य नाहीं, असा अनुभव १८४८ व १८६७ सालच्या बंडांच्या वेळीं आला. आयर्लंडला इंग्रजी साम्राज्याच्या दराऱ्यामुळें परकी देशांकडूनहि मदत होणें शक्य नाहीं. हा अनुभव आणि ही परिस्थिति लक्षांत घेऊन बंडाविषयीं बडबड न करितां त्या मार्गाचा त्याग करणेंच उचित आहे, असें सिनफेन पक्षाचें मत आहे. स्वातंत्र्याकरितां निर्दोष रक्ताचा एक थेंबहि सांडणें प्रशस्त नाहीं ही जी डॅनियल ओकोनेलची उक्ति आहे, त्या उक्तीशीं मात्र सिनफेन पक्षाच्या या मताचा बिलकुल संबंध नाहीं. उलट 'बंड करणें हाहि एक स्वातंत्र्यप्राप्तीचा सनदशीर उपाय आहे' असें सिनफेन पक्ष उघड उघड प्रतिपादन करितो. मात्र बंड करून स्वातंत्र्य प्राप्त होणें अशक्य आहे अशी खात्री पटल्यामुळेंच सिनफेन पक्षाला बंड नको; केवळ अशक्यतेच्या मुद्द्यावरच सिनफेन पक्षाचा बंडाला विरोध आहे. बंड करून कार्यसिद्धि होईल असें निश्चित वाटलें, तर सिनफेन पक्ष बंड करावयाला बिलकुल मागें घेणार नाहीं. अशक्यतेच्या मुद्द्यावर सिनफेन पक्षाचा जसा बंडाला विरोध आहे, तसाच पार्लमेंटांत राष्ट्रीय पक्षानें चालविलेल्या होमरूलच्या चळवळीलाहि आहे. इंग्रजी साम्राज्याच्या अफाट लष्करापुढें मूठभर आयरिश बंडखोरांना रणांगणावर जय मिळणें जितकें अशक्य आहे, तितकेंच इंग्रजी पार्लमेंटांत सहाशें इंग्रज सभासदावर ऐंशी आयरिश सभासदांना कायमचा शह ठेवितां येणेंहि अशक्य आहे.

अशा रीतीनें आयर्लंडला स्वातंत्र्याची प्राप्ति रणांगणावर किंवा पार्लमेंटच्या सभागृहांत धडपडून होणार नाहीं; आयर्लंड स्वावलंबी झालें तरच ती होईल, असा सिनफेन पक्षाचा निर्णय आहे. इंग्लंडांतील पक्षभेदांचा फायदा मिळेल

अशी अपेक्षा करून पार्लमेंटांत चळवळ करण्यांत कांहीं हशील नाहीं; कार
सामान्यतः इंग्लंडांतील सर्व पक्षांना आयर्लंडच्या हिताविषयीं सारखी
अनास्था आहे. अशा स्थितींत आयर्लंडनें सरकारशीं सहकार्य न करत
स्वतःच्या पायांवर उभें राहावें हेंच श्रेयस्कर. क्रांतिकारक पक्ष आणि राष्ट्री
पक्ष यांच्याशीं सिनफेन पक्षाचा असा हा तीव्र विरोध आहे. सरकारश
असहकार करणें पूर्ण सनदशीर आहे असें सिनफेन पक्ष मानतो. १८०
सालीं ज्या कायद्यानें स्वतंत्र आयरिश पार्लमेंटचें अस्तित्व नाहींसें होऊ
आयर्लंड इंग्रजी पार्लमेंटच्या अधिकाराखालीं आलें, तो कायदा सिनफेन प
बिलकुल मानीत नाहीं. १७८२ सालीं ज्या कायद्यानें आयर्लंडला स्वत
पार्लमेंट मिळालें, तो कायदाच फक्त मानून त्या कायद्याप्रमाणें सिनफेन प
आपल्या सर्व चळवळी स्वतंत्रपणानें चालवितो. या दृष्टीनें सिनफेन पक्षान
प्रत्येक चळवळ सनदशीर आहे. आयर्लंडांत पूर्ण लोकसत्ताक राज्यपद्धत
(Republic) स्थापणें हेंहि सिनफेन पक्षाला आरंभीं संमत नव्हे
१७८२ सालच्या कायद्याप्रमाणें आयर्लंडांत नियंत्रित राजसत्ता पुन्हा स्थाप
करावी असा त्या पक्षाचा अगदीं आरंभीं आग्रह असे. या आग्रहामु
आयर्लंडांतील पूर्ण लोकसत्ताक राज्यपद्धतीचा पुरस्कार करणारे क्रांतिकार
व मजूर हे दोन पक्ष सिनफेन पक्षाशीं अगदीं फटकून वागत असत. प
महायुद्धाच्या आरंभापासून हा आग्रह कमी कमी होत जाऊन, अखेर १९१
सालच्या नोव्हेंबरमध्यें भरलेल्या सिनफेन कन्व्हेन्शनमध्यें स्वतंत्र लोकसत्ता
राज्यच (Independent Irish Republic) आयर्लंडांत स्थाप
करण्याचा ठराव मंजूर झाला. या ठरावानें सिनफेन पक्ष, क्रांतिकारक पक्ष
मजूर पक्ष या तीन पक्षांतील विरोध कमी झाला.

सिनफेन पक्षाचें ध्येय, तत्त्वें आणि साधनें यांत नवीन असें कांहींच नाह
जें कांहीं नावीन्य, जी कांहीं अपूर्वाई आहे, ती सर्व, जीं तत्त्वें आजपर
केवळ कल्पनांच्या सदरांत मोडत होतीं, त्यांना व्यवहारांत यशस्वी कर
दाखविणाऱ्या त्या पक्षाच्या कार्यपद्धतींत आहे. आपल्या कल्पना आ
आपली कार्यपद्धति लोकप्रिय करण्याकरितां सिनफेन पक्षाला प्रचलित कल्पनां

त्याच्या पक्षाला इतकें तेज चढलेलें दिसत आहे. १८९९ सालीं ऑर्थर ग्रिफिथनें आपल्या मतांचा प्रसार करण्याकरितां 'युनाइटेड आयरिशमन' हें पत्र काढलें. अवघ्या अर्ध शतकापूर्वी जॉन मिचेल यानें जें पत्र आपल्या मतांच्या प्रसाराकरितां काढिलें होतें, त्याच 'युनाइटेड आयरिशमन' पत्राचा होमरूल चळवळीच्या बदललेल्या मनूंत त्याच मतांच्या पुनरुज्जीवनाकरितां हा पुनर्जन्म झाला होता. मिचेलनें आपल्या अमोघ आणि वीर्यवती वाणीनें ज्या मतांचा प्रसार करण्याकरितां जन्मभर अविश्रान्त श्रम केले, त्याच मतांना, त्या वेळच्या नवीन मनूला साजेल असें वळण देऊन, लोकप्रिय करण्याकरितां हें पत्र निघालें होतें. पार्नेलच्या मृत्यूनंतर राष्ट्रीय पक्षाची तत्त्वनिष्ठा ढळल्यामुळें राष्ट्राची जी दिशाभूल सहजच होत होती तिला आळा घालावा म्हणून ग्रिफिथची ही धडपड होती. अर्थात् राष्ट्रीय पक्षावर प्रहार करावयाला या पत्रानें प्रथमपासूनच प्रारंभ केला. आयर्लंडच्या अंतिम ध्येयाला जें जें म्हणून अहितकारक आहे असें ग्रिफिथला वाटलें, तें तें सर्व नष्ट करण्याचा त्यानें, या आपल्या वागस्त्रानें प्रयत्न केला. आयर्लंडांतील बहुतेक सर्व संस्थांवर त्यानें योग्य कारणांस्तव कडक टीका केली. लोकांना पटो अगर न पटो, सत्य असेल तें लिहावयाचें असें साहसाचें सत्यव्रत त्यानें आचरिलें. आयर्लंडच्या कॅथॉलिक गुरूंनीं लोकांचें जें द्रव्यशोषण त्या वेळीं चालविलें होतें, त्याची गय त्यानें बिलकुल केली नाहीं. ट्रान्सव्हालमध्यें स्थापन झालेल्या बोअर लोकांच्या लोकसत्ताक राज्याविरुद्ध इंग्लंडनें जी जुलुमाची मोहीम काढिली होती, तिचा निषेध ग्रिफिथनें अत्यंत कठोर शब्दांनीं केला. 'इंग्लंडनें आपल्या साम्राज्याच्या विस्ताराकरितां आपलें रक्त सांडावें, आयर्लंडच्या रक्ताचा एकहि थेंब इंग्लंडचें जुलमी तख्त ट्रान्सव्हालमध्यें स्थिर होण्याकरितां सांडतां कामा नये', असा स्पष्ट उपदेश त्या वेळेस त्यानें आयरिश जनतेला केला; व रिक्रूट-भरतीची खटपट हाणून पाडली. असें वर्तमानपत्र सरकारच्या कृपेला वारंवार कसें पात्र होत असतें, हें वर्तमानपत्राच्या कायद्यानें मुद्रणस्वातंत्र्याला मुकलेल्या हिंदी लोकांना स्वानुभवानें पूर्ण माहीत आहे. अशा स्थितींत १९०६ साल-पर्यंत हें वर्तमानपत्र सरकारनें उपस्थित केलेल्या सर्व संकटांना तोंड देऊन ग्रिफिथनें चालविलें.

ग्रिफिथचें हें पत्र राजकारणाप्रमाणें इतर सर्व विषयांचा कसा योग्य परामर्श

घेत असे, हेंहि येथें सांगणें अवश्य आहे. हिंदुस्थानांतील बहुतेक वर्तमान-पत्रांत केवळ चालू राजकारणाची उथळ आणि प्रासंगिक चर्चा येत असते; व आपल्या मताहून भिन्न मताच्या प्रदर्शनाला तर येथील पत्रें बहुधा अवसर देत नाहींत. वर्तमानपत्रांची अशी हीन स्थिति आयर्लंडांत कधींहि नव्हती. आयर्लंडांतील बहुतेक उत्तम लेखकांचे लेख ग्रिफिथच्या पत्रांत आलेले आहेत. तत्त्वज्ञान, काव्य, नाट्य आणि इतिहास या विषयांची चर्चा आणि भिन्न मतांचें प्रदर्शन या पत्रांतून नेहमीं होत असे. आयर्लंडचे जगद्विख्यात कवि आणि नाटककार यीट्स यांचें एक सुंदर नाटक व बेस्ट या नामांकित लेखकाची जुन्या आयरिश पोवाड्यांवरील लेखमाला याच पत्रांतून प्रसिद्ध झाली. युरोपियन राजकारणाची चर्चाहि, आयरिश हितसंबंधांच्या दृष्टीनें, हें पत्र नियमानें करीत असे. अशा तऱ्हेचें हें उत्कृष्ट पत्र अंदाजाहून अधिक काळ चालून सरकारी हुकुमानें अखेर १९०६ सालच्या एप्रिल महिन्यांत बंद पडलें! सिनफेन मतांचा फैलाव करण्याकरितां या पत्राचा फार उपयोग झाला. हें पत्र निघालें तो व त्याच्या पुढील आणखी पंधरा वर्षांचा काळ हा पार्लमेंटांतील चळवळीच्या आशेचा व आस्थेचा काळ होता. या काळांत आयर्लंडांतील बहुजनसमाजाचें लक्ष पार्लमेंटांतील होम-रूलच्या झटापटीकडेच सर्वस्वी वेधलें होतें. अर्थातच या काळांत सिनफेन मतांचा नुसता प्रचार होण्यापलीकडे विशेष कांहीं घडलें नाहीं. होमरूलच्या मागणीसंबंधानें ब्रिटिश मुत्सद्द्यांनीं चालविलेली प्रतारणा अद्यापि उघडी पडली नव्हती; व त्यामुळें बहुजनसमाज, किमान मागणीच कां होईना, परंतु ती तरी पदरांत पडेल अशा भरंवशानें राष्ट्रीय पक्षावर लुब्ध होता!

बहुजनसमाजानें अशी अनास्था दाखविली, तरी ग्रिफिथनें आपल्या प्रारब्ध कार्याचा परित्याग केला नाहीं. १९०० सालच्या ऑक्टोबर महिन्यांत त्यानें 'क्युमन न गाधल' (Cumann Nan Gaedhal) ही संस्था स्थापन केली. आयरिश वाङ्मय, कलाकौशल्य, उद्योगधंदे यांना उत्तेजन देऊन आय-रिश जनतेंत बंधुभाव वाढवावयाचा असा या संस्थेचाउद्देश होता. राजकारणा-कडे राष्ट्राला ज्या ध्येयाचा निदिध्यास लागून राहिला होता त्या ध्येयाकडे, ज्यांचा जीव ओढत असे त्यांना या संस्थेविषयीं जिव्हाळा वाटणें शक्य नव्हतें.

रसरसत नव्हतें. ही मोहिनी त्या संस्थेंत ग्रिफिथनें लवकरच ओतिली. १९०२ सालच्या ऑक्टोबरांतील वार्षिक संमेलनांत भाषण करतांना ग्रिफिथनें, इंग्रजी पार्लमेंटावरील बहिष्काराच्या धोरणाचा पुरस्कार करून, पार्लमेंटांत होमरूलची चळवळ करणाऱ्या आयरिश राष्ट्रीय पक्षाला हाणून पाडण्याचा आपला संकल्प जाहीर केला! ऑस्ट्रियन पार्लमेंटवर बहिष्कार घालून हंगेरीला स्वायत्त करण्याची ण्याची जी विलक्षण प्रभावी चळवळ हंगेरियन देशभक्त फ्रान्ज डीक (Franz Deak) यानें केली, त्या चळवळीवरूनच हें बहिष्काराचें धोरण सुचलें होतें; व म्हणून त्याला 'हंगेरियन धोरण' (Hungarian Policy) असें म्हणत असत. या धोरणाचें समर्थन करण्याकरितां ग्रिफिथनें 'हंगेरीचें पुनरुत्थान' (The Resurrection of Hungary) हें पुस्तक लिहिलें. या पुस्तकांत हंगेरियन चळवळीचा इतिहास देऊन तें धोरण आयर्लंडला कसें उपकारक होईल हें जोरदार भाषेंत सिद्ध केलें होतें. परंतु या समर्थनाचा विशेष परिणाम झाला नाहीं; व इंग्रजी पार्लमेंटावर आयरिश सभासदांनीं बहिष्कार घातल्यानें आयर्लंडच्या राज्यकारभाराला कांहींहि अडथळा होणार नाहीं या मुद्द्यावर त्या धोरणाचा उपहास झाला. या विरोधानें खचून न जातां सिनफेन पक्षाला स्थैर्य यावें म्हणून ग्रिफिथनें १९०५ सालच्या नोव्हेंबरांतील अठ्ठावीस तारखेला 'नॅशनल कौन्सिल' (National Council) ही संस्था स्थापन केली. स्वावलंबनाच्या जोरावर आयर्लंडला स्वतंत्र करावयाचें हें या संस्थेचें ध्येय होतें. यानंतर लवकरच 'युनाइटेड आयरिशमन' पत्र बंद पडून 'सिनफेन' हें नवें पत्र निघूं लागलें; व अशा रीतीनें संघटित सिनफेन पक्ष जन्माला आला.

'केसरी', १८ जानेवारी १९२१

# सिनफेन चळवळीचा उदय

## ( २ )

कल्पनांच्या आणि तात्त्विक विचारांच्या धुक्यांतून बाहेर पडलेल्या या सिनफेन पक्षाचा प्रचलित राजकारणाच्या क्षितिजावर ज्या वेळीं उदय झाला, त्या वेळीं त्याची प्रभा अत्यंत मंद होती. आयर्लंडांतील क्रांतिकारक पक्षाचा त्या वेळीं अगदीं लोप झालेला होता. शतकानुशतकें पारतंत्र्यांत पिचत पडलेल्या दुर्दैवी राष्ट्रांतील बहुजनसमाजाला बंडाच्या कल्पना आणि कथा फार रम्य वाटत असतात. आयरिश क्रांतिकारक पक्षावर आयर्लंडांतील बहुजनसमाजाचें विशेष प्रेम होतें. रक्तपात हा केव्हांहि वाईटच. परंतु परतंत्र राष्ट्राच्या उद्धाराकरितां अत्यंत निःस्वार्थ बुद्धीनें प्रेरित होऊन ज्या वेळीं रक्तपात केला जातो, त्या वेळीं रक्तपाताला स्वातंत्र्यदेवतेच्या रुधिराभिषेकाचें मंगल स्वरूप प्राप्त होत असतें. आयर्लंडांतील इंग्लंडच्या जुलमी राजसत्तेच्या जन्माबरोबरच त्या सत्तेच्या अंत्येष्टीचे मंत्र जपणारा क्रांतिकारक पक्ष अस्तित्वांत आला. वुल्फटोन, एमेट, ओब्रायन या 'बंडखोर' देशभक्तांच्या विलक्षण स्वार्थत्यागानें आणि विशुद्ध चारित्र्यानें आयरिश क्रांतिकारक पक्षाच्या परंपरेला आणि इतिहासाला एक प्रकारचें हृदयंगम उदात्तत्व आलें आहे. आयर्लंडांतील बहुजनसमाजाचें क्रांतिकारक पक्षावर यामुळें सहजच विशेष प्रेम आहे. बंडाच्या कल्पना

आणि कथा यांच्याविषयीं बहुजनसमाजांत असणारी ही स्वाभाविक आवड परतंत्र राष्ट्रांतील वीरवृत्ति, जरी जागृत नाहीं तरी जिवंत ठेवावयाला, निदान मरूं न देण्याला तरी, खचित उपयोगी पडते.

आयर्लंडांतील बहुजनसमाजाचें जितकें क्रांतिकारक पक्षावर प्रेम आहे, तितकेंच जवळ जवळ सनदशीर चळवळ करणाऱ्या राष्ट्रीय पक्षावरहि होतें, असें म्हटलें तरी चालेल. ग्रॅटन, ओकोनेल आणि पार्नेल यांच्या अप्रातिहत प्रयत्नांनीं राष्ट्रीय पक्षाच्या चळवळीला अनेक वेळां थोडेंबहुत यश आलें असल्याकारणानें आयरिश जनतेचा राष्ट्रीय पक्षावर आणि त्या पक्षाच्या चळवळीवर लोभ आणि विश्वास असे. क्रांतिकारक पक्षाचें अलौकिक उदात्तत्व आणि राष्ट्रीय पक्षाचें प्रासंगिक यशस्वित्व यांचा आयरिश जनतेला अनुभव आला होता. नवीन जन्मास आलेल्या सिनफेन पक्षाला उदात्त परंपरा नव्हती; व त्याच्या कार्यपद्धतीचें फलदायित्वहि अद्यापि अनुभवाला आलेलें नव्हतें. उलट तो पक्ष बंडाचा व पार्लमेंटांतील चळवळीचा सारखाच उपहास करतो, एवढें मात्र आयरिश जनतेला दिसे! हा उपहास आयरिश जनतेला रुचणें त्या वेळीं शक्य नव्हतें; कारण राष्ट्रीय पक्षाच्या चळवळीवरील तिचा विश्वास अद्यापि उडाला नव्हता. आयर्लंडच्या फायद्याचे कायदे त्या वेळीं पार्लमेंटांत होत होते व नवीन ठराव येत होते; होमरूलचा हप्ताहि आतां, निकरानें व निर्धारानें चळवळ केल्यास, खात्रीनें पदरांत पडेल अशी आशा जनतेला वाटत होती. अर्थातच सिनफेन पक्षाचा उपहास बहुजनसमाजाला मानवेना. उलट राष्ट्रीय पक्षाच्या चळवळीलाच आतां सर्वस्वी प्रोत्साहन देऊन ती चळवळ पक्षभेद आणि मतभेद बाजूला ठेवून एकोप्यानें कडेला पोंचविली पाहिजे, असा आयरिश जनतेचा त्या वेळीं पूर्ण ग्रह झाला होता. सिनफेन पक्षाला त्या वेळीं ग्रह अनुकूल नव्हते. अखेर सिनफेन पक्षानें या ग्रहदशेपुढें मान वाकविली; व राष्ट्रीय पक्षाच्या चळवळीला आपण तूर्त विरोध करणार नाहीं असें १९१० सालीं जाहीर केलें! आयर्लंडांत आधींच असलेल्या अनेक पक्षांत आणखी एका पक्षाची भर घालून आम्ही दुही वाढवूं इच्छीत नाहीं, असाहि पुकारा सिनफेन पक्षानें या वेळीं केला! राष्ट्रीय पक्षाच्या वाढत्या तेजापुढें सिनफेन पक्ष या वेळीं अगदीं पूर्ण फिका पडला होता; व १९१० सालच्या निवडणुकींतहि त्या पक्षानें कांहीं भाग घेतला नाहीं.

आयर्लंडांत सिनफेन पक्षाची या वेळीं अगदीं पराकाष्ठेची अनास्था झाली. राष्ट्रीय पक्षाच्या उत्कर्षाशिवाय दुसरींहि कारणें या अनास्थेला आहेत. १७८३ सालच्या कायद्याप्रमाणें आयर्लंडांत नियंत्रित राजसत्तेचें पुनरुज्जीवन करणें हें सिनफेन पक्षाचें या वेळीं ध्येय होतें. हें ध्येय आयरिश मजूर पक्षाला व क्रांतिकारक पक्षाला चिलकूल पसंत नव्हतें. अर्थातच या पक्षांचीं पत्रे व 'सिनफेन' पत्र यांचा अगदीं उभा दावा असे. आयरिश मजूरपक्ष आणि ब्रिटिश मजूरपक्ष यांच्यामध्यें समदुःखित्वामुळें आणि समानशीलामुळें सहजच उद्भवणारा सहानुभाव असे. इंग्रजांच्या सावलीचाहि विद्वेष करणाऱ्या सिनफेन पक्षाला हा सहानुभाव कधींहि पाहवला नाहीं. हा एक प्रकारचा देशद्रोह आहे असें त्या पक्षाचें मत होतें. आयरिश उद्योगधंद्यांना उत्तेजन मिळून त्यांची भरभराट व्हावी म्हणून आयरिश मजुरांनीं माफक वेतनावर काम करावें व पगारवाढीकरितां संप न करितां भांडवलवाल्यांना आपल्या त्यागबुद्धीनें आणि राष्ट्रभक्तीनें लाजवावें असें सिनफेन पक्ष प्रतिपादन करीत असे. हें प्रतिपादन मजूरपक्षाला सहन होणें शक्यच नव्हतें. या मतभेदामुळें सिनफेन पक्षाला मजूरपक्ष अगदीं पाण्यांत पाहत असे. क्रांतिकारक पक्षाशीं व मजूर पक्षाशीं असलेलें हें वैर सिनफेन पक्षाला अगदीं पुढें पाऊल टाकूं देईना. बहुजनसमाजाचें चित्त राष्ट्रीय पक्षाच्या चळवळींत गुंतलेलें व म्हणून सिनफेन मतांविषयीं सर्वस्वी उदासीन आणि देशांतील इतर पक्षांशीं चाललेला असा जन्मापासूनचा उभा दावा, या कारणांमुळें सिनफेन पक्षाचें पाऊल पुढें पडेना व त्याला ऊर्जित दशा येईना.

१९१० सालीं सिनफेन पक्षांतूनच पूर्ण लोकसत्तेचा पुरस्कार करणारा नवीन पंथ निघाला. " आयरिश फ्रीडम " हें पत्र, या नवीन सिनफेन पक्षातर्फे, सीघन मॅक डिआर्मडा ( Seaghan Mac Diarmada ) हा व्यवस्थापक म्हणून काढीत असे. जुन्या सिनफेनांचें ध्येय, १७८३ सालच्या कायद्याप्रमाणें, नियंत्रित राजसत्तेचें होतें; व हे नवे सिनफेन पूर्ण लोकसत्तेचे पुरस्कर्ते होते. दोनहि पक्षांचीं साधनें, तत्त्वें आणि चळवळीचे मार्ग अगदीं एक होते; फक्त आयर्लंडचें– स्वतंत्र आयर्लंडचें– राज्य कोणत्या पद्धतीचें असावें याबद्दल वाद होता. आयर्लंडांतील बहुजनसमाजांत पसरलेल्या स्वातंत्र्याच्या नवीन कल्पनांना मान देऊन, १७८३ सालच्या जुन्या कायद्याचा अभिमान

या नवीन काळांत—लोकसत्तेच्या या नवयुगांत न वाहतां, सिनफेन पक्ष पूर्ण लोकसत्तेचा पुरस्कार करील तरच त्याचा निभाव लागेल, हें या नवीन सिनफेनांनीं ओळखलें आणि हा निराळा पंथ काढला. या नवीन सिनफेनांनीं मजूरपक्षाशीं मिळतें घेण्याचा प्रयत्न केला व त्यांत त्यांना थोडेंफार यशहि आलें. सिनफेन पक्षाची स्थिति या पंथभेदामुळें जास्तच खालावली. जन्मापासूनच सिनफेन पक्षाला अशी साडेसाती लागली होती. १९०६ पासून १९१३ सालापर्यंत सिनफेन पक्षाची अशी दुर्दशा होती. या दुर्दशेंत सुद्धा सिनफेन पक्षानें आयर्लंडांतील शेतकी, व्यापार आणि शिक्षण यांची सुधारणा व्हावी म्हणून प्रयत्न केले; परंतु जनतेच्या अनास्थेमुळें हे प्रयत्न वायां गेले. जनतेचें सर्व लक्ष या वेळीं पार्लमेंटांतील चळवळीकडे वेधलें होतें. मजूर पक्ष व सिनफेन पक्ष हे राष्ट्रीय पक्षाचा एकसारखा उपहास करीत असतांना सुद्धां राष्ट्रीय पक्षाच्या लोकप्रियतेंत आतांपर्यंत अंतर पडलें नव्हतें; उलट राष्ट्रीय पक्षाच्या चळवळीकडेच या वेळीं सर्व आयर्लंड अगदीं डोळ्यांत प्राण आणून पाहत होतें असें म्हटलें तर तें अतिशयोक्तीचें होणार नाहीं. १९१२ सालच्या एप्रिल महिन्याच्या १२ तारखेस ॲस्क्विथ साहेबांनीं पार्लमेंटपुढें होमरूल बिल आणलें; व आयरिश राष्ट्रीय पक्षातर्फे रेडमंडनें त्या बिलासंबंधीं समाधान प्रदर्शित केलें. एप्रिल महिन्याच्या २२ तारखेस डब्लिन शहरांत आयरिश राष्ट्रीय पक्षाची परिषद भरून या बिलाचें स्वागत करण्यांत आलें ! मार्च महिन्यांत सिनफेन पक्षाच्या कार्यकारी मंडळानेंहि या बिलाचें स्वागत केलें; व जर हें बिल पार्लमेंटांत नामंजूर झालें तर सिनफेन पक्ष अधिक परिणामकारक मार्गाचा अवलंब करून स्वराज्यप्राप्तीकरितां लोकमत त्या दिशेनें तयार करील असा ठराव केला ! या ठरावावर लिहितांना 'सिनफेन' पत्रानें, 'होमरूल बिल जर पार्लमेंटनें नामंजूर केलें तर आयरिश राष्ट्रीय पक्षाची कोणतीहि चळवळ आम्ही यापुढें देशांत चालू देणार नाहीं. एक होमरूल बिल तरी मंजूर झालें पाहिजे किंवा राष्ट्रीय पक्ष तरी नष्ट झाला पाहिजे,' असे उद्गार काढिले होते. या उद्गारांचें महत्त्व त्या वेळीं कोणालाहि वाटलें नाहीं; परंतु आज मात्र या उद्गारांचें महत्त्व आणि मर्म आयर्लंडांतील आणि इंग्लंडांतील सर्व पक्षांना, साम्राज्य सरकारला सुद्धां, अगदीं पूर्णपणें समजून चुकलें आहे. तें कसें समजलें हेंच आतां पाहावयाचें.

होमरूल बिलासंबंधीं आयर्लंडांत प्रदर्शित झालेलें हें अनुकूल लोकमत अगदीं डळमळीत होतें. खुद्द राष्ट्रीय पक्षांतील कित्येक व्यक्तींचे या बिलानें समाधान झालें नव्हतें. फक्त जें मिळत आहे तें तरी पदरांत पाडून घ्यावें अशा बुद्धीनें त्यांनीं मूग गिळले होते. क्रांतिकारक व मजूर पक्षांच्या पत्रांनीं व पुढाऱ्यांनीं या भिकार देणगीचा व सवलतीचा धिक्कारच केला. असल्या भिकार सवलतींना राष्ट्रीय पक्षानें आयर्लंडचा स्वातंत्र्याचा हक्क इंग्लंडला विकला, असाहि गवगवा क्रांतिकारक, मजूर व सिनफेन पक्षांनीं आयर्लंडांत केला. राष्ट्रीय पक्षाच्या पुढाऱ्यांनीं या विरोधाची दरकार केली नाहीं; परंतु बहुजन-समाजावर मात्र या विरोधाचा परिणाम हळूहळू होत होत. आयर्लंडांतील या विरोधाचा परिणाम होमरूल बिलाच्या भवितव्यावर झाला नसता; परंतु आयर्लंडां-तच दुसऱ्या एका दिशेनें या बिलाला अत्यंत निश्चित आणि परिणामकारक विरोध होऊं लागला. हा विरोध अल्स्टरमधील प्रॉटेस्टंट लोकांकडून झाला. इंग्रजी मुत्सद्द्यांच्या भेदनीतीचीं बीजें अल्स्टर प्रांतांत रुजून त्या दुहीच्या विष-वृक्षाला अल्स्टरच्या विरोधाचें घातुक फळ आलें आहे. आयर्लंडांतील बहुजन-समाज कॅथोलिक पंथाचा अनुयायी आहे. आयर्लंड जिंकल्यावर प्रॉटेस्टंट लोकांची एक वसाहत अल्स्टर प्रांतांत, आयरिश राष्ट्रामध्यें दुही पडून आपला जुलूम तेथें सतत चालावा अशा हेतूनें, इंग्लंडनें केली. इंग्लंडनें बुद्धिपुरःसर करविलेली ही दुही आज आयर्लंडला नडत आहे. या दुहीचें कारण ख्रिस्ती धर्मांतील पंथभेद हें आहे. आयर्लंडांतील बहुजनसमाज कॅथोलिक असल्यामुळें आयरिश पार्ले-मेंटांत प्रॉटेस्टंट लोकांवर जुलूम होईल, प्रॉटेस्टंट लोकांच्या हक्कांचें रक्षण होणार नाहीं—असा या अल्स्टरच्या विरोधाचा मथितार्थ आहे. या विरोधाच्या बुडाशीं या भीतीहूनहि अधिक गूढ, खोल आणि व्यापक अशी दुसरी एक भावना आहे. कॅथोलिक पंथापेक्षां प्रॉटेस्टंट पंथ श्रेष्ठ आहे व कॅथोलिक पंथावर त्याचें वर्चस्व राहणें न्याय्य आहे असें वाटणें ही ती भावना होय! ही भावना या विरोधाच्या बुडाशीं आहे. तर्कशास्त्र सर्व आक्षेपांना उत्तर देतें व सर्व शंकांचें समाधान करतें; परंतु धर्मवेड्या अभिमानी मनाच्या आंधळ्या आक्षेपांचें आणि शंकांचें समाधान तर्कशास्त्राला करवत नाहीं. अल्स्टरच्या या वेड्या व विवेकहीन पंथाभिमानापुढें आयर्लंडांतील कोणत्याहि पक्षाचा कोटिक्रम चालत

नाहीं. साडेतीनशें वर्षांपूर्वी कावेबाज इंग्लंडनें टाकलेला हा पंथद्वेषाचा धोरणी डाव आज आयर्लंडच्या भाग्योदयाच्या आड येत आहे!

इंग्लंडनें आयर्लंडला होमरूल दिलें तर आम्ही बंड करूं असा उघड धाक इंग्लंडांतील होमरूलचा पुरस्कार करणाऱ्या उदारमतवादी मुत्सद्द्यांना अल्स्टरचे पुढारी सर एडवर्ड कार्सन यांनीं घातला; व या धाकाचें प्राथमिक सक्रिय स्वरूप म्हणून अल्स्टरमध्यें स्वयंसेवकांचीं पथकें उभारण्यांत येऊं लागलीं. होमरूल बिलाला प्रथमपासून विरुद्ध असलेले पुराणमतवादी इंग्रजी मुत्सद्दी अल्स्टरच्या या धाडसी धोरणाचा पाठपुरावा करूं लागले. ही विचित्र परिस्थिति उत्पन्न झालेली पाहून उदारमतवादी इंग्रजी प्रधानमंडळ, अधिकारच्युतीच्या भयानें, होमरूल बिलाविषयीं निश्चित असें कांहींच धोरण दाखविना! प्रधानमंडळाची ही धरसोड पाहून जागच्या जागीं मनगटें चावीत बसण्यापलीकडे कांहींहि करितां येणें राष्ट्रीय पक्षाला शक्य नव्हतें. होमरूलचा हप्ता पदरांत पडावा म्हणून त्या पक्षानें विलक्षण श्रम घेतले होते. पार्नेलच्या मृत्यूनंतर उदारमतवादी पक्षाशीं सलोखा राखून होमरूल चळवळ यशस्वी करण्याकरितां इंग्लंड व आयर्लंड यांचा संबंध सदैव टिकावा, असें म्हणण्यापर्यंत राष्ट्रीय पक्षाचें तडजोडीचें धोरण वाहवलें होतें! तडजोडीशिवाय राजकारणांत यश नाहीं. प्रतिपक्षी चार पावलें पुढें येत असतां आपण दोन पावले मागें घेण्यांत कमीपणा नाहीं हें तत्त्व खरें आहे; परंतु राष्ट्राच्या अब्रूला व स्वातंत्र्याला जर त्या तडजोडीनें बाध येत असेल, तर ती तडजोड नव्हे व तें राजकारणहि नव्हे. होमरूलच्या लालुचीनें राष्ट्रीय पक्षानें चालविलेली तडजोड कांहींशी हानिकारक होती यांत शंका नाहीं. या तडजोडीन पूर्वपरंपरा सुटत होती व अंतिम ध्येय दृष्टिआड, कायमचें दृष्टिआड होत होतें. कारण इंग्रजी साम्राज्याशीं कायमचा संबंध राहावा असें म्हणणें म्हणजे आयर्लंडच्या पूर्ण स्वातंत्र्याच्या हक्कावर कायमचें पाणी सोडण्यासारखें होतें. असली तडजोड राष्ट्रीय पक्षानें केली हें अनुचित तर खरेंच; परंतु ही तडजोड करण्यांत त्याची स्वार्थबुद्धि बिलकुल नव्हती हें लक्षांत घेणें जरूर आहे. आयर्लंडच्या आजच्या आपत्ति दूर व्हाव्यात आणि त्याला कांहीं तरी सुख लागावें अशा केवळ निष्काम आणि देशहितपरबुद्धीनें ही तडजोड करण्यांत आली होती. जी चळवळ आपण इतक्या दिवस जिवापाड झटून

केली त्या चळवळीला यश यावें — आपल्या डोळ्यांदेखत दुर्दैवी आयर्लंड स्वायत्त आणि सुखी व्हावें — अशा हेतूनें राष्ट्रीय पक्ष ही तडजोड करितांना प्रेरित झाला होता. स्वार्थबुद्धीचा नुसता संपर्कसुद्धां या तडजोडीला लागला नव्हता आणि त्यामुळेंच बहुजनसमाजानें या तडजोडीची गय केली. राष्ट्रीय पक्षाचा पुढारी रेडमंड याला प्रधानमंडळांत जागा मिळत असतांहि तो मान त्यानें नाकारला! अल्स्टरच्या बडबडीला तोफांच्या गडगडाटानें उत्तर देऊन इंग्लंडनें आयर्लंडला होमरूलचा कायदा लागू केला असता, तर आज बहुधा सिनफेन पक्षाचें नांवहि ऐकूं आलें नसतें. परंतु इंग्लंडला ही बुद्धि सुचली नाहीं.

केसरी, २५ जानेवारी १९२१

---

# आयर्लंड 'सिनफेन' कसें झालें ?

## ( ३ )

इकडे अल्स्टर प्रांतांत स्वयंसेवकांच्या चळवळीला अगदीं ऊत येत चालला होता. अल्स्टरमधील ही नवीन चळवळ राष्ट्रीय पक्षाशिवाय इतर सर्व पक्षांना मान्य होती. क्रांतिकारक, मजूर व सिनफेन या तीनहि पक्षांनीं या नवीन चळवळीचें मनःपूर्वक अभिनंदन केलें! अल्स्टरनें आयर्लंडची क्षात्रवृत्ति जागृत केली व आयरिश प्रॉटेस्टंटांनीं आयरिश लोकांत बंड करण्याची— इंग्लंडला धाक घालण्याची— धमक आहे असें सिद्ध केलें. एवढ्यावरच हा अभिनंदनाचा प्रकार चालला होता ! या नवीन चळवळीचें अनुकरणहि इतर आयर्लंडनें ताबडतोब केलें. देशांतील या सर्व हालचालींकडे राष्ट्रीय पक्ष उद्विग्न आणि उदास मनानें पाहत होता. या हालचालींचें महत्त्व राष्ट्रीय पक्षाला समजलें नाहीं व त्यामुळेंच त्याचा शेवटीं घात झाला! अखेर १९१४ सालीं मुख्य प्रधानांनीं अल्स्टर खेरीजकरून इतर सर्व आयर्लंडला होमरूल कायदा लागू करण्याचा आपला बेत जाहीर केला. हा बेत जाहीर होतांच आयर्लंडांत जिकडे तिकडे त्वेषाची आणि तिरस्काराची विलक्षण लाट उठली. आयरिश राष्ट्रीय पक्षानें, तूर्त कार्य सुकर व्हावें म्हणून, या बेतालांहि संमति दिली. राष्ट्रीय पक्षाची इतक्या दिवसांची लोकप्रियता आतां झपाट्यानें

ओसरूं लागली. आयर्लंड स्वायत्त व्हावयाचें असेल, तर तें अल्स्टरसह झालें पाहिजे; अल्स्टरला आयर्लंडपासून आम्ही कोणत्याहि निमित्तानें विभक्त होऊं देणार नाहीं, असा आपला निस्संदिग्ध निश्चय क्रांतिकारक, मजूर आणि सिनफेन या तीनहि पक्षांनीं जाहीर केला. आयर्लंडच्या फाळणीचा हा बेत बहुजनसमाजालाहि पसंत पडला नाहीं. अल्स्टरच्या धाकाचा जर इंग्रजी प्रधानमंडळाच्या मनावर इतका परिणाम होतो, तर आयर्लंडच्या— एकवटलेल्या आयर्लंडच्या— धाकाचा किती परिणाम होईल ?— असाहि एक प्रश्न नवीन उभारलेल्या स्वयंसेवकांच्या पथकांची कवाईत पाहणाऱ्या बहुजनसमाजाच्या मनांत घोळूं लागला होता! या प्रश्नांचें उत्तर कसें मिळतें तें एकदां अजमावून पाहावें, अशा अर्थाची उघड उघड चर्चाहि वर्तमानपत्रांतून होऊं लागली. आयरिश लोकमताचा वारा आतां असा निराळ्या दिशेनें वाहूं लागला होता. पुराणमतवादी काय किंवा उदारमतवादी काय सगळेच इंग्रजी मुत्सद्दी आयर्लंडच्या हिताविषयीं बेपर्वा आहेत. उदारमतवादी मुत्सद्दी गोड बोलून व गोंजारून आयर्लंडांतली चळवळ बेलगामी होऊं देत नाहींत! असल्या या लबाड व गोडबोल्या इंग्रजांवर अवलंबून राहून आयर्लंडचा तरणोपाय नाहीं, कांहीं तरी निराळा मार्गच आतां काढिला पाहिजे, असे विचार जनतेच्या मनांत येऊं लागले होते. सिनफेन पक्षाच्या चळवळीला अत्यंत अनुकूल असें वळण आयरिश राजकारणाला अशा रीतीनें लागत होतें. इंग्रजी मुत्सद्द्यांच्या दुटप्पी धोरणाचा हा स्वाभाविक परिणाम होता. इंग्लंड आपण होऊन अशा रीतीनें सिनफेन पक्षाला अनुकूल परिस्थिति निर्माण करीत होतें. अशा अनिश्चित मनःस्थितींत आयरिश जनता असतांना युरोपच्या रणांगणावर जर्मनीच्या युद्धदुंदुभि वाजूं लागल्या.

दुबळ्या राष्ट्रांच्या संरक्षणाकरिता व त्यांच्या हक्कांची पायमल्ली होऊं नये म्हणून इंग्लंड महायुद्धांत पडल्यानंतर आयर्लंडनें इंग्लंडला मदत करावी किंवा नाहीं, याची चर्चा आयरिश पत्रांतून होऊं लागली. युद्धांत इंग्लंडला बिनशर्त मदत करावी व मोबदल्याविषयीं कांहींहि न बोलतां इंग्लंडच्या सदसद्विवेक बुद्धीवर विसंबून राहावें असें राष्ट्रीय पक्षाचें सामान्यतः मत होतें. होमरूलचा कायदा आयर्लंडला लागू करण्यासंबंधानें एक अवाक्षरहि न बोलतां उदार-

चरित रेडमंडनें आयर्लंडचें बिनशर्त सहाय इंग्लंडला देऊं केलें! रेडमंडच्या या उदात्त वर्तनानें शरमलेल्या इंग्रजी मुत्सद्दयांनीं होमरूल बिलाला राजाची संमति मिळविली; व आयर्लंडला होमरूलचा कायदा लागू करण्याचें आश्वासन दिलें! बिनशर्त सहायाचें आपलें वचन खरें करण्याकरितां रेडमंड स्वदेशीं परत आला. रेडमंडच्या या धोरणाला नेहमींप्रमाणें सिनफेन पक्षानें विरोध केला व आपण तटस्थ राहणार असें जाहीर केलें. रेडमंडच्या स्वार्थत्यागाची आणि देशसेवेची पुण्याई या वेळीं त्याच्या कामीं आली. आयरिश जनतेनें त्याच्या वचनाची पूर्तता करण्याचें ठरविलें. सैन्यभरतीच्या कामाला आयर्लंडांत उत्साहानें आरंभ झाला. परंतु इंग्लंडच्या अनुदार आणि पक्षपाती धोरणानें या उत्साहावर पाणी ओतलें. सैन्यभरतीचें काम चालू असतांच सिनफेन, मजूर आणि क्रांतिकारक या तिन्ही पक्षांचीं वर्तमानपत्रें बंद करण्यांत आलीं. रेडमंडनें देऊं केलेली आयरिश स्वयंसेवकांची मदत युद्ध खात्यानें नाकारली! आयरिश सैनिकांना आणि अल्स्टर सैनिकांना वागविण्यांत पक्षपात आणि अन्याय दिसूं लागला! या सर्व अन्यायांचा कळस करण्याकरितां आयर्लंडांत धरपकडीचें सत्र स्थानिक सरकारनें सुरू केलें. बहुजनसमाजांत उत्पन्न झालेला उत्साह या कृत्यांनीं पुरता गारठला. याच सुमारास सिनफेन, मजूर आणि क्रांतिकारक या पक्षांनीं नवीन पत्रें काढून असंतोष चेतविण्याला प्रारंभ केला. युद्धामध्यें जर्मनांनीं केलेल्या अत्याचारांचीं भडक रंगानें रेखाटलेलीं शब्दचित्रें जेव्हां इंग्रजी पत्रांतून प्रसिद्ध होत असत, तेव्हां आयर्लंडांत शांतता स्थापन करण्याच्या नांवाखालीं, इंग्लंडनें केलेल्या अत्याचारांशीं या जर्मन अत्याचारांची तुलना करून इंग्रजी नीतिमत्तेचा उघड उपहास हीं पत्रे करीत असत. जर्मनांच्या अंतःकरणाइतकेंच इंग्रजांचेंहि अंतःकरण निर्दय आणि क्रूर आहे असें या पत्रांनीं सप्रमाण सिद्ध केलें. इंग्लंड दुबळ्या राष्ट्रांच्या हक्कांकरितां व स्वातंत्र्याकरितां युद्धांत पडलें हें जर खरें असेल, तर त्यानें प्रथम आयर्लंडचें हिरावून घेतलेलें स्वातंत्र्य त्याला परत दिलें पाहिजे. आयर्लंडला पायाखालीं तुडवून पुन्हा स्वातंत्र्याकरितां लढत असल्याची शेखी मिरविण्याइतकें, इंग्लंड निर्घृण आणि निर्लज्ज आहे असें हीं पत्रें उघडउघड लिहूं लागलीं. याच वेळीं क्रांतिकारक व मजूर या पक्षांचें ऐक्य घडवून आणण्याचा प्रयत्न पीअर्स व कनॉली या त्या पक्षांच्या

पुढाऱ्यांनीं केला. पीअर्स व कनॉली यांच्या वाणींत विलक्षण ओज होतें. पीअर्सच्या स्फूर्तिदायक कवनांनीं आयरिश जनतेला वेड लाविलें होतें. १९१५ सालच्या अखेरीस "Tracts for the Times" या नांवाची एक निबंधमाला प्रसिद्ध करावयाला पीअर्सनें प्रारंभ केला. उत्कृष्ट कल्पना आणि उदात्त विचार यांचा हृदयंगम संगम या काव्यमय निबंधांत झाला होता. समता, स्वातंत्र्य आणि स्वार्थत्याग या दिव्य तत्त्वसूत्रांनीं ही माला गुंफलेली होती. आयरिश जनतेंत या वेळीं अगदीं भयंकर असंतोष पसरला होता. बहुजनसमाजाच्या असंतुष्ट आणि उद्विग्न मनावर या निबंधांचा जसा व्हावयाचा तसाच परिणाम झाला. १९१६ च्या मार्च महिन्यांत या मालेंतील शेवटचें पुस्तक बाहेर पडलें आणि त्यानंतर पंधराच दिवसांनीं ईस्टर सणाच्या मुहूर्तावर आयर्लंडांत लोकसत्ताक राज्य स्थापन झाल्याचें कनॉलीनें जाहीर केले.

डब्लिन शहरांतील 'स्वातंत्र्य-भवना'वर (Liberty Hall) कनॉलीनें उभारलेल्या या लोकसत्तेच्या निशाणाखालीं एकवटण्याइतकें मनोधैर्य आयरिश जनतेंत अद्यापि आलें नव्हतें व; त्यामुळे या बंडाचा मोड झाला. पीअर्स, कनॉली व बंडाचे इतर प्रवर्तक यांची गुप्त चौकशी झाली आणि त्यांना गोळ्या घालून मारण्यांत आलें. या बंडाच्या उद्भवाचा आणि अंताचा आयरिश जनतेवर अगदीं विलक्षण परिणाम झाला. इंग्रजी अमदानींत सत्याचा आणि स्वातंत्र्याचा पुरस्कार करणें किती धोक्याचें आहे, हें या बंडानें स्पष्ट झालें. इंग्लंडांत जर असें बंड झालें असतें, तर त्या बंडाच्या उत्पादकांना उघड चौकशीशिवाय शिक्षा झाली नसती व इंग्रज जनतेनें असा अन्याय सहन केला नसता. परंतु आयर्लंडांत बंडखोरांना चौकशीशिवाय गोळ्या घालण्यांत आल्या! व आयरिश जनतेला आपल्या आवडत्या कवीचें आणि तत्त्वज्ञान्याचें मरण उघड्या डोळ्यांनीं मुकाट्यानें पाहावें लागलें. हा घाव आयरिश जनतेच्या अगदीं जिव्हारीं बसला. सशस्त्र प्रतिकाराचें, बंडाचें वैयर्थ्यहि आयरिश जनतेच्या या अनुभवानें पुरतें गळीं उतरलें. युरोपियन युद्धांत इंग्लंड गुंतलें असतां आयर्लंडनें जर बंड केलें, तर त्याला यश येईल असें पन्नास वर्षांपूर्वी मिचेलनें प्रतिपादिलें होतें. त्या मार्गानें जाऊनहि कांहीं फायदा नाहीं हें या अनुभवानें पटलें. कोणत्याहि काळीं बंड करून यश मिळणार नाहीं, असा बोध या

प्रसंगानें जनतेला झाला. पार्लमेंटांतील चळवळ किंवा रणांगणावरील सशस्त्र प्रतिकार हे स्वातंत्र्यप्राप्तीचे मार्ग नव्हेत, असें या गेल्या पांच सात वर्षांच्या इतिहासानें आयर्लंडला सांगितलें व शिकविलें. ही शिकवणूक सिनफेन पक्षानें व्यर्थ जाऊं दिली नाहीं ! आतां क्रांतिकारक पक्ष नाहीं किंवा राष्ट्रीय पक्षहि नाहीं; आतां फक्त सिनफेन पक्षच आपले उघड मार्ग अवलंबिणार, असें स्पष्ट दिसूं लागलें. सिनफेन पक्षानें जें इतक्या दिवस कंठशोष करून सांगितलें आणि होमरूल बिलाला भुललेल्या जनतेनें जें ऐकण्याची कालपर्यंत पर्वा केली नाहीं, तें तिला आज काळानें ऐकविलें आणि तेंच आचरणें आतां प्राप्त झालें असा निर्णय तिच्या मनोदेवतेनें दिला ! स्वावलंबन— सिनफेन पक्षाचें स्वावलंबन— हाच एक उपाय आतां उरला होता आणि तोच उपाय चालवून पाहण्याचा निर्धार आतां आयर्लंडनें केला.

१९१७-१८ सालांत युरोपला दुष्काळाची तीव्रता जाणवूं लागली. स्वतंत्र युरोपियन राष्ट्रांनीं अन्नसामुग्रीची निर्गत ताबडतोब बंद केली; परंतु परतंत्र आयर्लंड-ला इंग्लडच्या हुकुमानें बाहेर जाणारें धान्य पाहत, उपाशी तडफडण्याची पाळी येणार असें दिसूं लागलें. सिनफेन पक्षाने या वेळीं बाजू राखिली व दुष्काळची तीव्रता कमी केली. धान्यसामग्री बाहेर पाठविणारांवर बहिष्कार घालण्यांत आला आणि धनिकांचीं मनें वळवून सिनफेन पक्षानें आगाऊ धान्य-विक्री करविली. स्वावलंबन कसें उपयोगी पडतें याचा पूर्ण पडताळा या वेळीं आयरिश जनतेला येऊन सिनफेन पक्षाच्या लोकप्रियतेची भरती चढूं लागली. बंडखोरीबद्दल शिक्षा मिळून माफीवर नुकताच सुटलेला क्रान्तिकारक पक्षाचा एक पुढारी डी व्हॅलेरा हा याच वेळीं सिनफेन पक्षाचा अध्यक्ष निवडला गेला. ही निवडणूक अत्यंत सूचक होती. नियंत्रित राजसत्तेचें इतक्या दिवसांचें ध्येय मागें पडून सिनफेन पक्ष पूर्ण लोकसत्तेकडे वळत चालल्याचें हें लक्षण होतें. होमरूल बिलासंबंधीं वाटाघाट करण्याकरितां यापूर्वी नुकतीच आयरिश पुढाऱ्यांची परिषद सरकारनें बोलाविली होती; राष्ट्रीय पक्षाने या परिषदेंत सामील होण्याचें ठरविलें. परंतु ती परिषद म्हणजे एक नवीन हुलकावणी प्रधान-मंडळानें चालविली आहे असें जाहीर करून सिनफेन पक्षानें या परिषदेवर बहिष्कार घातला. सिनफेन पक्षाचें हे म्हणणें खरें ठरलें. आयर्लंडनें तहपरिषदेला इंग्लंडच्या जुलमासंबंधीं जो तक्रारअर्ज केला होता, त्या

अर्जाला, आपली अब्रू राखण्याकरितां, मुख्य प्रधानांनीं हें लबाडीचें उत्तर दिलें होतें. या परिषदेनें अखेर निश्चित असें कांहींच ठरविलें नाहीं. या परिषदेची बैठक चालू असतांच सिनफेन पक्षानें आपली परिषद डी व्हॅलेरा यांच्या अध्यक्षत्वाखालीं भरविली. या परिषदेनें सिनफेन पक्षाच्या घटनेंत फेरबदल केला आणि पूर्वींचें ध्येय सुटून पूर्ण लोकसत्ताक राज्याचें ध्येय सिनफेन पक्षानें स्वीकारलें! यानंतर लवकरच आयर्लंडचा राष्ट्रीय पुढारी रेडमंड हा मृत्यु पावला. १९१७ सालच्या नोव्हेंबरांत भरलेल्या सिनफेन परिषदेनें लोकसत्ताक राज्याचें जें नवीन ध्येय स्वीकारलें, त्यामुळें मजूर आणि क्रान्तिकारक पक्षांशीं असलेला सिनफेनांचा वाद कायमचा मिटून ते दोनहि सिनफेन पक्षांत सामील झाले. आयरिश पुढाऱ्यांच्या सरकारी परिषदेचा रिपोर्ट याच वेळीं बाहेर आला आणि सरकार कांहीं करील म्हणून जी आशा कित्येकांना वाटत होती, ती या रिपोर्टानें कायमची नष्ट केली. सरकारपाशीं सहकारिता करण्यांत हंशील नाहीं अशी खात्री आतां सर्व आयरिश पक्षांची व जनतेची झाली आणि स्वावलंबनाचा— सरकारशीं सहकारिता न करितां स्वतःच्या पायांवर उभें राहण्याचा— अगदीं निर्वाणीचा मार्ग आयर्लंडनें शेवटीं पत्करिला. सिनफेन पक्षाचा प्रवर्तक ऑर्थर ग्रिफिथ यानें दोन दशक धीरानें चालविलेल्या प्रयत्नांना अशा रीतीनें यश आलें आणि इंग्लंडनें केलेल्या विश्वासघातामुळें अखेर आयर्लंड 'सिनफेन' झालें!

सिनफेन पक्षाच्या चळवळीचा अगदीं अलीकडील इतिहास देण्याचें कांहीं कारण नाहीं. तो सर्वांना माहीत आहे. हिंदुस्थानांतील असहकारितेच्या चळवळीप्रमाणें सिनफेन चळवळहि इंग्लंडनें केलेल्या वचनभंगामुळें आणि विश्वासघातामुळेंच अस्तित्वांत आलेली आहे. सिनफेन चळवळीचें आज जें अत्याचारांत पर्यवसान झालेलें दिसतें, तें इंग्लंडच्या कृतकर्माचें परिपक्व फळ आहे. त्यांत आयर्लंडचा कांहींहि अपराध नाहीं. १८०० पासून १९२० सालापर्यंत, आपलें हिरावून घेतलेलें स्वातंत्र्य परत मिळविण्याकरितां, आयर्लंडनें केलेला स्वार्थत्याग केवळ अनुपम आणि अलौकिक आहे. आयर्लंडची स्वातंत्र्यप्रीति इतकी निस्सीम आहे कीं, तिला आळा घालणारा एखादा सरकारजमा पक्ष आयर्लंडांत अद्यापि उत्पन्न झालाच नाहीं असें म्हटलें तरी चालेल! कोणत्याहि राष्ट्रांत देशद्रोही खुषामत्ये हे असावयाचेच;

व त्याप्रमाणें आयर्लंडांतहि ते होते व आहेत. परंतु अशा देशद्रोह्यांना आयरिश राष्ट्रीय चळवळींत मिरविण्याचा मान आयर्लंडनें उपभोगूं दिला नाहीं. हिंदुस्थानांतील पक्षभेदांप्रमाणें आयर्लंडांतहि पक्षभेद आहेत. परंतु आयरिश पक्षभेदांच्या बुडाशीं त्यागबुद्धीचा कमी अधिकपणा नसून त्यांची उभारणी साधनांविषयींच्या मतभेदावर झालेली आहे. त्यामुळें आयरिश पक्षभेदांत स्वार्थबुद्धीची भेसळ झालेली आढळून येत नाहीं. हिंदुस्थानांतील पक्षभेद कोणत्या तत्त्वांवर उभारलेले आहेत हें आज तरी, मंत्रिपदाची व अध्यक्षपदांची सरकारी खैरात देशांत चालू असतां, स्पष्ट करण्याची विशेष जरूर नाहीं. आयर्लंडांतील बहुजनसमाजांतहि पुढाऱ्यांनीं केलेला स्वार्थत्याग पाहून आतां त्यागबुद्धि उत्कटत्वानें उदित झालेली आहे. हिंदी जनतेंत त्या मानानें विशेषशी त्यागबुद्धि आढळत नाहीं. असहकारितेच्या आणि स्वावलंबनाच्या मार्गाला आज हिंदुस्थान लागलें आहे. असहकारितेचें हें दुर्धर व्रत आचरितांना किती असह्य कष्ट सोसावे लागतील याची जाणीव महाराष्ट्रीयांना व्हावी म्हणूनच हें विवेचन केलेलें आहे. जुलमी इंग्लंडचा स्वार्थ आणि परतंत्र आयर्लंडचा स्वार्थत्याग यांची मर्यादा कोठवर जाऊं शकते, हें मॅक्स्विनीच्या प्रायोपवेशनानें जगाला दाखविलें आहे. आणि सिनफेन पक्षाच्या चळवळीला यश येवो वा न येवो, स्वातंत्र्याकरितां करावयाच्या स्वार्थत्यागाला मर्यादा नसते, हें दिव्य तत्त्व आयर्लंडनें आपल्या उक्तींनीं आणि कृतींनीं परतंत्र राष्ट्रांना, किंबहुना सर्व जगताला, शिकविलें, असे त्या दुर्दैवी देशाचे धन्यवाद भावी कवि आणि इतिहासकार सदैव गातील, यांत शंका नाहीं.

केसरी, १ फेब्रुवारी १९२१

# आयरिश प्रजासत्ताक राज्य : : ७

Ireland will accept no settlement except independence : will discuss no settlement except independence : neither Homerule, nor Colonial Status nor Dominion Status will be discussed: we have said our last word to England, and that word is " Get out."

—*De Valera*

सिनफेन पक्षाचा प्रवर्तक आणि पुढारी ऑर्थर ग्रिफिथ याच्या प्रचंड उद्योगानें 'आयरिश प्रजासत्ताक राज्य' ही अभिनव संस्था आयर्लंडांत निर्माण झाली आहे. सिनफेन चळवळीचें पर्यालोचन या संस्थेच्या वर्णनावांचून पूर्ण होणार नाहीं. आयर्लंडांतील असहकारितेच्या चळवळीचें 'आयरिश प्रजासत्ताक राज्य' हें परमोच्च आणि प्रत्यक्ष स्वरूप आहे. ग्रिफिथच्या या विलक्षण उद्योगानें आयर्लंडवरील इंग्लंडचें अधिराज्य डळमळूं लागलें असून, त्या ढासळणाऱ्या सत्तेला सावरण्याकरितां इंग्रजी मुत्सद्द्यांनीं मानवी समाजाच्या धारणेला आधारभूत असलेलीं उदात्त तत्त्वें पायाखालीं तुडवून आयर्लंडांत दडपशाही सुरू केली. इंग्रजी मुत्सद्द्यांनीं चालविलेल्या या दडप-

शाहीनें आयर्लंडांतील मानवी जीवित जसें मातीमोल केलें आहे, तसाच साम्राज्यांतील इंग्लंडचा दराराही आतां अगदीं मातीला मिळविला आहे. इंग्लंडच्या आसुरी प्रयत्नांनीं आयर्लंडनें उभारलेलें हें स्वातंत्र्याचें भव्य मंदिर उद्यां कदाचित् नष्ट होईल; परंतु सिनफेन पक्षाच्या स्वार्थत्यागाचें हे साक्षात् स्वरूप जरी इंग्लंडनें उद्यां आयर्लंडच्या दृष्टीपुढून दूर केलें, तरी त्या पक्षाच्या चळवळीनें आयरिश जनतेच्या अंतःकरणांत उद्भूत झालेल्या अमूर्त आणि उज्ज्वल भावना इंग्लंडला नाहींशा करतां येणें अशक्य आहे. मानवी सत्तेचा अधिकार मनुष्याच्या पार्थिव शरीरावर मात्र चालतो. त्या जड शरीराच्या पलीकडे असलेलें दैवी भावनांचें अधिष्ठान जें अंतःकरण त्याला मानवी सत्ता हात लावूं शकत नाहीं. आयरिश प्रजासत्ताक राज्य उद्यां जरी दुर्दैवानें नष्ट झालें, तरी सिनफेन पक्षाच्या आत्मयज्ञाचें हें अद्भुतरम्य आणि अविनाशी स्मारक आयर्लंडांतील भावी पिढ्यांना स्वार्थत्यागाची स्फूर्ति चिरकाल देत राहील आणि अखेर मूर्त स्वरूपानें प्रगट होईल, यांत शंका नाहीं.

आयर्लंडांत एक संपन्न आणि समर्थ राज्यसंस्था आधींच अस्तित्वांत असतां त्या संस्थेला हत-चल करण्याकरितां निराळी अपरसृष्टि, कायद्याचा कोणत्याहि रीतीनें भंग न करतां, निर्माण करणें अत्यंत धोक्याचें आणि धाडसाचें काम होतें. परंतु तें काम ग्रिफिथनें शिताफीनें पार पाडलें. या कार्याला आरंभ ग्रिफिथनें प्रथम खेड्यांतून व तालुक्याच्या मुख्य गांवांतून केला. त्या त्या खेड्यांतील अगर गांवांतील स्थानिक शासनसंस्थांतून सिनफेन सभासदांचा अधिक भरणा करून त्या संस्था सिनफेन पक्षाच्या वर्चस्वाखालीं आणल्यानें आयर्लंडांतील मध्यवर्ती राज्ययंत्रहि आपल्याला कह्यांत ठेवितां येईल, असा त्याचा कयास होता. स्थानिक संस्थांतून सिनफेन पक्षाचें बहुमत केल्यावर त्या सर्व संस्थांवर अधिकार चालविणारें व त्यांना जबाबदार असणारें स्वतंत्र आयरिश पार्लमेंट म्हणजे राष्ट्रीय कायदेमंडळ स्थापन करण्याचा त्याचा बेत होता. आयर्लंडच्या सर्व भागांतून रीतसर निवडलेले तीनशें सभासद या राष्ट्रीय कायदेमंडळांत बसावयाचे आणि ते जे ठराव करतील ते ठराव अमलांत आणण्याचा शक्य तितका कायदेशीर प्रयत्न खेड्यांतील, गांवांतील आणि शहरांतील शासनसंस्थांनीं करावयाचा, अशी ही योजना होती. राष्ट्रीय कायदेमंडळाच्या ठरावाप्रमाणें वागण्याविषयीं बहुजनसमाजाचें मन वळविणें आणि

राष्ट्रीय कायदेमंडळाच्या आज्ञांविषयीं बहुजनसमाजांत एक प्रकारचा प्रेममूलक अभिमान आणि आदर उत्पन्न करणें हाहि एक या योजनेचा अत्यंत महत्त्वाचा भाग होता. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे आयर्लंडला शक्य तितकें स्वायत्त करणें हा या योजनेचा उद्देश होता. अर्थात् कायद्याचें कोणत्याहि रीतीनें उल्लंघन न करितां हें कार्य साधावयाचें होतें !

शिक्षणाच्या बाबतींतहि या धोरणाचा ग्रिफिथनें अवलंब केला. आयर्लंडांतील प्रचलित शिक्षणपद्धति आयरिश मुलांच्या डोक्यांत साम्राज्याभिमानाचें वेड भरविते; स्वदेशाविषयीं, मायदेशाच्या उद्धाराकरितां चाललेल्या प्रयत्नांविषयीं आयरिश मुलांना कांहींहि कल्पना या शिक्षणपद्धतीमुळें येत नाहीं; आयरिश मुलांच्या अंतःकरणांतील देशाभिमान जागृत ठेवणारें ज्ञान त्यांना देण्याऐवजीं त्यांचीं मनें स्वदेशाविषयीं उदासीन करण्याकडेच या शिक्षणपद्धतीचा उपयोग केला जातो, असें ग्रिफिथचें मत होतें. प्राथमिक शिक्षणाची व्यवस्था खेड्यापाड्यांतून शाळा काढून करावयाची आणि नवीन शिक्षणसंस्था उत्पन्न करण्याकरितां फंड गोळा करावयाचा, असा त्याचा बेत होता. आयर्लंडांतील दुय्यम शिक्षणाची व्यवस्था बव्हंशीं 'आयरिश ख्रिस्ती बंधुसमाज' ( Irish Christian Brothers ) या स्वदेशी संस्थेच्या हातांत आहे. परंतु या संस्थेच्या कारभारावर नजर ठेविण्याचें काम 'इंटरमीजिएट बोर्ड' हें सरकारी खातें करितें आणि त्या खात्याकडून होणाऱ्या द्रव्यसाहाय्यावरच आयर्लंडांतील दुय्यम शिक्षणाची व्यवस्था अवलंबून असते. या द्रव्यसाहाय्याची अपेक्षा न करितां 'इंटरमीजिएट बोर्डा'चा अंमल झुगारून देऊन शिक्षणविषयावर परिश्रम केलेल्या तज्ज्ञ देशभक्तांच्या सल्ल्यानें व साहाय्यानें या शिक्षणसंस्था चालविण्यांत याव्यात असा ग्रिफिथचा आपल्या देशबांधवांना उपदेश होता. नवीन शिक्षणसंस्था काढण्यापेक्षां सर्व साधनांनीं समृद्ध असलेल्या जुन्या संस्था ताब्यांत घेणें हेंच अधिक श्रेयस्कर होतें; कारण त्यामुळें श्रमाचा आणि संपत्तीचा विनाकारण होणारा फाजील व्यय वांचून राष्ट्रीय शिक्षणाचें कार्य सुकर होईल, असें त्याचें मत होतें. राष्ट्रीय शिक्षणानें नवीन पिढी अधिक कर्तबगार व स्वार्थत्यागी निपजून आयर्लंडचें उद्धारकार्य आजच्या पिढीला जितकें जड जात आहे, तितकें पुढच्या पिढीला जड जाणार नाहीं अशी त्याची श्रद्धा होती.

जर्मनीच्या औद्योगिक उत्कर्षाला ज्याचे प्रयत्न विशेष कारणीभूत

झाले आणि त्यामुळें इंग्रजांनीं ज्याचा अतोनात दुष्टावा केला, त्या फ्रेडरिक लिस्ट या विख्यात जर्मन अर्थशास्त्रज्ञाचें धोरण ग्रिफिथनें आयरिश उद्योगधंद्यांच्या पुनरुज्जीवनाच्या बाबतींत स्वीकारलें आहे. निव्वळ शेतकी किंवा निव्वळ व्यापार यांना उत्तेजन देण्यापेक्षां शेतकी आणि व्यापार या दोहोंनाहि सारखेंच उत्तेजन देणें अवश्य आहे असें लिस्टचें मत असून, निव्वळ शेतकीला वाहून घेणाऱ्या राष्ट्राची बौद्धिक प्रगति होणार नाहीं व गिरण्या आणि कारखाने यांच्यावरच राष्ट्राची समृद्धि आणि प्रगति अवलंबून असते असा त्याचा सिद्धांत आहे. त्याला अनुसरून झीज सोसून स्वदेशी माल वापरावा व आयरिश स्थानिक शासनसंस्थांनीं स्वदेशी मालालाच मागणी करून देशी धंद्यांना उत्तेजन द्यावें, असा दुहेरी उपाय आयरिश जनतेला या बाबतींत सुचविण्यांत आला. बाहेरून येणाऱ्या मालावर कडक जकाती बसवाव्या अशीहि एक सूचना करण्यांत आली. परंतु या सर्व उपायां-पेक्षां इंग्रजी बँकेंतून गुंतलेल्या आयरिश भांडवलाच्या जोरावर आयरिश उद्योगधंद्यांना उत्तेजन देण्याच्या उपायावरच विशेष भर देण्यांत आला. इंग्रजी बँकेंत गुंतलेलें आयर्लंडचें भांडवल सोडवून घेऊन त्याच भांडवलावर आयरिश राष्ट्रीय पेढी उभारणें, हेंहि एक या उपायाचें प्रमुख अंग होतें. इंग्रजी न्यायपीठांवर बहिष्कार घालून खासगी लवाद-कोर्टें उघडणें हाहि एक या चळवळीचा भाग होता.

ग्रिफिथच्या असहकारितेच्या चळवळीचें सामान्यतः असें स्वरूप आहे. आयर्लंडांतील असहकारितेच्या चळवळीचा रोख, ज्या शासनसंस्थांशीं सर-कारचा प्रत्यक्ष संबंध बराच कमी येतो, त्या संस्था बहुमताच्या जोरावर काबीज करण्याकडे— त्या संस्थांनाच सिनफेन स्वरूप देऊन त्यांच्याकडून कायदेशीर रीतीनें आपलें काम साधून घेण्याकडे— विशेष आहे. ज्या संस्थांशीं सरकारचा हरघडी संबंध येतो, आणि जेथें सरकारी बहुमतच नेहमीं राहील अशी तजवीज करण्यांत आली आहे अशा संस्थांतसुद्धां, सरकारच्या कलानें मान तुकविणाऱ्या देशद्रोह्यांना निवडून येण्याची संधि न देतां, आपल्या पक्षांतील लोकांनाच निवडून देऊन नंतर त्या संस्थांवर राजीनामा न देतां नुसता बहिष्कार घालण्याचें धोरण सिनफेन पक्षानें स्वीकारलें व तें धोरण अत्यंत परिणामकारक करून दाखविलें. १९१८ सालच्या पार्लमेंटच्या

निवडणुकींत सिनफेन पक्षाचे ७३ सभासद निवडून आले; व या सर्वांनीं नंतर आपल्या जागांचा राजीनामा न देतां पार्लमेंटवर नुसता बहिष्कार घातला. या बहिष्कारामुळें इंग्रजी पार्लमेंटांतील ७३ जागा रिकाम्या पडल्या. परंतु सभासदांनीं राजीनामा न दिल्यामुळें कायदेशीर रीतीनें इतरांना त्या जागा मिळवणें अशक्य झालें ! या निवडणुकीच्या वेळीं सिनफेनर्सनीं काढलेला जाहीरनामा विलक्षण सूचक होता. साधेल त्या उपायांनीं व लागेल त्या साधनांनीं इंग्लंडचें आयर्लंडवरील अधिराज्य नष्ट करण्याचा आपला इरादा सिनफेन पक्षानें या जाहीरनाम्यांत व्यक्त केला आणि तहपरिषदेला व सर्व जगाला साक्षी ठेवून इंग्लंडविरुद्ध स्वातंत्र्ययुद्ध पुकारलें! निवडणुकींत यशस्वी झालेले सिनफेन पक्षाचे कांहीं उमेदवार त्या वेळीं तुरुंगांत सरकारचा पाहुणचार घेत होते. सिनफेन पक्षाचा सुप्रसिद्ध पुढारी डी व्हॅलेरा हाहि तेव्हां तुरुंगांत होता. निवडणुकीचें काम पुरें होतांच सिनफेन पक्षाच्या कार्यकारी मंडळानें आपल्या पक्षाची परिषद बोलाविली. डब्लिन शहरांत भरलेल्या या परिषदेला सर्व स्वतंत्र सिनफेन सभासद हजर राहिले; परंतु आमंत्रण असतांनासुद्धां राष्ट्रीय पक्षाचे व अल्स्टरचे सभासद या परिषदेपासून अलिप्त राहिले ! याच सभेचें रूपांतर 'आयरिश पार्लमेंट' ( Dail Eireann ) या प्रजासत्ताक राज्याच्या प्रातिनिधिक शासनसंस्थेंत झालें. याच सुमारास डी व्हॅलेरा हा तुरुंगांतून निसटला; व सिनफेन परिषदेनें केलेल्या ठरावाप्रमाणें त्यालाच या आयरिश प्रजासत्ताक राज्याच्या पार्लमेंटचें अध्यक्षस्थान देण्यांत आलें ! या पार्लमेंटच्या पहिल्या बैठकीला त्याला हजर राहतां आलें नाहीं; परंतु त्याचा ओजस्वी संदेश या बैठकींत वाचण्यांत आला. अशा रीतीनें जणूं काय आयर्लंडवरील इंग्रजांचें राज्य नाहींसें होऊन आयर्लंड स्वतंत्र झालें आहे अशा थाटांत अगदीं बेगुमानपणानें हें सिनफेन पक्षाचें 'आयरिश प्रजासत्ताक राज्य' आयर्लंडचा कारभार पाहूं लागलें !

ऑर्थर ग्रिफिथ हा या आयरिश पार्लमेंटचा उपाध्यक्ष होता. ग्रिफिथच्या ज्या योजनेचें वर वर्णन दिलें आहे, ती योजना अमलांत आणण्याचा या पार्लमेंटनें प्रयत्न केला. आयर्लंडांतील इंग्रज सरकारहि या वेळेपर्यंत स्वस्थ बसलें नव्हतें. 'आयरिश पार्लमेंट' ही बेकायदेशीर संस्था आहे असें सरकारनें जाहीर केलें आणि दडपशाहीला प्रारंभ झाला. तेव्हां संस्थेच्या सभा

गुप्तपणें भरविण्यांत येऊं लागल्या! सभासदांना तुरुंगांत पाठविण्यांत येऊन आयर्लंडांत धरपकड सुरू झाली. आयरिश पार्लमेंटाचा अध्यक्ष डी व्हॅलेरा हा तुरुंगांतून निसटून अमेरिकेस गेला व आयर्लंडच्या दुःखाची कहाणी त्यानें स्वातंत्र्यप्रिय अमेरिकन जनतेला सांगून आयरिश पार्लमेंटच्या मदतीकरितां प्रचंड द्रव्यनिधि कर्ज उभारून जमा केला. आयर्लंडांतहि कर्ज उभारण्याचे प्रयत्न करण्यांत आले. आयर्लंडांतील नोकरशाहीनें या राष्ट्रीय कर्जाच्या दस्तऐवजांची राजद्रोही पत्रकांत गणना केली आणि या कर्जाची उद्देशपत्रकें छापण्याच्या राजद्रोही कृत्याबद्दल वीस आयरिश वर्तमानपत्रें बंद करण्यांत आलीं! आयरिश पेढयांकडेहि सरकारनें या द्रव्यनिधीचा सुगावा लागावा म्हणून आपली दुष्ट दृष्टि वळविली; परंतु आयरिश पेढयांनीं आपल्या राष्ट्राला दगा देण्याचें साफ नाकारिलें.

आयरिश पार्लमेंटनें स्वयंसैनिकांचीं पथकें व स्वतःचें स्वतंत्र पोलिसखातें सार्वजनिक सुरक्षिततेकरितां उभारिलें आहे. आयर्लंडांत शांतता राखण्याचें काम इतके दिवस ब्रिटिश सरकारचें पोलिस करीत असे. परंतु सिनफेन सभासदांच्या आणि संस्थांच्या नाशाचें कार्य ज्या वेळीं ब्रिटिश सरकारनें आरंभिलें, त्या वेळीं त्या लष्कराच्या दिमतीला हें सरकारी पोलिसखातें देण्यांत आलें आणि तेथपासून सार्वजनिक शांतता राखण्याचें काम सोडून देऊन सिनफेन चळवळीविषयीं या लष्कराला स्थानिक माहिती पुरविण्याचा मक्ता पोलिसखात्यानें घेतला आहे! हें राज्यरक्षणाचें पवित्र कार्य पोलिसखात्यानें आपल्याकडे घेतल्यामुळें आयर्लंडांत बंदोबस्त ढिला पडून गुन्हेगारी वाढूं लागली. या गुन्हेगारीला आळा घालण्याचें काम सिनफेन पोलिसखातें करीत असतें! गुन्हेगार इसमांना प्रजासत्ताक राज्याच्या न्यायपीठापुढें नेण्यांत येऊन तेथें त्यांची चौकशी होते. कांहीं तरी उपयुक्त काम सक्तीनें या गुन्हेगारांकडून शिक्षेदाखल करून घेण्यांत येतें. गुन्हा तसाच भयंकर असल्यास क्वचित् हद्दपारीचीहि शिक्षा देऊन ती अमलांत आणण्यांत येते. सरकारी पोलिसखात्यांतील जे लोक निगरगट्ट आणि निर्घृण नाहींत, त्यांना अलीकडे सरकारनें चालविलेल्या अमानुष आणि नृशंस कृत्यांचा तिटकारा येऊं लागला असून, त्यामुळें सरकारी पोलिसखातें दिवसेंदिवस रोडावत चाललें आहे! अशा तऱ्हेची ही ऑर्थर ग्रिफिथची आयर्लंडांतलि 'अपरसृष्टि' आहे.

प्रतिभासंपन्न कवींच्या कल्पनेनें स्वप्नें पाहावीं आणि प्रतापी कर्मवीरांच्या कर्तृत्वानें त्या स्वप्नजालांतून सत्यसृष्टि अवतरावी, असा अद्भुत योग राष्ट्रांच्या घडामोडींत कधींकाळींच येत असतो. असा हा कधींकाळीं येणारा सुवर्णयोग आज आयर्लंडांत आलेला दिसत आहे. ग्रिफिथच्या आयरिश प्रजासत्ताक राज्याचें वर्णन वाचून माझिनीच्या रोमन प्रजासत्ताक राज्याची आठवण झाल्याशिवाय राहत नाहीं. माझिनीचें प्रजासत्ताक राज्य औट घटकेपर्यंतच टिकलें; व ग्रिफिथच्या प्रजासत्ताक राज्याचीहि उद्यां कदाचित् तीच स्थिति होईल. परंतु व्यक्तींचें आणि संस्थांचें महत्त्व त्यांच्या चिरस्थायित्वावर अवलंबून नसतें. त्या व्यक्तींनीं किंवा त्या संस्थांनीं यशस्वी करून दाखविलेल्या अभिनव कार्यपद्धतीवर—त्या कार्यपद्धतीनें घडवून आणिलेल्या क्रांतीवर—त्यांचें महत्त्व अवलंबून असतें. माझिनी आणि ग्रिफिथ यांनीं उभारिलेल्या संस्था जगांतील पाशवी शक्तीनें जरी धुळीला मिळविल्या, तरी त्या संस्थांनीं घडवून आणिलेल्या क्रांतीचे परिणाम जगाच्या भवितव्यावर झाल्याशिवाय राहिले नाहींत व राहणार नाहींत. आयर्लंडांत चालू असलेला हा असहयोग यशस्वी झाला नाहीं, तरी तो असहयोग आचरण्यांत आयरिश जनतेनें जें असामान्य राष्ट्रप्रेम व जी असाधारण त्यागबुद्धि दाखविली आहे, ती जगांतील इतर परतंत्र राष्ट्रांना स्वार्थ-त्यागाची स्फूर्ति दिल्याशिवाय कधींहि राहणार नाहीं.

केसरी, १५ फेब्रुवारी १९२१

## आयर्लंड स्वतंत्र झालें : : ८

The British minister mistakes the Irish character. He has intended to keep Ireland a slave. But there is no middle policy; either thoroughly emancipate her or fundamentally destroy.
—*Grattan*

इंग्रजी प्रधानमंडळ आणि आयरिश सिनफेन पक्षाचे पुढारी यांची आज सतत चार महिने चालू असलेली वाटाघाट संपून अखेर गेल्या आठवड्यांत आयर्लंड 'स्वतंत्र राष्ट्र' (Free State) झालें. मुख्य प्रधान लॉइड जॉर्ज यांनीं मुत्सद्दीपणानें घडवून आणलेल्या या तडजोडीबद्दल जॉर्ज बादशहांनीं त्यांचें अभिनंदनहि केलें आहे. महायुद्धानंतर राजेसाहेबांच्या कारकीर्दीत जर कोणती संस्मरणीय गोष्ट घडली असेल, तर ती म्हणजे आयर्लंडांतील हें 'शांततेचें युद्ध'च होय. महायुद्धापेक्षांहि हें 'शांततेचें युद्ध' अधिक उग्र आणि भीतिदायक होतें असें म्हटलें असतां चालेल. इंग्रजी साम्राज्याची शांतता आणि सुरक्षितता व इंग्लंडचा दरारा आणि लौकिक या 'युद्धा'च्या परिणामावर अवलंबून होता; महायुद्धांत इंग्लंडचा सत्पक्ष होता; पण हें 'शांततेचें युद्ध' त्यानें उघड उघड अन्यायानें चालविलें होतें.

त्यामुळें युरोपच्या रणांगणावर जर्मनीला लोळवून विजयी झालेल्या इंग्लंडल
सत्याग्रही आयर्लंडनें या 'युद्धां'त अगदीं टेकीस आणिलें. या 'युद्धा'च
निकाल प्रतिकूल लागून जर आयर्लंडांत यादवी माजती, तर इंग्लंडची स
जगभर दुष्कीर्ति झाली असती; व म्हणूनच जाणूनबुजून पडतें घेऊ
ब्रिटिश मुत्सद्द्यांनीं उभय राष्ट्रांना श्रेयस्कर असा हा 'तह' घडवून आणिला
या 'तहा'नें आयर्लंड स्वतंत्र, इंग्लंड सुखी आणि साम्राज्य सुरक्षित झालें आहे

वस्तुतः ही तडजोड यापूर्वीच घडून यावयास हवी होती; व तसें झा
असतें म्हणजे उभयपक्षांतील मुत्सद्द्यांना गेले चार महिने जी याताया
पडली व ज्या येरझारा घालाव्या लागल्या त्या चुकल्या असत्या. प
इंग्लंडचें चढेलपणाचें धोरण या बाबतींत बरेच दिवस नडलें. आयरि
पुढाऱ्यांनींहि कांहीं कमी ओढून धरलें होते अशांतला भाग नाहीं. परं
तसें जर त्यांनीं केलें नसतें, तर आज जें त्यांना मिळालें आहे तें कदाचि
मुळींच मिळालें नसतें ! महायुद्धाच्या आरंभीं, किंवा हें तडजोडीचें बोल
सुरू करितांना, इंग्लंडनें आयर्लंडला देऊं केलेलें स्वराज्य आणि आ
आयर्लंडच्या प्रत्यक्ष पदरांत पडत असलेलें स्वराज्य यांत फार अंतर आहे
त्या वेळीं देऊं केलेल्या स्वराज्यांत स्वतंत्र पार्लमेंटचा देखावा आणि स्थानि
स्वराज्याची धुगधुगी होती. असलें स्वराज्य आयर्लंडनें या लोकसत्तेच्य
काळांत धिक्कारपूर्वक नाकारलें यांत नवल नाहीं. १७८० सालीं आयर्लंड
स्वातंत्र्य जाहीर करितांना त्या वेळचा प्रसिद्ध आयरिश पुढारी ग्रॅटन या
असे उद्गार काढले होते कीं, " व्यापाराच्या सवलती किंवा इतर चिल्लर ह
मिळाल्यानें आयर्लंड गप्प बसेल अशी जर मुख्य प्रधानांची कल्पना असली
तर ती चुकीची आहे. आयर्लंडचा स्वभाव त्यांना कळला नाहीं. आयर्लंडल
स्वातंत्र्य तरी द्या नाहीं तर त्याचा उच्छेद तरी करा; याशिवाय दुस
मार्ग नाहीं !"

ग्रॅटननें ज्या वेळीं हे उद्गार काढले, त्या वेळीं लोकसत्तेचें युग नव्हतें. खु
इंग्लंडांतहि तेव्हां राजसत्ता प्रबळ होती. मध्यंतरीं स्वराज्याच्या चळवळीमु
ही स्वातंत्र्याची कल्पना जरी मागें पडली असली, तरी ती केवळ इंग्लंडच्य
न्यायबुद्धीला टोचणी लावून सामोपचारानें कांहीं मिळवितां आलें तर पाहा
या हेतूनें. परंतु महायुद्धानंतर सामोपचाराचा कांहीं उपयोग होत नाहीं अ

स्पष्ट दिसून आल्यामुळे, आयरिश पुढाऱ्यांनीं स्वराज्याचें बोलणें बंद करून पूर्ण स्वातंत्र्याचा पुरस्कार केला; व आयर्लंडांत स्वतंत्र लोकसत्ताक राज्य उभें केलें. आयर्लंड आणि इंग्लंड यांच्या दरम्यान गेलीं दोन वर्षे जो लढा चालू होता, तो या पूर्ण स्वातंत्र्याच्या मागणीबद्दलच होय. आयरिश जनता नको नको म्हणत असतां, इंग्लंडनें केवळ लष्करी सत्तेच्या जोरावर आयर्लंडांत 'स्वराज्य' स्थापन केलें; पण त्यामुळें खरा तंटा मिटला नाहींच, उलट अधिक पेटला. एक शतकभर अलौकिक स्वार्थत्याग आणि अप्रतिहत चळवळ केल्यावर आयरिश राष्ट्र नुसत्या स्थानिक स्वराज्यावर संतुष्ट होणें शक्यच नव्हतें. शेवटीं आयर्लंडला तें मागत आहे तसलें स्वराज्य तरी द्यावें, नाहीं तर त्याचा नायनाट करावा अशी स्थिति जेव्हां येऊन ठेपली, तेव्हां इंग्लंडनें तडजोडीचा चूट काढला.

परंतु उभय पक्षांचे पुढारी एकत्र जमून कांहीं तरी तडजोड होण्याचा घाट लवकर जमून येईना. आयर्लंडांत प्रस्थापिलेलें लोकसत्ताक राज्य तुम्ही कबूल कराल, तरच आम्ही तडजोडीला तयार होऊं, अशी निकराची भाषा सिनफेन पुढारी बोलूं लागले; व राजनिष्ठेचें तत्त्व मान्य केल्याशिवाय ब्रिटिश मुत्सद्दी कसल्याहि इतर तडजोडीला कबूल होईनात. अखेर मुख्य प्रधानांनीं सिनफेन पुढाऱ्यांना सलगींत घेऊन, इंग्लंडच्या इभ्रतीकरितां तरी राजनिष्ठेच्या तत्त्वाला संमति द्या, असें खासगी रीतीनें सांगितल्यामुळें, उभय पक्षांच्या अग्रणींची संयुक्त परिषद भरणें शक्य झालें. तरीहि या परिषदेंतून कांहीं निष्पन्न होईल, असें कोणालाहि निश्चयानें वाटत नव्हतें. कारण अशा संयुक्त परिषदा आयर्लंड-च्या भवितव्याची चर्चा करावयाला आजपर्यंत पुष्कळच भरल्या आहेत ! त्यांतहि या परिषदेच्या आरंभापासूनच इतके मतभेद उद्भवले कीं, त्यामुळें या परिषदेकडून कांहींहि न होण्याचाच संभव अधिक दिसूं लागला.

पण इंग्लंड आणि आयर्लंड या दोन्ही राष्ट्रांच्या सुदैवानें ही परिषद यशस्वी झाली. या तडजोडीमुळें आयर्लंडला पूर्ण आर्थिक व लष्करी स्वातंत्र्य मिळालें असून, स्वतःचें आरमार ठेवण्याचाहि हक्क मिळाला आहे. तूर्त आयर्लंडचें आरमार तयार होईपर्यंत इंग्लंडचें आरमार त्याचें संरक्षण करणार आहे. अल्स्टरचा सवता सुभा जरी या तहानें काढून घेण्यांत येणार नाहीं,

तरी जर अल्स्टरनें अनुमति दर्शविली, तर त्यालाहि आयर्लंडच्या नवीन राज्यघटनेंत स्थान मिळेल. पण आज तरी अल्स्टर बहुधा आयर्लंडपासून फुटून राहणार असें दिसतें. अल्स्टर आणि आयर्लंड यांचा समेट साम्राज्य सरकारच्या आज्ञेनें किंवा कोणत्याहि प्रकारची जबरदस्ती करून होण्यासारखा नाहीं. त्यांचें वैर भावनांचें आहे व त्यांनीं मनावर घेतलें तरच तें तुटेल. उत्तर व दक्षिण कॅनेडियन किंवा डच व ब्रिटिश आफ्रिकन यांचें वैर जसें कालांतरानें आपसांत वाटाघाट व तडजोड होऊन नष्ट झालें, तसेंच आयर्लंडचेंहि होईल अशी उमेद बाळगावयाला हरकत नाहीं. शिवाय या नवीन तहानें जे आर्थिक संबंध उद्भवले आहेत, त्यांमुळें अल्स्टर व इंग्लंड एका बाजूला आणि आयर्लंड एका बाजूला अशी स्थिति झाली आहे. ही स्थिति आयर्लंड व अल्स्टर यांना जाचक असल्यामुळेंहि त्यांना समेट करणें भाग पडेल असें वाटतें. थोडक्यांत सांगावयाचें तर असें म्हणतां येईल कीं, या तहानें आयर्लंडला 'वसाहतीचें स्वराज्य' मिळालें. ग्रिफिथ आणि डी व्हॅलेरा यांच्या परिश्रमांना यश येऊन आयर्लंड अखेर स्वतंत्र झालें, याबद्दल कोणालाहि आनंद वाटल्यावांचून राहणार नाहीं. अवघ्या दीड महिन्यापूर्वी इंग्लंड तडजोडीला तयार असल्याबद्दल राजेसाहेबांनीं पोपला एक संदेश पाठविला होता. त्याचा इनकार करून तडजोडीच्या प्रयत्नाला मोडता घालण्यासारखें गैरमुत्सद्दीपणाचें विध्वंसक कृत्य केल्याबद्दल 'लंडन टाइम्स'नें डी व्हॅलेराला त्या वेळीं नासधूस करीत हिंडणाऱ्या मस्त पोळाची उपमा दिली होती ! परंतु 'लंडन टाइम्स'च्या गोटांतल्या इंग्रजी मुत्सद्द्यांना अखेर आयरिश पुढाऱ्यांपुढें नमतें घ्यावें लागलें, यावरूनच कोणाची मुत्सद्देगिरी श्रेष्ठ प्रतीची आहे, हें स्पष्ट दिसून येतें.

इंग्लंड व आयर्लंड यांजमधील तडजोडीच्या अटीवर ब्रिटिश पार्लमेंटांत गेल्या आठवड्यांत वादविवाद झाला. अल्स्टरच्या वतीच्या कांहीं सभासदांनीं ही तडजोड हाणून पाडण्याचा अश्लाघ्य प्रयत्न केला; परंतु त्यांचा डाव न साधून अखेरीस ही तडजोड कॉमन्स सभेंत ४०१ विरुद्ध ५८ मतांनीं मंजूर झाली; व लॉर्डांच्या सभेंतहि ती १६६ विरुद्ध ४७ मतांनीं मान्य करण्यांत आली. खुद्द आयर्लंडमध्यें मात्र डी व्हॅलेरा व त्याचे दोघे अनुयायी हे या तडजोडीला नाकबूल आहेत. पण आयरिश लोकमत त्यांच्या बाजूला नसून

कॉलिन्स व ग्रिफिथ यांचा तडजोड मान्य करणारा पक्षच प्रबळ आहे; व डेल एरिनच्या सभेत हा ठराव मान्य केला जाईल, असाच संभव अधिक दिसतो. गेले दोन दिवस डेल एरिनची खासगी बैठक झाली; व त्यानंतर जाहीर बैठक होऊन काल सोमवार ता. १९ रोजीं ११ वाजतां मतांची मोजदाद होऊन निकाल जाहीर व्हावयाचा होता; व बहुतकरून तडजोड मान्य करण्याचें ठरून एव्हांना ' आयरिश फ्री स्टेटची ' मुहूर्तमेढ रोंवली गेली असेल.

तथापि आयर्लंडचें नशीब असें कांहीं शिकंदर आहे कीं, तें त्याला कोणत्या वेळीं कसा दगा देईल हें कांहीं सांगवत नाहीं. म्हणून जोंपर्यंत हा तह उभय पक्षांकडून मंजूर झाला नाहीं, तोंपर्यंत तरी आयर्लंड स्वतंत्र झालें, असें म्हणणें कठीण आहे. शिवाय हा समेट उभयपक्षीं मान्य होऊन अमलांत न आल्यास इंग्लंडचीहि बुद्धि केव्हां फिरेल याचा कांहीं नेम नाहीं. ईजिप्तलाहि इंग्लंडनें असेंच स्वातंत्र्य दिलें होतें. पण त्या बाबतींत आतां ईजिप्तची कशी फसवणूक चालली आहे हें सर्वांना माहीतच आहे. जो प्रसंग आज ईजिप्तवर आला आहे, तोच कदाचित् उद्यां आयर्लंडवर येईल. वचनभंग करण्याची दिक्कत अलीकडे इंग्लंडला मुळींच वाटेनाशी झाली आहे. असो. तूर्त तरी सिनफेन पक्षानें ब्रिटिश मुत्सद्देगिरीवर मात केल्याचें स्पष्ट दिसत आहे. अल्स्टरला सवता सुभा बहाल करून जो डाव इंग्लंडनें मोठ्या डौलानें टाकला होता, तो सिनफेन पक्षानें आज उधळून लावला यांत शंका नाहीं. इंग्लंडच्या आडमुठ्या मुत्सद्देगिरीवर आयर्लंडनें मिळविलेला हा अद्भुत जय जगांतील इतर परतंत्र राष्ट्रांना खचित स्फूर्तिदायक होईल.

केसरी

# वाङ्मयाकडे मी कोणत्या दृष्टीनें पाहतों ? : ९

“ तुम्ही जीविताकडे कोणत्या दृष्टीनें पाहतां ?” असा प्रश्न महेश्वर येथील साहित्यसंमेलनाच्या वेळीं एका तरुण लेखकानें मला केला होता. त्या प्रश्नाचें उत्तर मीं तेव्हा दिलें नाहीं. तें आज दिलें म्हणजे वरच्या प्रश्नाचेंहि उत्तर दिल्यासारखें होईल.

मी वर्तमानपत्राच्या धंद्यांत पडल्यामुळें माझ्या ललित लेखनाला राजकारणाचा रंग चढला, असें पुष्कळांना वाटतें. पण तें खरें नाहीं. वर्तमानपत्राच्या धंद्याशीं माझा संबंध आला नसता, तरीहि माझ्या ललित लेखनाला राजकीय स्वरूप आलें असतें.

याला कारण माझी लहानपणापासूनची परिस्थिति. कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचे एक अनन्य भक्त आणि त्यांच्या वाङ्मयाचे प्रकाशक कै. खंडेराव बेलसरे व ‘कल्याण बॅग्ज’चे जनक आणि ‘विनोद’ पत्राचे संपादक कै. गजाननराव देसाई हे माझ्या वडिलांचे परम स्नेही होते; व त्या दोघांचीहि बैठक आमच्याकडे नेहमीं असे. त्यामुळें मला राष्ट्रीय पक्षाच्या राजकारणाची गोडी लहानपणींच लागली.

वयाच्या तेराव्या वर्षी नाशिक कटाच्या खटल्यांतून निसटलेल्या एका फटिंग तरुणाशीं माझा निकट संबंध आला. त्याचें नांव आतां नीट आठवत

नाहीं — पण बहुधा देवधर हें असावें. त्यानें माझ्याकडून परांजपे, सावरकर, पांगारकर, भागवत, पुरोहितप्रभृतींचीं जप्त पुस्तकें आणि विवेकानंदांचें वाङ्मय वाचून घेतलें. त्याच्या तोंडून मीं महाराष्ट्र आणि बंगाल येथील क्रांतिकारकांच्या अनेक रोमांचकारी गोष्टी ऐकल्या.

त्यानंतर तीन वर्षांनीं इंग्रजी सहावींत असतांना श्री. त्र्यं. वि. पर्वते आणि श्री. के. नी. जोगळेकर यांच्याशीं माझी ओळख झाली. त्या दोघांनींहि आपापल्या परीनें माझ्या मनावर आणि मतांवर परिणाम केला. वर्षाच्या आंतच श्री. श्री. अ. डांगे यांच्याशीं आमचा तिघांचाहि परिचय होऊन त्याचें पर्यवसान गाढ स्नेहांत झालें. पर्वते, जोगळेकर आणि डांगे हे तिघेहि माझ्यापेक्षां वयानें मोठे आणि शिक्षणांतहि पुढें गेलेले. १९१९ ते १९२२ सालपर्यंत आम्हीं चौघांनीं कित्येकदा रोज दहा दहा बारा बारा तास एकत्र घालविले आहेत आणि सगळया जगाच्या राजकारणाची चर्चा केलेली आहे !

ओळख झाल्यावर लवकरच श्री. डांगे यांनीं आयर्लंडवरील आपल्या उत्कृष्ट पुस्तकांचा संच मला दिला. तो आजहि माझ्या संग्रहीं आहे. त्या पुस्तकांच्या वाचनानें स्फुरलेली माझी सिनफेन चळवळीवरील लेखमाला १९२१ च्या जानेवारींत श्री. तात्यासाहेब केळकर यांनीं 'केसरी'तून अग्र-लेखाच्या शेजारीं प्रमुख जागा देऊन प्रसिद्ध केली. माझें 'आधुनिक कवि-पंचक' हें पुस्तक त्यानंतर वर्षानें बाहेर पडलें. पण त्या पुस्तकापेक्षांहि अधिक कीर्ति त्या वेळीं तरी आयर्लंडांतील क्रांतिकारक चळवळीवरील लेखांनीं मला मिळवून दिली. माझ्या पाठोपाठ श्री. पर्वते यांचेहि आयर्लंड आणि ईजिप्त यांच्यावरील लेख 'केसरी'तून प्रसिद्ध झाले.

आमचीं चौघांचीं मनें त्या वेळीं एका दिशेनें काम करीत होतीं. मी ज्या वेळीं 'आधुनिक कविपंचकां'तील लेख 'नवयुगां'तून लिहीत होतों, त्या वेळीं गडकऱ्यांच्या कवितांचे इंग्रजी अनुवाद श्री. डांगे हे 'यंग कॉलेजिएट'-मधून प्रसिद्ध करीत होते; व त्याच सुमारास श्री. पर्वते यांची 'एकच प्याला' वगैरे मद्यपानविषयक तीन नाटकांवरील टीकाहि 'नवयुगां'तून प्रकाशित झाली. श्री. जोगळेकर स्वतः लिहीत नसत. पण त्यांचें आम्हांला सतत प्रोत्साहन असे. ते, पर्वते आणि डांगे हे तिघेहि वाङ्मयाला कलेच्या दृष्टीनें कांहीं किंमत देत नसत. मतप्रसाराचें एक साधन, राजकीय लढ्यांतील एक

हत्यार हीच काय ती त्या तिर्वांच्या दृष्टीनें वाङ्मयाची उपयुक्तता होती. त्यांच्या या वारंवार कानांवर पडणाऱ्या आग्रही विचारसरणीनें माझ्या लेखनाचें स्वरूप आणि भवितव्य निश्चित केलें.

१९२३ नंतर आमच्या आयुष्याला वेगळ्या वाटा फुटून मी पुण्यास सर्व्हंट्स् ऑफ इंडिया सोसायटींत येऊन राहिलों. सोसायटींत त्याच सुमारास उमेदवार म्हणून दाखल झालेले बंगाली तरुण कै. ज्योतिर्भूषण सेन यांच्याशीं माझा गाढ स्नेह जमला. त्यांचें पूर्वायुष्य गूढ आणि मतें क्रांतिवादी होतीं. त्यानंतर लगेच 'केसरी'चे अत्याचारी चळवळ आणि परराष्ट्रीय राजकारण यांच्यावरील लेखक श्री. अ. ज. करंदीकर यांच्याशीं श्री. वसंतराव कर्णिक यांनीं माझी ओळख करून दिली. बंगाली वाङ्मय आणि क्रांतिकारक चळवळ या दोहोंच्या माहितीच्या बाबतींत मी करंदीकरांचा ऋणी असून, सेन आणि करंदीकर या दोघांनींहि माझ्या विचारांवर पुष्कळच परिणाम केला आहे.

माझ्या विचारांना आणि लेखनाला राजकीय स्वरूप यावयाला या सर्वच व्यक्ति कारण झाल्या; व १९१८ पासून गेल्या वीस वर्षांत मीं जें निरनिराळ्या प्रकारचें लेखन केलें, त्याचें स्वरूप मुख्यतः राजकीय राहिलें आहे. इतकेंच नव्हे, तर पर्वते, जोगळेकर, डांगे आणि मी अशा चौघांनीं १९१७ पासून १९२२ पर्यंत ज्या अनेक कल्पनांची चर्चा केली, त्यांचाच पुरस्कार माझ्या कादंबऱ्यांतून होत आला आहे. सामान्यतः आम्ही चौघेहि समाजवादी. पण माझा ओढा समाजवादापेक्षां राष्ट्रीयत्वाकडे अजूनहि जास्त आहे; व त्यामुळेंच 'शाप' कादंबरींतील 'निशिकांता'च्या तोंडीं 'नॅशनल सोशॅलिझम'ला सदृश अशी विचारसरसरणी अगदीं न कळत येऊन गेली.

अर्थात् जीविताकडे पाहण्याची माझी दृष्टि सर्वथैव राजकीय आहे; व त्यामुळें वाङ्मय हें मला जीवितसंगरांतील केवळ एक शस्त्र, एक हत्यार वाटतें. तें हत्यार जास्तींत जास्त प्रभावी आणि परिणामकारक होण्यासाठीं कलेची काय मदत घ्यावी लागेल, तेवढीच. त्यापरतें कलेला माझ्या दृष्टीनें जास्त महत्त्व नाहीं.

मनोहर, जुलै १९३९

# मी आणि माझे वाचक : : १०

साहित्यिकांची कीर्ति आणि लोकप्रियता ही किती पोकळ आणि मर्यादित असते, याचें वर्णन करितांना कै. तात्यासाहेब कोल्हटकर हे केव्हां केव्हां आपला एक गमतीदार अनुभव सांगत असत. महाराष्ट्रांतील एका प्रमुख शहरांत एका वाङ्मयोत्सवाचे अध्यक्ष म्हणून ते गेले असतां, त्या शहरांतील खाजगी हायस्कूलच्या चालकांनीं त्यांना आपल्या शाळेंत बोलावून त्यांचा सत्कार केला. समारंभाच्या पूर्वी शाळा पाहत पाहत कोल्हटकर सहावीच्या वर्गांत आले, त्या वेळीं तेथें मराठी विषय चालू होता; व योगायोग असा, कीं त्या विषयाचे शिक्षक क्रमिक पुस्तकांत घेतलेला त्यांच्या एका विनोदी लेखांतलाच उतारा मुलांना शिकवीत होते. ही गोष्ट तात्यासाहेबांच्या लक्षांत येतांच साहजिकच त्यांनीं एका मुलाला कुतूहलानें विचारलें, " काय रे, तुला हा लेख लिहिणाऱ्या कोल्हटकरांबद्दल काय माहिती आहे ? " त्यावर तो मुलगा चाचरत म्हणाला, " त्यांनीं 'नारिंगी निशाण' नाटक लिहिलंय न् ते वारल्याला पन्नास वर्षं झालीं ! "–" तुला हा त्यांचा लेख वाचून काय वाटलं ? "– " मला कंटाळा आला. समजतच नाहीं त्यांतलं कांहीं मुळीं ! " हीं प्रश्नोत्तरें सांगून तात्यासाहेब म्हणत, " स्वतःच्या कीर्तिविषयींच्या आणि

विनोदकौशल्याविषयींच्या माझ्या अभिमानाला चांगलाच धक्का बसला त्या दिवशीं ! आणि आपल्या नाटकांचं चीज होण्याच्या बाबतींत भवभूतीनं भावी पिढ्यांवर टाकलेली भिस्त किती अनाठायीं आहे, याचीहि मला चांगली कल्पना आली ! ”

कोल्हटकरांच्या या उद्गारांची प्रतीति मला अगदीं अभावितपणानें गेल्या जानेवारींत आली. रेडियोवर व्याख्यान देण्यासाठीं मी मुंबईस गेलों असतां, माझ्या व्याख्यानाचे विषय ऐकून माझे एक टीकाकार स्नेही उद्गारले, “ हरिभाऊ आपट्यांवर व्याख्यान द्यायचं कशाला कबूल केलंत तुम्ही ? वाचतोय कोण आतां हरिभाऊंचीं तीं बाडं ?—”

त्यांचा तो हरिभाऊंवरचा ताशेरा ऐकून मी अगदीं सर्द झालों आणि एकदम माझ्या गुरूंच्या अनुभवाची मला आठवण झाली. हरिभाऊ आणि तात्यासाहेब ! मराठी साहित्याच्या दोन विभागांचे प्रभावशाली प्रवर्तक हे आणि त्यांच्या कीर्तीची ही कुतरओढ !

तरीसुद्धां माझी नवी कादंबरी प्रसिद्ध झाल्यावर पहिले दोन-तीन महिने जेव्हां अगदीं अज्ञात अशा वाचकांचीं प्रशंसापर किंवा पृच्छात्मक अशीं पत्रांवर पत्रें येतात, तेव्हां मला आपल्या वाढत्या लोकप्रियतेबद्दल अभिमान वाटल्या-विना राहत नाहीं. विशेषतः त्या कादंबरीवर वर्तमानपत्रांतून जर टीकेचा भडि-मार होत असला आणि त्याच वेळीं जर अनाहूत खाजगी पत्रांतून कृतज्ञतापूर्ण धन्यवाद मिळत असले, तर मनाला एक विशेष प्रकारचें समाधान निःसंशय लाभतें. ‘शाप’ कादंबरीवरील टीकेचें वादळ माझ्या डोक्यावर जोरानें कडाडत असतां मला जीं दोन पत्रें अकस्मात् मुंबई आणि अलाहाबाद येथून एकाच वेळीं आलीं, त्यांनीं माझ्या मनाला दिलेला दिलासा मला चांगला आठवतो. त्यांपैकीं एक पत्र मुंबईच्या एका तरुण पदवीधर शिक्षिकेचें होतें; व दुसऱ्या पत्राचा लेखक अलाहाबाद येथील एक कायद्याचा महाराष्ट्रीय विद्यार्थी होता. दोन्ही पत्रांतील अभिनंदनाचा मुद्दा मात्र एकच होता. तो असा कीं, सध्यांच्या संक्रमणकाळांत जे बिकट आणि नाजुक असे प्रश्न आणि प्रसंग तरुण पिढीपुढें उद्भवत आहेत, त्यांचें दिग्दर्शन त्या कादंबरींत सहानुभूतीनें केलेलें आढळतें. विशेषतः माझ्या त्या अपरिचित भगिनीनें मला लिहिलें होतें, “ मराठीमध्यें उच्च दर्जाच्या विश्लेषणात्मक अशा Sex Novels ( लैंगिक प्रश्नांवरील

कादंबऱ्या ) मुळींच नाहींत. 'शाप' कादंबरी त्या दृष्टीनं मला फार आवडली-मात्र ती जरा कमी रोमँटिक असती, तर बरं झालं असतं ! लॉरेन्सच्या 'लेडी चॅटर्लेज लव्हर ' या कादंबरीविषयीं शॉनं असं म्हटलंय, 'प्रत्येक कुमारिकेनं ही कादंबरी अवश्य वाचावी, अशी माझी शिफारस आहे.' तुमच्या 'शाप' ची शिफारसहि मी याच शब्दांनीं करीन." मला स्वतःला मात्र ही शिफारस आणि लॉरेन्सशीं कल्पिलेलें माझें साम्य कसेंसेंच वाटलें !

पण अशा प्रकारचीं स्तुतिपर पत्रें नेहमींच येतात, असें मात्र नव्हे. 'कांता' कादंबरी प्रसिद्ध झाल्यावर मला जीं अनेक स्त्रीवाचकांचीं पत्रें आलीं, तीं बव्हंशीं प्रतिकूलच होतीं. त्या कादंबरीची नायिका 'कांता' ही अत्यंत दुर्बळ अशी रेखाटल्याबद्दल बहुतेक सुशिक्षित भगिनींचा माझ्यावर घुस्सा झाला; व नागपूरच्या एका पदवीधर भगिनीनें तर, त्या मुद्द्यापुरतें एक प्रतिकूल परीक्षण लिहून तें 'महाराष्ट्रां'त छापण्यासाठीं मजकडे पाठविलें ! माझ्या एका मैत्रिणी-नें त्या कादंबरीवर जो आक्षेप घेतला, तो मात्र मला समर्पक वाटला. तिची तक्रार अशी होती, कीं " नायिका म्हणून जिचें नांव तुम्ही या कादंबरीला दिलें आहे, तिच्यापेक्षां 'सर महादेव ठाकूर' यांचेंच प्रस्थ कादंबरींत माजलेलें न् गाजलेलें दिसतें. त्या दृष्टीनें 'कांते'ऐवजीं तुम्ही 'सर महादेव ठाकूर' हेंच नांव खरोखरी या कादंबरीला द्यावयाला हवें होतें ! " माझ्याहि मनांत कादंबरीला हें नांव देण्याची कल्पना एकदां येऊन गेली होती. कारण, कादंबरीचीं पहिलीं बारा प्रकरणें पुरीं होतांच माझ्या पत्नीनें मला म्हटलें, " सर महादेवांचं व्यक्तित्व तुम्हीं इतकं कांहीं प्रभावी दाखवलंय्, कीं त्यांचंच नांव या कादंबरीला देणं योग्य होईल ! 'कांता' ही त्यांच्यापुढं अगदीं फिकी पडते." या टीकेंत अर्थातच तथ्य होतें; व म्हणून कादंबरीचें नांव बदलण्याचा मोह मला क्षणमात्र पडला हें कबूल केलें पाहिजे. पण, 'कांता' ही, माझ्या अनेक भगिनी समजतात त्याप्रमाणें, मला स्वतःला 'दुर्बल' वाटत नाहीं हें एक; व दुसरें असें कीं, सर महादेवांच्या व्यक्तित्वांतला ताठरपणा फक्त तिच्याच पुढें वेळोवेळीं नमलेला असल्यामुळें, माझ्या दृष्टीनें तिचें कादंबरींतील स्थान आणि महत्त्व अनन्य आहे. पर्वताच्या शिखरावरून पाहणाराला त्याच्या खोऱ्यांतून वाहणाऱ्या नदीचें खोल आणि विशाल पात्र एखाद्या ओहोळासारखें दिसतें हें

खरें. पण तिच्या सलिलसंपदेमुळेंच त्याच्या भोंवतालचा सपाट प्रदेश हिरवागार होऊन त्याला सौम्यसुंदर पार्श्वभूमि लाभते हें विसरून कसें चालेल ? सर महादेवांच्या वृत्तींतील उग्रत्व आणि कांताच्या वृत्तींतील रम्यत्व या दोहों-मुळेंच खरोखरी त्या कादंबरींतील अनेक घटनांना करुणोदात्त स्वरूप प्राप्त झालें आहे, यांत शंका नाहीं.

अनाहूत येणाऱ्या या पत्रांतून कित्येकदां अगदीं विचित्र प्रश्न विचारलेले असतात. 'कांता' कादंबरीचें 'धनुर्धारीं'त जें परीक्षण आलें होतें, त्यांत तिच्यांतील प्रमुख पात्रांचा तोंडवळा नागपुरांतील कोणत्या विद्यमान व्यक्तीं-शीं जुळतो, याचा छडा लावण्याचा प्रयत्न केलेला होता. त्या प्रयत्नाला अनुसरून पुण्याच्या एका तरुण, अपरिचित कथालेखकानें मला विचारलें होतें, " नागपूरच्या कोणत्या साहित्यिकेवरून तुम्ही 'कांता' निर्माण केलीत हें मला कळवाल काय ? मी आपल्याकडून मिळणाऱ्या माहितीची वाच्यता करणार नाहीं. पण, साहित्य आणि साहित्यिक यांच्याविषयींच्या चमत्कृतिजनक माहितीचा संग्रह करण्याचा छंद मला असल्यामुळें, मी आपल्याला हा प्रश्न सरळ सरळ विचारला आहे." मीं त्या प्रश्नाला अद्याप उत्तर दिलेलें नाहीं. पण 'धनुर्धारीं'तील तें परीक्षण वाचल्यावर पहिल्या सपाट्याला मला त्या विधानाचा जो राग आला, त्याच्या भरांत मीं माझे मित्र श्री. प्रभाकर पाध्ये यांना तत्क्षणींच पत्र लिहून 'कांते'ची कल्पना मुंबईतील कोणत्या मृत व्यक्तीवरून मला सुचली, हें कळविलें होतें. 'शाप' कादंबरीचें जें परीक्षण बडोद्याच्या एका पत्रांत आलें होतें, त्याच्याहि अनुषंगानें असाच एक अगदीं विचित्र प्रश्न मला तेथील एका विद्यार्थ्यानें केला होता. त्या कादंबरींत लच्छीच्या आलिंगनाचा जो प्रसंग आहे, तो मीं स्वानुभवानें वर्णन केला असावा, अशी टीका त्या बडोदेकर वृत्तपत्रानें मजवर केली होती; व या टीकेचें कात्रण तांबड्या पेन्सिलीनें खूण करून मजकडे पाठवून, माझ्या कादंबऱ्यांच्या या अनोळखी अभ्यासकानें त्या विधानाबद्दल मला खुलासा विचारला होता. त्याहि पत्राला मीं अद्याप उत्तर धाडलेलें नाहीं.

फाजील लगट करून लिहिलेल्या परीक्षणामुळें किंवा साहित्यिकांच्या खाजगी अड्ड्यांतून होणाऱ्या कुटाळक्यांमुळें जे विलक्षण लोकभ्रम उत्पन्न

होतात, त्यांनाहि या अनाहूत पत्रांतून केव्हां केव्हां वाचा फुटते. 'भंगलेलें देऊळ' ही कादंबरी प्रसिद्ध झाल्यावर त्यांतील 'अरुण' आणि 'अनसूया' हीं पात्रें मीं साहित्यक्षेत्रांतील कोणत्या व्यक्तींवरून रेखाटलीं अशी पृच्छा करणारीं आणि त्या बाबतींत विशिष्ट व्यक्तींचीं नांवेंहि घेणारीं कमींत कमी पांच पत्रें तरी मला आलीं. तीं पत्रें वाचतांक्षणींच माझ्या लक्षांत आलें, कीं ज्या व्यक्तींचीं नांवें त्यांत दिलेलीं आहेत, त्या व्यक्तींनीं कुठें ना कुठें तरी केलेल्या कुरबुरींतूनच या पृच्छांचा उगम झालेला असावा. 'कांता' कादंबरीच्या बाबतींतील असाच एक अजब लोकभ्रम म्हणजे, सर महादेव ठाकूर हें तिच्यांतील पात्र मीं मध्यप्रांताचे माजी गृहमंत्री आणि हंगामी गव्हर्नर श्री. तांबे किंवा डॉ. राव यांच्यावरून निर्माण केलें, हा होय; व गोव्याच्या 'कला' मासिकांतून तशी उघड उघड टीकाहि आली होती. पण नागपूरचा कोणताहि माहीतगार मनुष्य सर महादेव यांचें श्री. तांबे किंवा डॉ. राव यांच्याशीं रतिमात्र तरी साम्य आहे असें म्हणावयाला धजणार नाहीं. तरीसुद्धां डॉ. राव हे मुंबईहून विलायतेस गेल्यावर सर महादेव यांच्या रूपानें त्यांचें पात्र 'हुबेहूब' रेखाटल्याबद्दल माझी तारीफ करणारीं दोन पत्रें मला मुंबईहून आलींच! 'चित्रें'तून नुकत्याच क्रमशः प्रसिद्ध झालेल्या माझ्या 'दुहेरी जीवन' या कादंबरींत एका पारशी युवतीचें वर्णन आलें आहे. तें वाचून मला एका जिज्ञासूनें लिहिलें, "आपण केलेलें 'शिरीन'चें वर्णन इतकें हुबेहूब आणि मनाला चटका लावणारें आहे, कीं आपल्या स्वतःच्या अनुभवाचेंच तें प्रतिबिंब असावें, असें मला वाटतें!" 'दुहेरी जीवन' ही कादंबरी स्वतंत्र पुस्तकरूपानें बाहेर पडल्यावर नागपुरांतील कोणत्या व्यक्तींशीं तिच्यांतील पात्रांचा संबंध वर्तमानपत्रांतील परीक्षणांतून जोडला जातो, याची वाट मी उत्सुकतेनें पाहत आहे.

या अनाहूत पत्रव्यवहारांतील कांहीं पत्रांतून कित्येकदां मोठे मार्मिक प्रश्न विचारलेले असतात. नयनचुंबन आणि अलकचुंबन यांच्याविषयीं मला विचारण्यांत आलेल्या प्रश्नांना मीं जाहीर रीतीनें दिलेलीं उत्तरें प्रसिद्धच आहेत. 'दुहेरी जीवन' या कादंबरींतील 'रक्तदीक्षे'चा प्रसंग वाचून एका अनोळखी राष्ट्रीय स्वयंसेवकानें मला नुकतेंच असें पत्र लिहिलें होतें कीं, " तुमच्या 'चित्रें'तल्या चालू कादंबरींतील 'रक्तदीक्षे'चें वर्णन वाचून मला

'शाप'मधील 'मृत्तिकालेपन' आणि 'कांता'मधील 'चिताभस्म' यांची आठवण झाली; व 'मुखवटे' कादंबरींत जर तुम्ही पुन्हा अत्याचारी क्रांतिकारकाचें पात्र घातलेंत, तर शपथविधीसाठीं कोणत्या प्रतीकाचा उपयोग कराल, असा प्रश्न माझ्या मनांत उद्भवला." माझ्या तिन्ही कादंबऱ्यांतून लागोपाठ झालेल्या एका विशिष्ट कल्पनेच्या पुनरुक्तीचा या पत्रांत केलेला उपहास मला खरोखरीच फार रोचक वाटला. पण, याहीपेक्षां अधिक खोंचदार पत्र मला 'शाप'मधील 'स्वप्नांतील ग्वाही' या प्रकरणाबद्दल आलें होतें. त्या प्रकरणांत 'निशिकांत' आणि 'सुहास' यांच्या स्वप्नसंभाषणाचा जो प्रसंग वर्णन केला आहे, त्याविषयीं पुण्याच्या एका अपरिचित उदयोन्मुख टीकाकारानें मला असें लिहिलें होतें कीं, "मी हार्डीच्या कादंबऱ्यांचा एक भक्त आहे व आपणहि हार्डीच्या कादंबऱ्यांचा उत्तम व्यासंग केला आहे, हें आपल्या 'रत्नाकरां'तील लेखावरून स्पष्ट दिसतें. आपल्या कादंबऱ्या वाचतांना आजपर्यंत केव्हांही मला उसनवारीची शंका आली नव्हती. पण, 'शाप'मधील 'स्वप्नाची ग्वाही' हें प्रकरण वाचतांच हार्डीच्या 'टेस' मधील तिच्या लग्नाच्या पहिल्या रात्रीं घडलेला तशाच प्रकारचा पण अधिक भीषण प्रसंग माझ्या डोळ्यांपुढें उभा राहिला. त्या प्रसंगा वरून तुम्हांला 'शाप'मधील प्रसंग सुचला आहे असें जर मीं म्हटलें, तर तें चूक होईल काय?" हें पत्र वाचून खरोखरीच मला पेच पडला. लहानपणीं नाथमाधवांच्या 'वीरधवल' या अद्‌भुतरसपूर्ण कादंबरींतील स्वप्नांतल्या हालचालींचे अंगावर कांटा उभा करणारे प्रसंग मीं वाचले होते; व 'टेस'मधील स्वप्नाचा प्रसंग जेव्हां मीं प्रथम वाचला, तेव्हांहि माझें मन अत्यंत क्षुब्ध होऊन गेलें होतें. त्या प्रसंगांत आणि 'शाप'मधील 'स्वप्नांतील ग्वाहीं'त सादृश्य आहे, हें नाकारण्यांत अर्थ नाहीं. पण तें सादृश्य न कळत झालेल्या किंवा जाणून केलेल्या उसनवारीमुळें मात्र उत्पन्न झालेलें नाहीं, एवढें मी प्रामाणिकपणानें म्हणूं शकतों. कारण, माझ्या वाचनांत आलेल्या एखाद्या चमत्कृतिजनक घटनेचा माझ्या मनावर कितीहि परिणाम झाला, तरी त्याच्या साक्षात् अनुभूतीचा थोडासा तरी पडताळा स्वतःला मिळाल्याशिवाय मी ती खरी मानीत नाहीं किंवा तिचें वर्णन करण्याचीहि इच्छा मला होत नाहीं. 'शाप' मध्यें जो प्रसंग मीं वर्णन केला आहे, अंशतः

तशाच प्रकारचा प्रसंग मीं प्रत्यक्ष पाहिला आहे, असें म्हणावयाला मला भीति वाटत नाहीं. माझे ऐन तारुण्यांत मृत्युमुखीं पडलेले परम स्नेही कै. रा. ल. पराडकर यांना स्वप्नांत बोलण्याची आणि हिंडण्याची संवय होती; व कॉलेजांत असतांना प्रेमपाशांत सांपडल्यावर स्वप्नाच्या भरांत उठून आपली हृदयव्यथा बोलून दाखवितांना मीं त्यांना दोन तीन वेळां बघितलें होतें. त्यांचे सहाध्यायी, माझे मित्र प्रो. विठ्ठलराव कुळकर्णी यांनाहि हा प्रकार माहीत आहे. 'टेस'मधील प्रसंग वाचतांच मला कै. पराडकर यांच्या या स्वप्नसंभाषणाची आठवण झाली; व 'शाप' मधील स्वप्नाचा प्रसंग लिहितांना माझ्या डोळ्यांपुढें तें प्रत्यक्ष बघितलेलें हृदयद्रावक दृश्यच खरोखरी होतें. ही सारी हकीकत माझ्या टीकाकार पृच्छकाला मीं सविस्तर लिहून कळविली; व समाधानाची गोष्ट अशी कीं, ती वाचून त्याच्या शंकेचें पूर्ण निरसन झालें.

पण प्रत्येक नव्या कादंबरीगणिक येणारीं हीं पत्रें कशींहि असलीं, तरी लेखकांविषयींची वाचकांची वाढती जिज्ञासा आणि ललित कृतींविषयींचा चोखंदळपणा यांची साक्ष तीं देतात, यांत मात्र शंका नाहीं. ग्रे कवीच्या चरित्रांत जॉन्सननें असे उद्‌गार काढले आहेत कीं, " सर्वसामान्य वाचकाशीं सहमत होण्यांत मला आनंद वाटतो. वाङ्मयविषयक पूर्वग्रहांनीं अदूषित आणि पांडित्याच्या आग्रहापासून अलिप्त अशा सामान्य वाचकांच्या अभिरुचीनेंच खरोखरी लेखकाचा कविकीर्तीवरील हक्क निश्चित केला पाहिजे (I rejoice to concur with the common reader; for by the common sense of readers, uncorrupted by literary prejudices......must be finally decided all claim to poetical honours.)" जॉन्सनचें हें मत त्याच्या परिस्थितींत योग्य असेल. पण चालू जमान्याला मात्र तें लागू पडत नाहीं, हें खास. कारण सामान्य वाचकाची अभिरुचिहि अलीकडे इतकी कांहीं पूर्वग्रहलिप्त असते कीं, त्याचें मत ही कीर्तीची कसोटी समजणें हें निःसंशय अप्रयोजकपणाचें ठरेल. बोलपट रुपेरी पडद्यावर झळकण्यापूर्वी भाडोत्री स्तुतिस्तोत्रांनीं जसे वृत्तपत्रांचे रकाने दुथडी भरून वाहूं लागतात, तसा प्रकार अद्याप पुस्तकांच्या बाबतींत घडूं लागलेला नाहीं किंवा इंग्लंडांतील बुकसोसायटीसारख्या प्रकाशक आणि प्रशंसक संस्थांमार्फत प्रसिद्ध

होणारीं 'नाउ अँड देन'सारखीं नव्या पुस्तकांची तोंडभर तारीफ करणारीं मासिकेंहि अद्याप मराठींत निघूं लागलीं नाहींत हें खरें. पण पुस्तकप्रकाशना-चे समारंभ, त्या प्रसंगीं होणारीं जाहिरातवजा भाषणें, कच्ची प्रत वृत्तपत्रां-कडे पाठवून आगाऊ लिहविले जाणारे स्तुतिपाठ वगैरे प्रकारांनीं सामान्य वाचकाचें मन पुस्तकांच्या स्वागतार्थ अलीकडे इतक्या पद्धतशीर रीतीनें तयार करून ठेवलें जातें कीं, अशा स्थितींत वाङ्मयकीर्तीच्या बाबतींत त्याची अभिरुचि निर्णायक मानणें धोक्याचें होईल. मला येणाऱ्या अनाहूत पत्रां-वरून तरी पुष्कळदां असें वाटलें आहे, कीं नियतकालिकांतील चर्चेमुळें वाचकांचीं मनें आणि मतें चांगलींच दूषित झालेलीं (Corrupted) असतात. मी या पत्रांवरून फक्त एवढेंच अनुमान काढीत असतों कीं, माझें लिखाण अगत्यपूर्वक वाचलें जात आहे आणि नियतकालिकें आपआपल्या पूर्वग्रहानुसार त्याचा समाचारहि सपाटून घेत आहेत.

अर्थात् असल्या पत्रांवरून कीर्तीच्या बाबतींत स्वतःची फसवणूक करून घ्यावयाला मात्र मी मुळींच तयार नाहीं. या पत्रांचा उपयोग एवढाच, कीं लोक आपल्याविषयीं काय बोलतात व आपल्या वाङ्मयाविषयीं कोणत्या अपेक्षा बाळगतात, याची कल्पना त्यांच्या वाचनानें येते. आणि लोकांना आपल्याविषयीं काय वाटतें हें त्यांच्या अड्ड्यावर जावें न लागतां घरबसल्या समजणें हासुद्धां कांहीं सामान्य लाभ नाहीं! लोक आपल्या नाटकांविषयीं खरोखरी काय बोलतात, हें जाणून घेण्याच्या इच्छेनें कै. तात्यासाहेब कोल्हटकर हे केव्हां केव्हां पिटमध्यें प्रेक्षकांच्या गर्दींत बसून स्वतःचें नाटक पाहत असत. माझ्या गुरूंनीं अशा रीतीनें घेतलेल्या वैचित्र्यपूर्ण अनुभवाची लज्जत या अनाहूत पत्रांच्या रूपानें मला घरबसल्या लुटावयाला मिळते, हें मी खरोखरीच आपलें सुदैव समजतों!

'धनुर्धारी', दिवाळी अंक १९३९

---

## राणी दुर्गावती : : ११

अखिल भारताला ललामभूत अशीं जीं स्त्रीरत्नें हिंदुस्थानांत निर्माण झालीं, त्यांत गडमंडळची राणी दुर्गावती हिची गणना केली पाहिजे. झांशीच्या राणीच्या चरित्राइतकेंच गडमंडळच्या या राणीचें चरित्रहि अत्यंत उज्ज्वल आणि अद्‌भुतरम्य आहे. परंतु, मुसलमानी तवारिखांतून फक्त आपल्या पूर्व-ग्रहांना पोषक तेवढीच माहिती उचलून, सातपुडयांतील गोंड राजांच्या उत्कर्षापकर्षाचा इतिहास विकृत दृष्टीनें सजविणारे मध्यप्रांतीय सिव्हिलियन मि. वुइल्स यांच्याशिवाय राणी दुर्गावतीच्या कर्तृत्वाचें वर्णन प्रायः कोणत्याच इतिहासकारानें केलेलें आढळत नाहीं. झांशीच्या दुर्दैवी राणीच्या अतुल पराक्रमाचा उल्लेख सत्तावन सालच्या बंडांतील इंग्रज सेनापतींनींहि आदरातिशयानें केला असून, बंडांतील वीरांच्या प्रणालिकेंत स्वकीय आणि परकीयहि इतिहासकारांनीं तिला अग्रपूजेचा मान दिला आहे. उलट, गोंडवनांतील गुणज्ञ शाहिरांनीं गडमंडळच्या या अभागी राणीचें वीरचरित जरी आपल्या खडया बोलांत सहृदयतेनें गुंफिलें असलें, तरी मध्यप्रांताच्या डोंगरदऱ्यांतून घुमणारे ते त्यांचे बोल अद्याप इतिहासाच्या कानापर्यंत जावयाचेच आहेत !

झांशीच्या राणीच्या शौर्याचे उल्लेख ज्याप्रमाणें केप्रभृति त्या वेळच्या इंग्रज लेखकांनीं आदरानें केले आहेत, त्याप्रमाणें गडमंडळच्या या राणीच्या कर्तृत्वाचे निर्देशहि अबुल फजलप्रभृति तत्कालीन मुसलमान लेखकांच्या ग्रंथांतून पुष्कळ सांपडतात. तथापि, मुसलमानी व हिंदी बखरींतून विखुरलेल्या या माहितीचें संशोधनहि अजून झालेलें दिसत नाहीं. त्यामुळेंच बहुधा, श्री. सरदेसाई यांच्या मुसलमानी रियासतींत सर्व मुसलमान बखरकारांनीं एकमुखानें प्रशंसिलेल्या राणी दुर्गावतीच्या असामान्य कर्तृत्वाचा नुसता उल्लेखसुद्धां केलेला नाहीं. नाहीं म्हणावयाला, सर व्हिन्सेंट स्मिथ यांच्या अकबराच्या चरित्रांत आणि हिंदुस्थानच्या ऑक्सफर्ड इतिहासांतहि विजिगीषु मोंगल सम्राटाच्या जुलमी आक्रमणाला शह द्यावयास धैर्यानें प्रवृत्त होणाऱ्या गडमंडळच्या या प्रतापी राणीच्या वीरचरिताचा उल्लेख अत्यंत गौरवपूर्वक केलेला दृष्टीस पडतो. महत्त्वाकांक्षी अकबराच्या सर्वंकष आक्रमणाला पायबंद घालण्याचा प्रयत्न अखिल भारतांत त्या वेळीं फक्त दोनच व्यक्तींनीं केला. एक उदेपूरचा राणा प्रताप आणि दुसरी गडमंडळची राणी दुर्गावती. राणा प्रतापाच्या पराक्रमाचे पोवाडे इतिहासानें मुक्त कंठानें गायिले आहेत. परंतु, राणी दुर्गावतीच्या वीरचारिताचा इतिहास मात्र अद्याप लिहावयाचाच आहे.

मध्यप्रांतांत जबलपूर शहराच्या पश्चिमेस चार मैलांवर 'गढा' म्हणून एक आज अगदीं उध्वस्त स्थितींत असलेलें गांव आहे. तेंच दुर्गावतीचें आणि तिच्या वैभवशाली पूर्वजांचें राजधानीचें स्थान. जबलपूरच्या दशक्रोशींत 'तेवर'—प्राचीन 'त्रिपुरी'—आणि 'गढा' हीं मध्यप्रांतांतील दोन वैभवशाली राजवंशांचीं राजधानीचीं ठिकाणें आहेत. तेवर हें गांव जबलपूरच्या पश्चिमेस आठ कोसांवर असून, कलचुरीच्या ऐश्वर्याचे उध्वस्त अवशेष आजहि तिथें क्वचित् दृष्टीस पडतात. तेवर येथील कलचुरी राजवंशानें मध्यप्रांतावर जवळ जवळ तीन शतकें ( ८७५–११८० ) प्रभुत्व गाजविलें. तेवरच्या या कलचुरींचा उच्छेद झाल्यावर दोन शतकांनीं गढाच्या गोंड राज्याचा उदय झाला. पंधराव्या शतकांतील संग्रामशहाच्या कारकीर्दीत गडमंडळच्या या गोंड राज्याची अतिशय भरभराट झाली. संग्रामशहा हा पूर्ववयांत अत्यंत दुर्वृत्त होता, असें त्याचें वर्णन अबुल फजलनें 'अकबरनाम्यां'त केलें आहे. परंतु, राज्यसूत्रें एकदां हातीं आल्यावर, त्यानें राज्याच्या अभ्युदयाकडे आणि प्रजेच्या

उन्नतीकडेच पूर्ण लक्ष दिलेलें दिसतें. हिंदी मध्यप्रांताच्या बहुतेक भागावर त्यानें आपलें वर्चस्व प्रस्थापित केलें होतें. त्यानें बांधलेला चौरागड किल्ला हा जसा त्याच्या विजिगीषेची, तसाच संग्रामसागर हा तलाव त्याच्या वैभवाची साक्ष देतो. अबुल फजलनें दिलेल्या दुर्गावतीच्या कारकीर्दीचीं वर्षे प्रमाण मानून, संग्रामशहा सन १५४१ मध्यें मरण पावला, असें विधान मि. वुइल्स यांनीं केलें आहे. पण तें बरोबर नाहीं. संवत् १६०० मधील संग्रामशहाचें नाणें सांपडलेलें असल्यामुळें, तो स. १५४१ मध्यें मेलेला असणें शक्य नाहीं. त्याचा मृत्यु बहुधा सन १५४३ च्या सुमारास केव्हां तरी झालेला असावा. त्याच्या मृत्यूनंतर त्याचा पुत्र दलपतशहा यानें पांच वर्षें राज्य केलेलें दिसतें. दलपतशहाच्या मृत्यूच्या वेळीं त्याचा पुत्र वीरनारायण हा तीन वर्षांचा होता. त्यामुळें, दलपतशहाची पत्नी राणी दुर्गावती हिच्या हातीं साहजिकच गड-मंडळाच्या राज्याचीं सूत्रें आलीं. राणी दुर्गावतीनें, पतीच्या निधनानंतर आपल्या अल्पवयी पुत्राला गादीवर बसवून, सोळा वर्षें गडमंडळाच्या राज्याची धुरा आपल्या शिरावर वाहिली. राणी दुर्गावती आपल्या सासऱ्यापेक्षांहि पराक्रमी, कर्तृत्ववान् आणि प्रजाहितदक्ष होती; व तिच्या कारकीर्दीत गडमंडळच्या राज्याच्या उत्कर्षाची पराकाष्ठा झाली.

राणी दुर्गावतीचा जन्म चंदेलांच्या वीरकुलांत झाला होता. परंतु, दुर्गा-वतीचा जन्म चंदेलकुलाच्या कोणत्या शाखेंत आणि केव्हां झाला, याचा निश्चित उल्लेख कुठेंच सांपडत नाहीं. उलट स. १८२५ सालीं जबलपूर येथील गव्हर्नर जनरलच्या एजंटाला देण्यांत आलेल्या वंशावळींत, "उच्छाराची राजकन्या दुर्गावती हिला दलपतशहानें हरण करून आणलें," असा उल्लेख आहे. हा उल्लेख जर खरा मानला, तर उच्छाराचे राजे हे परिहार कुळांतील असल्यामुळें, दुर्गावती ही अर्थातच परिहार राजकन्या ठरते. तथापि एवढा हा एकच एक विसंवादी आणि तोहि अगदीं अर्वाचीन उल्लेख सोडला, तर बाकी-चे सर्व उल्लेख दुर्गावती ही अर्थातच चंदेल राजकन्या होती, असें सांगतात; व तेंच एकंदरींत खरें दिसतें. अबुल फजलनें, "राणी दुर्गावती ही राठ आणि महोबा येथील शालिवाहन राजाची कन्या होती," असें वर्णन अकबर-नाम्यांत केलें असून, मि. वुइल्स यांनीं आपल्या गोंड राज्याच्या इतिहासांत तेंच प्रमाण मानलें आहे. परंतु दुर्गावती ही राय कृष्णसिंगाची पत्नी असल्याचें

फरिस्त्याचें विधान जितकें चुकीचें, तितकेंच ती शालिवाहनाची कन्या असल्याचें हें अबुल फजलचें विधानहि चुकीचें दिसतें. महोबाचा चंदेल नृपति परमार्दि याचा स. ११८२ मध्यें पृथ्वीराज चव्हाणानें पराभव केला. या पराभवानंतर चंदेलांनीं महोबाहून आपली राजधानी कलिंजरच्या दुर्गम किल्ल्यावर नेली. १२०३ मध्यें कुतुबुद्दिनानें कलिंजर घेतलें. तथापि त्या प्रसंगीं चंदेलांच्या सत्तेचें समूळ उच्चाटन झालें नाहीं. मुसलमानांचा हल्ला परतला कीं, चंदेल राजे पुन्हा वर डोकें काढीत. याप्रमाणें मुसलमानांच्या आक्रमणाला सतत तीनशें वर्षें या वीरकुलानें तोंड दिलें. १२०३ पासून १५४५ पर्यंत कलिंजरवर मुसलमानांनीं एकंदर पांच स्वाऱ्या केल्या. मुसलमानांच्या या सतत होणाऱ्या चढाईला जरी चंदेल राजांनीं तीन शतकें निकरानें तोंड दिलें असलें, तरी कुतुबुद्दिनाच्या स्वारीनंतर त्यांची सत्ता मात्र कलिंजरपुरतीच अवशिष्ट राहिली. १२४७ मधील स्वारींत सुलतान नसिरुद्दिन महंमद यानें कलिंजरच्या आसपासचा सर्व प्रदेश पादाक्रान्त केला. त्यानंतर राठ किंवा महोबा येथें चंदेलांच्या सत्तेचा कोणत्याहि प्रकारचा अवशेष शिल्लक राहिला नाहीं. १२७६ मध्यें करा, महोबा व दलमन हा प्रदेश फिरोज तुघ्लखनें मलिक उशरकला जहागीर म्हणून दिल्यामुळें कलिंजरच्या दारांत मुसलमानांचें पक्कें ठाणें बसलें. अर्थात् राठ आणि महोबा येथील राजाचा अबुल फजलनें केलेला उल्लेख सर्वथैव अनैतिहासिक आहे. शालिवाहन या नांवाचा चंदेल राजा किंवा राजपुरुष राठ महोबा येथें होता असें मानावयाला आज यत्किंचित्‌हि पुरावा नाहीं.

कलिंजरचा शेवटचा चंदेल नृपति किरातसिंग याची दुर्गावती ही कन्या असावी असें निश्चित विधान सर अलेक्झांडर कनिंगहॅम यांनीं आपल्या आर्चिऑलॉजिकल सर्व्हेच्या एकविसाव्या खंडांत केलें आहे. दुर्गावती ही चंदेल राजकन्या असल्याविषयींची परंपरा जर खरी मानली, तर जनरल कनिंगहॅम यांनीं म्हटल्याप्रमाणें ती कलिंजरच्या या शेवटच्या नृपतीचीच कन्या असली पाहिजे यांत शंका नाहीं. दुर्गावती ही चंदेल राजकन्या होती हें मि. वुइल्स यांनाहि मान्य आहे; परंतु कलिंजरच्या प्राचीन आणि प्रख्यात वीरकुलांत तिचा जन्म झाला होता हें मात्र त्यांना पटत नाहीं. त्यांचा आक्षेप असा आहे कीं, कलिंजरच्या इतिहासप्रसिद्ध चंदेल कुलांत जन्मलेली राजकन्या दलपतसिंहासारख्या हीनकुलीन गोंडाला माळ घालणें शक्य नाहीं. दुर्गावती ही

चंदेल राजकन्या होती असें ज्याप्रमाणें परंपरा सांगते, त्याचप्रमाणें दलपतशहानें तिला पितृगृहाहून हरण करून आणली होती असेंहि परंपरा सांगते. ज्या परंपरेचा पूर्वार्ध मि. वुइल्स यांना मान्य आहे तिचा उत्तरार्धच तेवढा त्यांना कां मान्य होऊं नये ? शिवाय दुर्गावती आणि दलपतशहा यांच्या विवाहाचा विचार करतांना गडमंडळच्या गोंड राजघराण्याचा रजपुतांशीं किती ऋणानुबंध होता आणि त्या घराण्याचें रजपुतीकरण हळूहळू कसें होत होतें, हेंहि लक्षांत घेणें अवश्य आहे. दलपतशहाचा पणजा गोरखदास याचें सैन्य मुख्यतः रजपुतांचें होतें; व हमीरपूरच्या एका कलचुरी आणि एका परिहार अशा दोन रजपूत साहाय्यकांच्या मदतीनें त्यानें आपलें वर्चस्व प्रस्थापित केलें, असें वर्णन अकबरनाम्यांत केलेलें आहे. आसपासच्या रजपुत राजघराण्यांशींहि गडमंडळच्या राजांचा चांगला स्नेहसंबंध होता, असें दिसतें. संग्रामशहा हा तर रेवाचा राजा वीरसिंगदेव याचा दत्तक पुत्र होता. चंदभाटाच्या 'रासां'त असा एक उल्लेख सांपडतो कीं, गडमंडळच्या गोंड राजानें चंदेल राजा किरातसिंग याला युद्धांत बंदिवान केलें होतें. हा उल्लेख अर्थातच प्रक्षिप्त आहे. परंतु 'रासां'त मागाहून घुसडण्यांत आलेल्या अनेक ऐतिहासिक प्रसंगांप्रमाणें हा उल्लेखहि वस्तुस्थितीचा निदर्शक आहे, असें कां मानूं नये ? या सर्व गोष्टी आणि कलिंजरच्या चंदेल कुळाची खालावलेली स्थिति लक्षांत घेतली, म्हणजे गोंडवनांत त्या वेळीं सार्वभौम होऊन बसलेल्या संग्रामशहाच्या पुत्राला किरातसिंगानें आपली कन्या देणें, हें अगदीं संभवनीय किंबहुना स्वाभाविक वाटतें. खुद्द अबुल फजलनेंहि, महोबाच्या राजाची स्थिति खालावलेली असल्यामुळें हीनकुलीन पण वैभवशाली गोंड राजाशीं त्याला हा संबंध करणें भाग पडलें ( Was compelled to make this alliance ), असे उद्गार काढले आहेत. महोबा ही चंदेलांची पुरातन आणि प्रसिद्ध राजधानी असल्याकारणानें, महोबाची राजकन्या म्हणून जो तत्कालीन सर्व मुसलमान इतिहासकारांनीं दुर्गावतीचा उल्लेख केला आहे, तोहि स्वाभाविक वाटतो. नागपूरचे भोसले हे वऱ्हाडचे अधिपति नसतांना सुद्धां सर्व इंग्रज इतिहासकारांनीं 'वऱ्हाडचे राजे' ( Raja of Berar ) म्हणून त्यांचा उल्लेख केला आहे. दुर्गावती ही महोबाची चंदेल राजकन्या होती, हें अबुल फजल यालाहि मान्य आहे. फक्त तो तिच्या पित्याचें नांव तेवढें निराळें देतो.

परंतु 'अकबरनाम्यां'तील इतर अनेक स्थलनामें आणि व्यक्तिनामें जशीं चुकीचीं आहेत, तसेंच हेंहि नांव चुकीचें असणें मुळींच अशक्य नाहीं. खुद्द संग्रामशहाचा आजा जो गोरखदास त्याचें नांव अबुल फजलनें 'संगीनदास' असें दिलें असून, दुसऱ्या एका मुसलमान बखरकारानें 'सुखनदास' असें दिलें आहे. अशा स्थितींत प्रमादशील अबुल फजलला प्रमाण मानून ज्याच्या अस्तित्वाबद्दल कोणत्याहि प्रकारचा आधार उपलब्ध नाहीं, अशा एखाद्या काल्पनिक राजाची दुर्गावतीला कन्या ठरविण्यांत काय अर्थ!

दुर्गावतीचा पिता किरातसिंग हा कलिंजरचा शेवटचा चंदेल नृपति. मुसलमानांच्या आक्रमणाला प्रारंभ झाल्यापासून ज्या हिंदु राजांनीं त्यांच्या चढाईची लाट परतविण्याचा प्रयत्न केला, त्यांत चंदेल नृपति हे अग्रेसर होते. मुसलमानांच्या विजिगीषेला कायमचा पायबंद घालण्यासाठीं लाहोरच्या जयपाळानें सन ९९१ मध्यें गझ्नीवर जी स्वारी केली, तींत चंदेल नृपति धंगदेव यानें प्रामुख्यानें भाग घेतला होता. धंगाचा पुत्र नंददेव याला मुसलमानांच्या सत्तेची इतकी चीड होती कीं, कनोजचा राजा राज्यपाल यानें गझ्नीच्या महमदाला शरण जाऊन मुसलमानांचें वर्चस्व कबूल केल्यामुळें नंदानें कनोजवर चाल करून त्याला ठार मारिलें; व आपल्या मांडलिकाच्या या वधाचा सूड घेण्यासाठीं खुद्द महमद कलिंजरवर चालून आला असतांहि नंदानें त्याला दाद दिली नाहीं. परंतु मुसलमानांच्या वारंवार होणाऱ्या या स्वाऱ्यांना तोंड देण्यांत एकाकी चंदेल नृपतींची सत्ता आणि सामर्थ्य हीं दोन्हींहि हळूहळू क्षीण होत जाऊन, अखेर किरातसिंगाच्या कारकीर्दींत चंदेलांच्या बुंदेलखंडांतील सार्वभौम सत्तेचा कलिंजर येथील एकमेव अवशेषहि उच्छिन्न झाला. पृथ्वीराज चव्हाणाचा वध होऊन, दिल्लीला मुसलमानांची सलतनत स्थापन झाल्यानंतर, १२०३, १२३४, १२४७, १२५१, १५३० या सालीं कुतुबुद्दिन, नासिरुद्दिन, हुमायूनप्रभृति दिल्लीच्या सुभेदारांनीं व सुलतानांनीं कलिंजरवर लागोपाठ स्वाऱ्या केल्या. तथापि, या तीनशें वर्षें सतत झालेल्या आघातांनींहि चंदेलांच्या सत्तेचें चिवट मूळ तुटलें नाहीं. १५४५ मध्यें शीरशहा सूर यानें कलिंजरवर स्वारी केली. राजा किरातसिंग याची त्या वेळीं अगदीं दैन्यावस्था असतांहि जिवावर उदार होऊन त्यानें देह पडेपर्यंत मोठ्या शौर्यानें किल्ला लढविला. किल्ल्यावर चढाई करण्या-

साठीं शीरशहा जातीनें झटत असतां, किल्ल्यांतून सुटलेला तोफेचा गोळा त्याच्या दारूखान्यांत पडून एकदम भडका उडाला. या अग्निप्रलयांत शीरशहा होरपळून निघाला. तथापि तशाहि अवस्थेंत किल्ल्यावर निकराचा हल्ला करवून, किल्ला स्वाधीन झाल्यावर त्यानें प्राण सोडला. आणि अशा रीतीनें चंदेलांच्या या वीरकुलाची अखेर वाताहत झाली.

मुसलमानांच्या सत्तेशीं शेवटपर्यंत निकरानें झगडणाऱ्या स्वाभिमानी चंदेलांच्या या स्वातंत्र्यप्रिय कुलांत राणी दुर्गावतीचा जन्म झाला होता. दुर्गावती आणि दलपतशहा यांच्या लग्नाविषयीं निरनिराळ्या कथा प्रचलित आहेत. सर विल्यम स्लीमन हे या लग्नाची अशी हकीकत देतात कीं, "महोबाची सुंदर राजकन्या दुर्गावती आणि दलपतशहा यांचें लग्न जुळविण्या-साठीं बरीच खटपट करण्यांत आली होती. परंतु गडमंडळाच्या राजघराण्याच्या हीनतेमुळें ही मागणी झिडकारण्यांत आली. दलपतशहा हा अतिशय देखणा होता. त्याच्या सौंदर्यावर आणि गडमंडळाच्या वैभवावर लुब्ध झालेल्या दुर्गा-वतीलाहि हा संबंध जुळून यावा अशी इच्छा होती. पण जातीची अडचण आड येत असल्यामुळें, मला हरण करून न्यावें, असें तिनें दलपतशहाच्या कानांवर घातलें. त्याप्रमाणें, दलपतशहानें तिच्या पित्याचा पराभव करून, तिला हरण करून सिंघोरगडला नेली." सर विल्यम स्लीमन यांनीं ही हकीकत अर्थातच हिंदु बखरकार आणि परंपरा यांच्या आधारानें दिली आहे. अबुल फजल या लग्नाविषयीं लिहितो, "दुर्गावतीच्या पित्यानें तिला दलपत शहाला दिली. कारण दलपतशहा जरी उच्च कुळांतला नव्हता, तरी तो संपन्न आणि शालिवाहन दुःस्थितींत असल्यामुळें, हा संबंध जुळवून आणणें त्याला भाग पडलें." मि. वुड्रुस यांना स्लीमनसाहेबांच्या रोमँटिक वृत्तान्ता-पेक्षां अबुल फजलचा हा 'प्रोजाइक' उल्लेख अधिक विश्वसनीय वाटतो! तथापि, स्लीमनसाहेबांचा वृत्तान्त अविश्वसनीय मानण्याचें कांहीं कारण नाहीं. कन्याहरणाचे अशा तऱ्हेचे प्रसंग रजपुतांच्या इतिहासांत अनेक आढळतात. शिवाय, 'रासां'तील उल्लेखाच्या मुळाशीं जर कांहीं तथ्य असेल, तर अबुल फजलच्या ऐकीव माहितीपेक्षां परंपरेनें चालत आलेला हा दुर्गावती-हरणाचा रोमँटिक वृत्तान्तच विश्वसनीय मानावा लागेल लग्नानंतर थोड्याच वर्षांनीं दलपतशहा मरण पावून राज्याचा अधिकार दुर्गावती आणि

दलपतशहा यांचा तीन वर्षांचा पुत्र जो वीर नारायण त्याच्याकडे आला. आपल्या या अल्पवयी पुत्राला गादीवर बसवून आधार कायथ (कायस्थ?) आणि मन ब्राह्मण या दोन मंत्र्यांच्या साहाय्यानें राजमाता राणी दुर्गावती हिनें सोळा वर्षे गडमंडळाचा राज्यकारभार पाहिला.

दुर्गावतीच्या या सोळा वर्षांच्या कारकीर्दीचें विस्तृत आणि विश्वसनीय असें वर्णन कुठेंच आढळत नाहीं. रामनगरच्या शिलालेखांत आणि अबुल फजल, फरिस्ताप्रभृति मुसलमान लेखकांच्या तवारिखांत तिच्या पराक्रमाचे आणि वैभवाचे उल्लेख सांपडतात. शिलालेखाच्या विच्छिन्न शकलांवरून जशी त्यांतील लेखांची संगति बसवावी लागते, तशीच या त्रुटित उल्लेखांवरून दुर्गावतीच्या कारकीर्दीची कल्पना करावी लागते. तिनें बांधलेले व बांधविलेले 'राणीताल', 'चेरीताल','आधारताल' वगैरे विशालरम्य जलाशय आणि तिच्या कारकीर्दीतील इमारतींचे व इतर अवशेष तिच्या प्रजाहितदक्षतेची साक्ष देतात. तिचें राज्य जंगली मुलखांत असल्यामुळें साहजिकच वन्य पशूंचा उपद्रव लोकांना पुष्कळ होत असे. अबुल फजल म्हणतो, "राणीची अशी रीत होती कीं, वाघ जवळपास आला असल्याची वार्ता लागतांच, त्याला ठार मारल्याशिवाय ती पाणी पित नसे." रामनगरच्या शिलालेखांत तिच्या वैभवाप्रमाणें प्रजाहितदक्षतेचा आणि पराक्रमाचाहि उल्लेख केलेला आहे. "ती प्रजावत्सल राणी जातीनें हत्तीवर आरूढ होऊन युद्धांत शत्रूंचा पराभव करीत असे," हें त्या शिलालेखांतील वर्णन अत्यंत यथार्थ आहे. संग्रामशहानें मिळविलेलें राज्य या त्याच्या वीरस्नुषेनें राखलें, इतकेंच नव्हे तर वाढविलेंहि. गोंडवनांतील छोट्या मोठ्या गोंड राजांना जिंकून तिनें आपलें राज्य जसें वाढविलें, तसेंच माळवा, मध्यहिंदुस्थान आणि गुजराथ येथील मुसलमानांच्या वारंवार होणाऱ्या हल्ल्यांपासून त्याचें रक्षणाहि केलें. दुर्गावतीच्या सौंदर्याची, संपत्तीची आणि शौर्याची कीर्ति त्या वेळीं सर्वतोमुखीं झाली होती. तिच्या वैभवाची आणि दातृत्वाची कीर्ति ऐकून अनेक गुणी लोक गोंडवनांत तिच्या आश्रयाला येऊन राहिले. 'हिंमतबहादुरबिरुदावलि' या हिंदी ग्रंथाच्या प्रस्तावनेंत पुढील श्लोक दिला आहेः—

वर्षे बाणरसारसेंदुमिलिते श्रीमद्गढापट्टने
रम्ये नार्मदकोटितिर्थकलिते दुर्गावतीपालिते

मुंगीपट्टनतोऽथवा मधुपुरी श्रीरंगकालेश्वरात्
संयाता किल दाक्षिणात्य विबुधा सार्धं शतं सप्त च ॥

म्हणजे, स. १५५८ च्या सुमारास सातशें दाक्षिणात्य पंडित दुर्गावतीच्या आश्रयास येऊन राहिले. या उल्लेखावरून दुर्गावतीचा लौकिक त्या वेळीं किती दूरवर पसरला होता याची कल्पना येते. अबुल फजल तिच्या वैभवाचें वर्णन करितांना म्हणतो, " शौर्य, मुत्सद्दीपणा व दातृत्व यांबद्दल राणी दुर्गावतीची ख्याति होती; आणि या आपल्या अलौकिक गुणांच्या जोरावर तिनें त्या सर्व प्रदेशावर आपलें स्वामित्व स्थापन केलें. तिच्या राज्यांत राहिलेल्या अनुभविक माणसांकडून मीं असें ऐकलें आहे कीं, तेवीस हजार सुपीक गांवें तिच्या ताब्यांत असून, त्यांपैकीं बारा हजारांवर तिनें आपले 'शिकदार' नेमले होते; धैर्य आणि कर्तृत्व हे गुण तिच्या ठिकाणीं उत्कटतेनें वास करीत होते; व आपल्या कर्तृत्वाच्या जोरावर तिनें महत्कृत्यें केलीं. तिच्या पदरीं वीस हजार घोडेस्वार होते व तिच्या गजशाळेंत एक हजार हत्ती होते. ती कुशल तिरंदाज होती व तिला बंदूक उत्तम मारतां येत असे. तिला शिकारीचा अतिशय नाद होता; आणि तिची अशी रीत होती कीं, जवळपास वाघ दिसल्याचें कळल्यावर, त्याला ठार मारल्याशिवाय ती पाणी पीत नसे. तिच्या धारिष्टाच्या आणि अचाट शौर्याच्या गोष्टी हिंदुस्थानांत सर्वांच्या तोंडीं आहेत. माळव्याचा सुलतान बाजबहादुर व अफगाण मिया यांच्याशीं तिच्या निकराच्या अनेक लढाया झाल्या."

दुर्गावतीनें केलेल्या बाजबहादुराच्या या पराभवाचें वर्णन फरिस्त्यानें केलें आहे. तो म्हणतो, " माळव्याचा सुलतान बाजबहादुर यानें गोंडवनावर चाल केली. या लढाईत त्याचा चुलता फत्तेखान हा ठार झाला. तेव्हां बाजबहादुर हा सारंगपूरपर्यंत मागें हटला व गडाच्या किल्ल्यावर चढाई करण्याची त्यानें तयारी केली. तो गडाच्या नजीक येतांच, त्या प्रदेशावर राज्य करणारी राय कृष्णसिंगाची विधवा राणी दुर्गावती हिच्या सैन्यानें त्याला अडविलें. गोंड सैन्य खिंडींत दबा धरून बसलें होतें; व बाजबहादुराची फौज खिंडींत शिरतांच गोंड सैन्यानें त्याच्यावर छापा घालून, त्याची इतकी दाणादाण उडवून दिली कीं, सुलतानाला एकट्यानें जीव घेऊन सारंगपूरला पळ काढावा लागला. परंतु, त्याच्या फौजेला घेरून गोंड सैन्यानें तिची कत्तल केली. या पराभवाचें

शल्य बाजबहादुराच्या मनाला इतकें झोंबलें कीं, या मानहानीचा विसर पडावा म्हणून त्यानें विषयोपभोगांत दिवस घालवावयाला आरंभ केला." दुर्गावतीच्या राज्याचा अपहार करण्याचा जरी बाजबहादुरानें अशा रीतीनें प्रयत्न केला असला, तरी तिनें मात्र शत्रूवरहि उपकार करण्याच्या हिंदूंच्या स्वभावानुसार या सुलतानाला त्याच्या आपत्काळीं मदत केल्याचे उल्लेख आढळतात. रॅसिन येथील अफगाणांनीं इब्राहिमखानाच्या साहाय्यानें बाजबहादुराचा उच्छेद करण्याचा उद्योग आरंभिला; व राणी दुर्गावतीला आपल्या मदतीला बोलाविलें. परंतु बाजबहादुरानें राणीकडे आपले लोक पाठवून या कारस्थानांत सामील न होण्याची तिला प्रार्थना केली. तेव्हां, राणीने या उद्योगांतून आपलें अंग काढून घेतल्यामुळें, इब्राहिमखानालाहि आपला स्वारीचा बेत रद्द करावा लागला; व अशा रीतीनें केवळ दुर्गावतीच्या दिलदारपणामुळें बाजबहादुरावरील हें गंडांतर टळलें. पुढें, अकबरानें बाजबहादुराचा उच्छेद आरंभिल्याबरोबर, त्यानें गोंडवनाचा आश्रय केल्याचा उल्लेख फरिस्त्यानें केला आहे. गोंडवनांत दबा धरून तो मधून मधून छापे घाली; व याप्रमाणें कांहीं दिवस त्यानें आपलें स्वातंत्र्य कायम ठेविलें. या दिवसांत राणी दुर्गावतीची त्याला निःसंशय मदत झाली असावी. आणि, विजिगीषु अकबरानें गोंडवनावर जी स्वारी केली, तिचा राज्यविस्ताराच्या लालसेप्रमाणें बंडखोराला आपल्या मुलखांत आश्रय देणाऱ्या राणीचें पारिपत्य करण्याचा हेतु हेंहि एक कारण असावें.

अकबराचा करा-माणिकपूर येथील सुभेदार आसफखान यानें १५६४ मध्यें गडावर स्वारी केली. सर व्हिन्सेंट स्मिथ यांनीं, अकबरानें गडमंडळावर निष्कारण केलेल्या या स्वारीचें वर्णन करितांना, असे उद्‌गार काढले आहेत कीं, "Her independence was her only fault. —राणी दुर्गावतीचें स्वातंत्र्य हाच एक तिचा अपराध होता!" आणि तें अगदीं खरें आहे. अबुल फजल म्हणतो, "पण, तिच्या हातून एक मोठा अपराध घडला. तोंडपुज्या लोकांच्या नादीं लागल्यामुळें तिला आपल्या यशाचा गर्व झाला; आणि म्हणून शाहिनशहांच्या पदधूलींत तिनें आपलें मस्तक नमविलें नाहीं." आसफखानाच्या स्वारीचें वर्णन त्यानें असें केलें आहे कीं, "आसफखानानें जेव्हां पन्नाचें राज्य जिंकलें, तेव्हां दुर्गावती आपल्या पराक्रमाच्या आणि कर्तृ-

त्याच्या धुंदींत होती. आपल्या राज्यानजीक येऊन ठेपलेल्या खानाची तिला कांहींच खातर वाटली नाहीं! आसफखान नजीक आल्यावर त्यानें दोस्तीचें बोलणें सुरू केलें; व तिच्या संपत्तीची आणि राज्याची बातमी काढण्यासाठीं गोंडवनांत हेर आणि माहीतगार व्यापारी पाठविलें. तिच्या अपार संपत्तीची व गुप्त खजिन्याची जेव्हां त्याला नक्की बातमी लागली, तेव्हां त्या प्रदेशावर स्वामित्व मिळविण्याच्या हेतूनें सरहद्दीवरील खेडींपाडीं लुटावयाला त्यानें आरंभ केला. शाहिनशहाच्या आज्ञेनें त्यानें दहा हजार घोडदळ व विपुल पायदळ जमा करून गडाच्या स्वारीची तयारी केली. मुहिबअलीखान, महमद मुरादखान, वजीरखान, नजीरबहादुर वगैरे सरदार बादशहाच्या हुकमानें त्याच्याबरोबर होते. राणी या वेळीं आपल्या ऐश्वर्यांत धुंद होती. एकाएकीं विजयी बादशाही फौज दमोवर चालून आल्याची बातमी येऊन थडकली. ही बातमी येतांच शौर्याच्या धुंदींत राणीनें बादशाही फौजेला तोंड देण्याचें ठरविलें. राणीचे लोक तिला सोडून गेले व तिच्याजवळ जेमतेम पांचशें माणसें शिल्लक राहिलीं. तिचा मंत्री आधार यानें ही गोष्ट तिच्या निदर्शनास आणून देऊन बादशहाच्या प्रचंड फौजेपुढें आपला निभाव लागणार नाहीं असा सल्ला तिला दिला; पण तिनें त्याला असें उत्तर दिलें कीं, "तुझ्या नादानपणामुळें लोक सोडून गेले. आजपर्यंत मीं या प्रदेशावर प्रभुत्व गाजविलें; आतां शत्रूला पाठ कशी दाखवूं? अपकीर्तीच्या जिण्यापेक्षां वैभवांत मरण आलेलें पुरवलें." "आसफखान दमो येथें तळ देऊन बसलेला होता. राणीनें दोन हजार लोक जमविले. तिच्या अधिकाऱ्यांनीं शत्रूला एकदम निकरानें तोंड न देतां सुरक्षित जागेचा आश्रय घेण्याचा तिला सल्ला दिला. तेव्हां राणीनें गडाच्या पूर्वेस नर्मदा व गौर यांच्या मध्यभागीं असलेल्या जंगलांतील खिंडीचा आश्रय घेतला. असफखानानें गडा ताब्यांत घेतलें व तो राणीच्या पाठलागाला लागला."

आसफखानाच्या स्वारीचें हें 'अकबरनाम्यां'तील वर्णन सर्वथैव विश्वसनीय आहे असें नाहीं. अबुल फजलनें पुनः पुन्हा वर्णिल्याप्रमाणें पराक्रमाच्या आणि सत्तेच्या मदानें धुंद झालेली राणी, खानाच्या आगमनाची वार्ता लागतां-च, एकदम आपली राजधानी सोडून जंगलाचा आश्रय घेईल हें संभवत नाहीं. राणीची व खानाची पहिली चकमक संग्रामपूर येथें झालेली दिसते.

दमोपासून अठ्ठावीस मैलांवर असलेल्या सिंगोरगडावर आसफखानानें चाल केली. दलपतशहाच्या कारकीर्दींत सिंगोरगड हें राजधानीचें ठिकाण होतें; व खुद्द दुर्गावतीचेंहि तें निवासस्थान होतें. तेव्हां खान व दुर्गावती यांच्या लढाईला सिंगोरगडानजीक चार मैलांवर संग्रामपूर येथें तोंड लागलें हें हिंदी बखरींतील वर्णनच अधिक स्वाभाविक व खुद्द अबुल फजलच्या वर्णनाच्या दृष्टीनेंहि सुसंगत आहे. या पहिल्या चकमकींत स्वपरबलाबलाची कल्पना आल्यामुळें, अबुल फजल म्हणतो त्याप्रमाणें, राणीच्या लोकांचा धीर सुटून ते तिला सोडून गेले असतील; व तिनेंहि मग जंगलाचा आश्रय केला असेल. हिंदी बखरींत अशी कथा दिलेली आहे कीं, आसफखानानें दुर्गावतीकडे सोन्याचा चरखा व त्याबरोबर तिला असा निरोप पाठविला कीं, "स्त्रियों का काम सूत कातने का है! राज्य करने का नही!" तेव्हां त्या मानिनीनें उलट त्याच्याकडे सोन्याचा पिंजण व त्याबरोबर असा खोंचदार निरोप पाठविला कीं, "तुम्हारा काम पींजनसे रुई धुनकने का है!" या निरोपामुळें चिडून आसफखानानें सिंगोरगडावर चाल केली. हिंदी बखरींतील ही चरख्याची कथा जरी कदाचित् विश्वसनीय न मानली, तरी पुढील संग्रामपूरच्या संग्रामाचा वृत्तान्त मात्र 'अकबरनाम्यां'तील हकीकतीपेक्षां निःसंशय अधिक विश्वसनीय आहे. विशेष नवलाची गोष्ट ही कीं, जो अबुल फजल खानाच्या स्वारीची वार्ता येतांच राणीपाशीं पुरते पांचशेंहि लोक राहिले नाहींत असें सांगतो, तोच अबुल फजल शेवटच्या म्हणजे खिंडींत झालेल्या लढाईंत तिच्याबरोबर पांच हजार लढवय्ये होते असें सांगतो! अर्थात्, शाहिनशहाच्या दिग्विजयाचें रसभरित वर्णन करणाऱ्या या दरबारी इतिहासकाराच्या विधानां-वर जरा जपूनच विश्वास टाकला पाहिजे. दुर्गावतीनें प्रथम सिंगोरगडाजवळ खानाच्या फौजेशीं लढाई दिली; व नंतर मैदानांत उघड सामना देणें सोईचें नाहीं असें वाटल्यामुळें तिनें जंगलाचा आश्रय केला असावा.

आसफखान तिचा पाठलाग करीत करीत मागोमाग आला. पुढील प्रकाराचें वर्णन करितांना अबुल फजल म्हणतो, "खानाची फौज पाठीवर आल्याचें कळतांच राणीनें अधिकाऱ्यांची बैठक करविली; व आपला झुंज देण्याचा निश्चय तिनें त्यांच्या कानांवर घातला. रानावनांत काळ काढण्या-पेक्षां एकदां सामना देऊन सोक्षमोक्ष करून घेतलेला चांगला, असें तिनें त्यांना

सांगितलें. शेवटीं तिच्याबरोबर असलेल्या पांच हजार लोकांनीं लढण्याचा निर्धार केला. दुसऱ्या दिवशीं नजीर-महंमदप्रभृति खानाच्या लोकांनीं खिंडीच्या तोंडाशीं येऊन, राणीच्या गजसेनेचा शूर धुरीण अर्जुनदास याला ठार मारल्याचें वर्तमान आलें. तेव्हां राणीनें चिलखत चढविलें; व हत्तीवर आरूढ होऊन ती युद्धाला सज्ज झाली. तिनें आपल्या सैनिकांना असें सांगितलें कीं, 'घाई करूं नका; शत्रूला खिंडींत येऊं द्या. मग त्यांच्यावर तुटून पडून, आपण त्यांचा धुव्वा उडवून देऊं.' तिच्या सांगण्याप्रमाणेंच घडलें. तीनशें सैनिक या लढाईंत पडून राणीचा जय झाला. सायंकाळीं राणीनें आपल्या अधिकाऱ्यांना बोलावून त्यांना सल्ला विचारला. राणीनें त्यांना असें सांगितलें कीं, 'आपण आतांच रातोरात हल्ला केला, तर शत्रूचा अगदीं निःपात होईल. नाहीं तर सकाळीं आसफखान त्यांच्या मदतीला येऊन, आतां अतिशय सुकर असलेलें काम मग अत्यंत दुष्कर होऊन बसेल!' पण तिचा हा बेत कोणालाच पसंत पडला नाहीं. तेव्हां स्वस्थानीं परत जाऊन लढाईंत कामास आलेल्या लोकांच्या आप्तांचें समाधान करण्यांत तिनें रात्र घालविली. सकाळीं तिनें म्हटल्याप्रमाणें घडलें. आसफखान आपल्या तोफखान्यासह आला; व खिंडीच्या तोंडाशीं उत्तम बंदोबस्त करून त्यानें राणीच्या सैन्यावर चाल केली. राणीनेंहि चपळ व भव्य हत्तीवर आरूढ होऊन खानाच्या फौजेला तोंड दिलें. तीन प्रहर निकराचें युद्ध झालें. राणीचा पुत्र वीरशहा यानें तीन वेळां शत्रुसैन्याला परतून लावलें. पण शेवटीं तो जखमी झाल्यामुळें राणीनें त्याला निवडक लोक बरोबर देऊन सुरक्षित स्थळीं पाठविला. आतां राणीजवळ पुरे तीनशेंहि लोक राहिले नाहींत. पण, राणीचा निश्चय ढळला नाहीं. ती निकरानें लढत होती. इतक्यांत तिच्या उजव्या गालाला तीर लागला. तो उपटून काढून फेकून देते न देते, तोंच दुसरा तीर तिच्या गालाला लागला. तोहि तिनें उपटून काढला. पण तिला दुःखातिरेकानें मूर्च्छा आली. सावध झाल्यावर जवळच असलेला आपला एकनिष्ठ मंत्री आधार याला ती म्हणाली, 'तूं प्रसंगीं माझ्या उपयोगी पडशील म्हणून मीं तुला वाढवला. युद्धांत पराभूत होण्याचा दुर्धर प्रसंग मजवर ओढवला आहे. पण शत्रूच्या हातीं पडून बेअब्रू होण्याचा प्रसंग मजवर न येवो! म्हणून हा खंजीर तूं माझ्या छातींत खुपस!' पण आधार

तिला म्हणाला, 'हें क्रूरकर्म माझ्या हातून घडणार नाहीं. या रणक्षेत्रांतून मी तुम्हांला बाहेर काढून नेतों. या हत्तीच्या चपळपणावर माझा भरंवसा आहे.' हे त्याचे शब्द कानांवर पडतांच संतप्त होऊन राणीनें स्वतःच आपल्या छातींत आवेशानें खंजीर खुपसला!'

अशा रीतीनें राणी दुर्गावतीचा अखेर अंत झाला. अबुल फजलनें केलेलें हें वर्णन बहुतेक विश्वसनीय आहे. तथापि, वीरशहाला राणीनें सुरक्षित स्थळीं पोंचविल्याचा त्यानें व फरिस्त्यानेंहि दिलेला वृत्तान्त मात्र विश्वसनीय वाटत नाहीं. हिंदी बखरींत व रामनगरच्या शिलालेखांतहि, आपला पुत्र वीरनारायण हा युद्धांत पडल्यानंतर साहजिकच हताश होऊन राणीनें आत्मवध केला, असे उल्लेख आहेत; व तोच प्रकार अधिक संभवनीय वाटतो. दुर्गावतीच्या मृत्यूमुळें मुसलमानांच्या वर्धिष्णु सत्तेशीं सतत तीन शतकें झगडणाऱ्या चंदेलांच्या वीरकुलाची वैभवशाली परंपरा नष्ट झाली. इतकेंच नव्हे, तर गडमंडळाच्या हिंदु राज्याचें आणि गोंडवनाचेंहि वैभव लुप्तप्राय झालें. मेजर जनरल सर विल्यम स्लीमन हे आपल्या आठवणींत म्हणतात, "मुसलमानांच्या आक्रमणाची प्रबळ लाट थोपवून धरण्याचा प्रयत्न करीत असतां, त्या शेवटच्या प्रयत्नांत सैन्याच्या अग्रभागीं असलेली ही पराक्रमी राणी जबलपुरापासून सुमारें बारा मैलांवर बरेली गांवानजीक मारली गेली. मध्यप्रांतावर प्रभुत्व गाजविणाऱ्या कोणत्याहि व्यक्तीपेक्षां दुर्गावतीचें स्मरण लोक अत्यंत आदरानें करितात. दोन टेकड्यांच्या मध्यभागीं खिंडींत तिचा देह जिथें पडला, तिथें अद्यापहि तिचा चबुतरा दृष्टीस पडतो; व त्याच्याजवळच दोन वाटोळ्या शिळाहि पडलेल्या आहेत. या शिळांविषयीं लोक असें सांगतात कीं, राणी दुर्गावतीच्या दुंदुभींचें या शिळांत रूपांतर झालें असून, डोंगरदऱ्यांतून घुमणारा या रणदुंदुभीचा निनाद दुर्गावतीबरोबर धारातीर्थी पडलेल्या हजारों वीरांच्या आत्म्यांना रोज मध्यरात्रीं आवाहन करितो! या रस्त्यानें जाणारे प्रवासी तिच्या चबुतऱ्यावर या खिंडींत विपुल असलेले स्फटिक आदरपूर्वक वाहतात; आणि, दुर्गावतीच्या उज्ज्वल इतिहासाच्या स्फूर्तीनें माझ्याहि मनाला इतकें भारलें कीं, तिच्या चबुतऱ्याच्या दर्शनाच्या वेळीं त्यावर स्फटिक वाहण्याचा मोह मलाहि आवरला नाहीं!" (Sleeman's Rambles and Recollections, P. 190)

राणी दुर्गावतीच्या वीरचरितानें सर विल्यम स्लीमन यांना इतकें मोहित केलें कीं, गडमंडळाच्या इतिहासाचें संशोधन आणि संकलन करण्याची स्फूर्ति प्रथम त्यांनाच झाली. परंतु अचेतनांनाहि जागृत करीत मध्यप्रांताच्या डोंगरदऱ्यांना घुमविणारे दुर्गावतीच्या यशोदुंदुभीचे हे निनाद तिच्या देशबांधवांच्या कानीं पडून अखिल भारताला ललामभूत असलेल्या या स्त्री-रत्नाचें वीरचरित वर्णन करण्याची स्फूर्ति हिंदी इतिहासकारांना मात्र केव्हां होईल तेव्हां खरी !

मनोरंजन, फेब्रुवारी १९२८

---

# नागपूर : : १२

हिंदुस्थानच्या राजकारणांत नागपूर शहराचें नांव जर अलीकडे कोणामुळें विशेष गाजलें असेल, तर तें डॉ. मुंजे यांच्यामुळेंच होय. वस्तुतः निरनिराळ्या क्षेत्रांत लौकिक मिळविलेलीं कर्तबगार माणसें या शहरांत आज सुद्धां कांहीं थोडीं आहेत असें नाहीं. बॅ. अभ्यंकरांसारखा नरकेसरी, श्री. आवारी यांच्यासारखा झुंजार सेनापति, डॉ. हरिसिंग गौर यांच्यासारखा आधुनिक मनु, श्री. केशवराव दप्तरी यांच्यासारखा धर्मशास्त्राचिकित्सक, श्री. आनंदराव टेकाडे यांच्यासारखा सभाजेता कवि किंवा प्रो. बेहरे यांच्यासारखा बहुप्रसू ग्रंथकार हे सारे नागपूरचेच; व एका दुय्यम, दुभाष प्रांताची राजधानी होऊन बसलेल्या या शहराच्या कीर्तीत त्यांनीं आपआपल्या परीनें भरहि पण पुष्कळच घातली आहे, यांत शंका नाहीं. परंतु नागपूरचें नांव जर कोणत्या एकाच व्यक्तीच्या कर्तृत्वामुळें आज सर्व हिंदुस्थानांत दुमदुमत असेल, तर तें फक्त डॉ. मुंजे यांच्याच होय. किंबहुना डॉक्टरसाहेब म्हणजे नागपूरचें मूर्तिमंत वैशिष्ट्य होय असेंहि म्हटलें तरी शोभेल. त्यांचा तो उग्र-गंभीर चेहरा, हिंदुत्वाचा अभिमान दर्शविणारें भव्य कपाळावरील गंध, मनांत धाक उत्पन्न

करणारे दीप्तिमान् डोळे, वक्षःस्थळापर्यंत रुळणारी करड्या रंगाची दाढी, गुडघ्याची खबर घेणारा कोशाचा घोळदार अंगरखा, त्याच्या घोळांतून डोकवणारें रुईफुली उमरेडी धोतर आणि पोलादाच्या कांबीसारख्या मनगटाला शोभेल असा हातांतील दंडा!— हा त्यांचा एकंदर रुबाब पाहिला, म्हणजे 'वीरो रसः किमयमेत्युत दर्प एव' असे उद्गार सहजच तोंडांतून बाहेर पडतात. त्यांच्या या एकंदर आविर्भावांत ज्यावर मृदुतेचा आळ घेतां येईल, अशा कोणत्याच गोष्टीला फारसा अवसर नाहीं आणि हेंच विधान नागपूरविषयींहि सामान्यतः करतां येईल.

एका काळीं हें शहर भोसल्यांची राजधानी होतें व अजूनहि तें राजधानीच राहिलेलें आहे. पण मुंबईच्या मलबार हिलवरील झुलत्या उद्यानासारखा किंवा पुण्याच्या मुळामुठेच्या कांठावरील बंडगार्डनसारखा एकहि सुंदर बगीचा या शहरांत नाहीं. त्याचप्रमाणें, सर विठ्ठलदासांच्या पर्णकुटीसारखा किंवा सर सयाजीरावांच्या जयमहालासारखा रमणीय प्रासादहि पण या शहरांत आढळावयाचा नाहीं. धनतोलीची वसती ही नागपुरांतील सर्वांत मनोहर आणि पद्धतशीर वसाहत म्हणून सांगतां येईल. पण धनतोलींतील बंगल्यांभोंवतीं सुद्धां टुमदार बगीचा क्वचितच दृष्टीस पडेल. कशी तरी कापलेली हिरवळ, अस्ताव्यस्त वाढलेलीं झुडपें आणि कशा तरी मांडलेल्या चार कुंड्या एवढा सरंजाम असला म्हणजे झाला बगीचा! पुण्याला काय किंवा मुंबईला काय, व्याहीभोजनाच्या वेळीं अशी सुरेल पंगत वाजविणारे सनईवाले आहेत कीं, ज्यांची मंजुळ रागदारी चालू झाली, म्हणजे जेवणाराचें भान हरपून तोंडांतला घास तोंडांत आणि पानांतला हात पानांतच राहून जावा. सनईची असली मधुर रागदारी किंवा चौघड्याचें सुरेल वादन या शहरांत चुकूनहि कधीं ऐकूं यावयाचें नाहीं. फार तर ताशाच्या कडकडाटांत 'राधेकृष्ण बोल'चा बदसूर गर्गशा काय कानांवर पडेल तेवढाच! आणि जिथें वादन नाहीं तिथें गायन तरी कुठून ऐकूं येणार? नाहीं म्हणावयाला, रस्त्यांतून बेछूटपणानें ओरडत भटकणाऱ्या कलंदरांचे 'मेरा मौला बुलाले'चें कर्कश आवाज मात्र रात्रीं अपरात्रीं कानांवर येऊन आदळतात. चहाचे घुटके घेत जिथें तासभर गप्पा छाटीत बसतां येईल असें एकहि उत्कृष्ट उपाहारगृह नागपुरांत नाहीं किंवा रंगभूमीच्या सजावटीला आपल्या प्रेक्षणीय बांधकामानें साथ देईल

असें एकहि सुबक नाटकगृह इथें नाहीं. लोकांजवळ पैसा पाहिला तर तो कांहीं कमी आहे असें नाहीं. ज्यांचीं उत्पन्नें लाखांनीं मोजतां येतील असे मालगुजार आणि सावकार नागपुरास अनेक आहेत; पण सौंदर्याची अभिरुचीच एकंदरींत कमी, हेंच खरें. माझे नागपुरास कांहीं काळ स्थायिक झालेले पुण्याचे एक रसिक स्नेही नेहमीं म्हणत कीं, "नागपुरास श्रीमंती आहे; पण तिला शोभा आणणाऱ्या ललितकला मात्र नाहींत." आणि तें कांहीं खोटें नव्हे.

पण ही एक बाजू झाली. नागपूरच्या या वैशिष्टयाला दुसरी बाजू आहे; व ती जर दाखविली नाहीं, तर या दिलदार आणि मर्द शहराला अन्याय केल्यासारखा होईल. डॉ. मुंजे यांनीं असेंब्लीच्या एका कट्टर मुसलमान सभासदाला एकदां गमतीनें असें सांगितलें होतें म्हणतात कीं, "ज्यांनीं दिल्लीचें तख्त घेऊन अटकेपार झेंडे नाचविले ते हिंदु जर तुम्हांला पहावयाचे असतील, तर मजबरोबर नागपूरला चला!" या त्यांच्या विधानांत विनोदापेक्षां वस्तुस्थितीचा भाग निःसंशय अधिक आहे. मार्बतीच्या मिरवणुकीच्या दिवशीं पुरुषभर उंचीच्या काठ्या हातांत घेऊन अकुतोभय वृत्तीनें मशिदीवरून गर्जत जाणारा हजारों हिंदूंचा जमाव ज्यांनीं पाहिला असेल किंवा दसऱ्याच्या सीमोल्लंघनाला निघालेल्या राष्ट्रीय स्वयंसेवकांच्या पथकाचा लष्करी रुबाब ज्यांनीं बघितला असेल, त्यांना डॉक्टरसाहेबांची ही दर्पोक्ति यथार्थ वाटल्याविना राहणार नाहीं. 'दंडस्यहि भयात्सर्वे' हें मनूचें वचन उद्धृत केल्याशिवाय डॉक्टरांचें प्रायः एकहि व्याख्यान पुरें होत नाहीं; व 'स्ववीर्यगुप्ता हि मनोः प्रसूतिः' हे कालिदासानें मनूच्या वंशजांविषयीं काढलेले उद्गार जर कोणी खरे करून दाखविले असतील, तर ते त्यांच्या आवडत्या नागपूर शहरानेंच. समोरच्या मुसलमानाच्या घरांतून गोळ्या सुटत आहेत व त्यांना बळी पडलेल्या तरुणांचीं प्रेतें पुढें पडलेलीं आहेत;—तरीसुद्धां त्या घरावर चढून जाण्याची धडपड करणारे वीरयुवक फक्त नागपुरासच निघतील! डॉ. मुंजे काय किंवा बॅ. अभ्यंकर काय, त्या दोघांकडे पाहिल्यावर मनाला अशी खात्री वाटते कीं, गोळ्यांचा जरी पाऊस पडण्याचा प्रसंग आला, तरी तो आपल्या मस्तकावर झेलावयाला हे पुढारी धैर्यानें पुढें सरसावतील.

आणि जसे पुढारी, तसे अनुयायी! चार वर्षांपूर्वी हिंदु-मुसलमानांच्या दंग्यांत व गेल्या वर्षी कायदेभंगाच्या मोहिमेंत नागपूरनें आपलें हें शौर्य धडाडीनें प्रकट केलें आहे. हिंदु हा दबेल असतो, असाच सामान्यतः सर्व हिंदुस्थानाचा अनुभव. पण नागपूरचा हिंदु हा दंडेल असतो— तो दुसऱ्यांना दाबील, स्वतः दबणार नाहीं. डॉ. मुंजे यांची दाढी ही त्यांच्या दंड्याइतकीच आतां सर्व हिंदुस्थानभर गाजलेली आहे. परंतु, डॉ. मुंजे हेच कांहीं एकटे येथील दढियाल पुढारी आहेत, असें नाहीं. नागपूरचे पहिले जहाल पुढारी कै. दादासाहेब उधोजी हे दढियालच होते; व बॅ. अभ्यंकर हेहि दाढियाल आहेत. आणि पुढारी दाढियाल असल्यामुळेच कीं काय, नागपूरच्या लोकांना अन्यधर्मीयांच्या दाढीचा काडीइतकाहि धाक वाटत नाहीं.

नागपूरचा हा मर्दानी बाणा हा भोसल्यांच्या वैभवाचाच एक अवशेष आहे, असें म्हणतां येईल. भोसले घराण्यांतील सध्यांचे राजे आणि राजपुत्र हे मल्लविद्या आणि अश्वविद्या यांचे मोठे भोक्ते असून, राजे लक्ष्मणरावसाहेबांच्या हत्तीखान्यांत दर रविवारीं कुस्त्यांची दंगल झडत असते. केवळ अशिक्षितांतच नव्हे, तर सुशिक्षितांतहि पहिलवानीचा आणि मर्दानी खेळांचा षोक अद्याप कायम असून, विद्यापीठाची पदवी घेतलेलेहि विद्यार्थी मिरवणुकींतून दांडपट्टा खेळतांना पुष्कळदां दृष्टीस पडतात. दुर्दैवानें, भोसल्यांच्या वैभवाचें एवढेंच एक स्मारक आतां अखंड असें शिल्लक उरलें आहे. बाकीचीं सर्व स्मारकें लुप्त किंवा उध्वस्त झालेलींच आढळतात. नागपूरच्या स्टेशनवर मनुष्य उतरला, म्हणजे प्रथमच त्याच्या दृष्टीस सीताबर्डीची टेकडी आणि तिच्यावरील गढीवजा किल्ला पडतो. या टेकडीनेंच नागपूरला दगा दिला! इंग्रज रेसिडेंट जेंकिन्स यानें या टेकडीच्या आश्रयानें नागपूरवर मारा करून हें शहर आपल्या ताब्यांत घेतलें. आज या रेसिडेन्सीच्या आवारांतच मॉरिस कॉलेज भरत असतें. खडकीच्या ज्या मैदानावर दुसऱ्या बाजीरावाला खडे चारून, इंग्रजांनीं आपला लाल बावटा शनिवारवाड्यावर फडकविला, त्याच मैदानावर आज पुण्याच्या डेक्कन कॉलेजची उदास इमारत उभी आहे. आणि सीताबर्डीच्या टेकडीशेजारील रेसिडेन्सीच्या ज्या इमारतींत अप्पासाहेब भोसल्यांना पदच्युत करण्याचीं खलबतें झालीं आणि ज्या इमारतीच्या आसपास पुढें लवकरच भोसल्यांच्या

सैनिकांच्या इमानी रक्ताचा सडा पडला, त्या इमारतींतच आज मॉरिस कॉलेजचे वर्ग भरत आसतात! पुणें आणि नागपूर येथील या घटना दैवाच्या उपरोधप्रियतेच्या निदर्शक आहेत, असें कोण म्हणणार नाहीं? स्टेशनवरून शहरांत यावयाला निघालें, म्हणजे एम्प्रेस मिलचें धूलि-धूम-धूसर आवार सोडतांच, शुक्रवार तलावाचा रम्य विस्तार दृष्टीस पडून, प्रवासाच्या दगदगीनें शिणलेलें मन उल्लसित होतें. जुनाट, बकाल आणि अस्ताव्यस्त वसलेल्या या शहराला जर कशामुळें थोडें तरी सौंदर्य आलें असेल, तर तें या तलावामुळेंच होय. सायंकाळच्या वेळीं संध्यारागाच्या रमणीय छटा, ढगांच्या चित्रविचित्र सावल्या, कांठावरच्या बगीचांतील वृक्षवेली किंवा देवळांचीं शिखरें यांचीं प्रतिबिंबें जेव्हां या तलावाच्या शान्त पाण्यांत पडतात, तेव्हां संध्यादेवीनेंच जणूं हा विशाल चित्रफलक टेकडीच्या पायथ्याला ओठंगून ठेवला आहे, असा भास मनाला होतो; व चांदण्या रात्रीं विद्युद्दीपांनीं वेष्टिलेला हा तलाव पाहिला, म्हणजे ज्याच्याभोंवतीं पांढऱ्या शुभ्र हिरकण्या बसविलेल्या आहेत, अशा आंगठीवरील पाचूच्या टपोऱ्या खड्याची आठवण होते. नागपूरच्या सीमेवर असलेले तेलंखेडी आणि बारद्वारी हे तलावहि असेच प्रेक्षणीय आहेत. नागपूरच्या आसमंतात् ठिकठिकाणीं असलेल्या या तलावांची रचना आणि त्यांचे रेखीव घाट बघितले म्हणजे भोसल्यांच्या जलकेलिकौतुकाची कल्पना आल्याविना राहत नाहीं.

शुक्रवार तलावावरून टिळक पुतळ्याला प्रदक्षिणा घालून पुढें आलें म्हणजे नागपूरचा भव्य शुक्रवार दरवाजा दृष्टीस पडतो. हा प्रचंड दरवाजा पाहिला म्हणजे भोसल्यांच्या अग्नीच्या भक्ष्यस्थानीं पडलेल्या महालाच्या विस्ताराची आणि वैभवाची यथार्थ कल्पना येते. ज्या या शुक्रवार दरवाजाच्या देवड्यांतून पूर्वी हत्यारबंद सैनिकांचा अहोरात्र खडा पहारा असे आणि ज्याच्या कमानीखालून सोन्या-चांदीच्या अंबाऱ्यांनीं भूषविलेल्या भोसल्यांच्या उत्तुंग गजराजि अनेकदां डौलानें डुलत गेल्या असतील, त्या या दरवाजाच्या ओवऱ्यांत आज भणंगांनीं आणि पिसाटांनीं आपले संसार थाटले असून त्याची कमान पाकोळ्या आणि पारवे यांचें आश्रयस्थान होऊन बसली आहे. शुक्रवार दरवाजाप्रमाणें चिटणीसपुऱ्याच्या वाटेवर असलेला नगारखानाहि प्रेक्षणीय आहे. या नगारखान्यांत आतां नगाऱ्यावरील टिपरीच्या

निनादाऐवजीं पोलीस लाइनींतील पुरभय्यांच्या भजनाचा गलका ऐकूं येतो! नगारखान्यावरून थोडें पुढें आलें, म्हणजे नागपूरचे अगदीं पहिले अधिपति जे गोंड राजे त्यांचा किल्ला दृष्टीस पडतो. बकरीदच्या दिवशीं हत्तीवर बसून जेव्हां या किल्ल्यांतील गोंड राजा कुरबानीसाठीं बाहेर पडतो, तेव्हां औरंगजेबाच्या कारकीर्दीत या राजाच्या पूर्वजानें केलेल्या धर्मांतराची आठवण मनाला तीव्रतेनें होऊन, हिंदुत्वाचें नष्टचर्य मूर्तिमंत डोळ्यांपुढें उभें राहतें; व संध्याकाळच्या वेळीं आपल्या जुन्यापुराण्या बगींत बसून फिरावयाला निघालेले श्रीमंत रघूजी राजे भोसले हे आपल्या एखाददुसऱ्या आश्रिताचा किंवा ऱ्हाहात्याचा मुजरा अगत्यानें स्वीकारतांना जेव्हां या रस्त्यावर दृष्टीस पडतात, तेव्हां पारतंत्र्यामुळें आलेल्या लाजिरवाण्या दैन्याची जाणीव मनाला तीव्रतेनें होऊन, 'कालाय तस्मै नमः' असे उद्‌गार तोंडांतून बाहेर निघतात. नागपूर ही प्रथम गोंडांची, नंतर भोसल्यांची आणि आज इंग्रजांची राजधानी आहे. गोंड आणि भोसले यांच्या राजवैभवाचीं, उध्वस्त का होईनात, पण स्मारकें अजूनहि शहरांत सर्वत्र दृष्टीस पडतात. परंतु, ज्यांचें राज्य या घटकेला नागपूरवर चालू आहे, त्या इंग्रजांच्या वैभवाचें मात्र एकहि स्मारक येथें आढळत नाहीं. या नव्या राजवटीच्या वैभवाच्या नकली खुणा पाहावयाच्या म्हणजे शहरापासून दोन-चार मैलांच्या अंतरावर असलेली सिव्हिल लाइन्सच गांठली पाहिजे! ब्रिटिश सत्तेचे आश्रित आणि आधारस्तंभ यांचें हें एक आगरच होय! तेथले ते तुळतुळीत डामरी रस्ते, घोटीव दगडी इमारती, युरोपियन फर्म्सच्या कचेऱ्या व इंग्रज आणि तत्सम जातींचे लोक यांची रस्त्यांतील रहदारी पाहिली, म्हणजे नागपुरांत इंग्रजी राजवट चालू आहे, अशी मनाची खात्री पटते! गोंडांना नामशेष करून भोसल्यांनीं नागपुरांत राज्य केलें; व भोसल्यांना निर्माल्यवत् करून आज इंग्रज इथें राज्य करीत आहेत. विधिघटनेचा हा सारा खेळ घडून यावयाला पुरीं दोन शतकेंहि लागलीं नाहींत. मग पुढल्या पन्नास वर्षांत या शहरामध्यें आणखी कोणती शाही अस्तित्वांत येईल, हें कोणी सांगावें?

सीताबर्डीच्या टेकडीवर उभें राहून जर पाहिलें, तर अर्वाचीन भौतिक सुधारणेच्या राजरस्त्यावर रांगत असलेलें हें खेडवळ शहर वनश्रीनें कौतुकानें उचलून आपल्या हिरव्यागार पदराखालीं घेतल्यासारखें वाटतें; व तो देखावा

मोठा रम्य दिसतो. खुद्द नागपूर शहरांत जरी निसर्गरमणीय किंवा कलाकमनीय अशीं स्थळें हाताच्या बोटांवर मोजण्याइतकींसुद्धां नसलीं, तरी त्याच्या पंचक्रोशींत माल अंबाझरी, गोरेवाडा, स्टार्की पाइंट, दिघोरी, हंपयार्ड वगैरे सृष्टिदेवीचीं विहारस्थळें पुष्कळ आहेत. हें शहर जसें नैसर्गिक दृष्टीनें लोभनीय नाहीं, तसेंच सांस्कृतिक दृष्टीनेंहि फारसें आकर्षक नाहीं. महाराष्ट्राच्या सरहद्दीवर वसलेलें असल्यामुळेंच कीं काय, त्याच्या भाषेवरच केवळ नव्हे, तर चालीरीतीवरहि हिंदुस्थानी शेजाराचा पगडा बसलेला आढळतो. याची एक ठळक खूण अशी सांगतां येईल कीं, नागपुरांतलि महाराष्ट्रीय मनुष्य फार रंगांत किंवा खुशींत आला म्हणजे हिन्दींतून आपलें हृद्गत व्यक्त करितो ! तसेंच पुण्याप्रमाणें हें शहर संस्थाबाज नाहीं किंवा सभालोलुपहि नाहीं. निवडणुकीच्या दंगलींत किंवा चळवळीच्या धामधुमींत काय सभांची झोड उठेल तेवढीच. पण एवढें मात्र खरें कीं, नागपूर सभाबाज नसलें तरी येथील सभेची सर मात्र पुण्याच्या सभेला कधींहि येणार नाहीं. विशेषतः बॅ. अभ्यंकर यांचें व्याख्यान असलें, म्हणजे सभेला जत्रेसारखी गर्दी लोटते; व ती किती वेळ चालेल याचा नेम नसल्यामुळें श्रोतृगण आपल्या सवडीप्रमाणें येऊन जाऊन व्याख्यानश्रवणाची मजा लुटीत असतो. बॅरिस्टरसाहेबांचें व्याख्यान म्हणजे ती एक आतषबाजीच असते. आतषबाजींत जसे बारुदीचे निरनिराळे चित्रविचित्र प्रकार पाहावयाला मिळतात, तसे त्यांच्या व्याख्यानांत वक्तृत्वाचे अनेकरंगी फवारे, हास्याचे तुषार उधळीत, सैरावैरा उडतांना दृष्टीस पडतात. पण, बॅरिस्टरसाहेबांची तारीफ ही कीं, त्यांच्या त्या दणकेबाज आणि कुरापतखोर वक्तृत्वामुळें श्रोतृसमुदाय प्रसंगीं कितीहि खवळून गेला, तरी दर्याच्या तुफान लाटांवर वरुणराजानें लीलेनें पालाण घालावें, त्याप्रमाणें ते त्या क्षुब्ध सभेवरहि आपली हुकमत बेगुमानपणें गाजवितात. आणि, बड्या भाईच्या अजस्त्र देहाशीं स्पर्धा करणाऱ्या भव्योग्र आकृतीमुळें किंवा नोकरशाहीशीं झुंज देतांना व्यक्त होणाऱ्या शौर्यामुळेंच केवळ नव्हे, तर लोकांच्या क्रोध-क्षोभाची पर्वा न करण्याच्या त्यांच्या या बेडर वृत्तीच्या दृष्टीनेंहि त्यांना मिळालेली 'नरकेसरी' ही पदवी अगदीं यथार्थ वाटते.

पुण्याच्या कोणत्याहि बोळांत तुम्ही जा; तेथील निदान तीन-चार घरांवर तरी संस्थांच्या नांवांच्या पाट्या लटकलेल्या तुम्हांला आढळतील. नागपूरला

संस्थांचा असा सुकाळ नाहीं. संस्था या बहुधा समाजाच्या गरजा आणि त्यांतील व्यक्तींची उद्योगशीलता किंवा हौस यांचा मेळ पडून उत्पन्न होत असतात. नागपूरच्या लोकांच्या मानसिक किंवा सांस्कृतिक गरजा अद्याप फारशा वाढलेल्या नसल्यामुळें, येथें संस्थांचा पसारा अगदीं मोजका आहे. या हाताच्या बोटांवर मोजतां येणाऱ्या संस्थांत, अर्थात् राष्ट्रीय सभेच्या शाखोपशाखा वगळल्यास, हिंदु सभा, सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटी, ब्राह्मणेतर संघ, रायफल असोसिएशन, टिळक विद्यालय, सेवासदन, अनाथ विद्यार्थिगृह, श्रद्धानंद अनाथालय इत्यादि संस्थांचा उल्लेख प्रामुख्यानें करतां येईल. याशिवाय नागपूरच्या सार्वजनिक जीवनाशीं ज्यांचा जिव्हाळ्याचा संबंध आहे किंवा त्यावर ज्यांनीं महत्त्वाचे परिणाम घडवून आणले आहेत, अशा व्यक्ति, गट किंवा अड्डेहि इथें बरेच आहेत. राजे लक्ष्मणरावसाहेब भोसले यांना अशा सार्वजनिक व्यक्तींत अग्रपूजेचा मान द्यावा लागेल. जन्म राजकुळांत झालेला; नवीन कल्पनांची ओळख सामान्यतः कमी; व ऐष-आरामांत आयुष्य घालविण्याइतकी संपत्तीची अनुकूलता. तरीसुद्धां राजेसाहेब हरएक प्रकारच्या सार्वजनिक चळवळीला मदत करावयाला पुढें येतात, हा त्यांचा केवढा थोरपणा! डॉ. खरे हे सुद्धां नागपुरांतील अनेक संस्थांचे आधारस्तंभ आहेत. नागपुरांत प्रायः अशी एकहि संस्था सांपडणार नाहीं कीं, जिच्याशीं त्यांचा कांहीं ना कांहीं तरी संबंध नसेल. कोंकणस्थ हे कोत्या मनाचे आणि घट्ट मुठीचे असतात, असा एक लोकप्रवाद आहे. परंतु डॉक्टरसाहेबांनीं आपल्या भरीव आणि व्यापक सौजन्यानें तो प्रवाद, निदान नागपूरपुरता तरी, खोटा पाडला असें म्हणावें लागतें. डॉ. हेडगेवार म्हणजे नागपुरांतील एक संस्थाच आहे. त्यांच्या सहानुभूतीला एकंदरींत मर्यादा फार. पण ज्या विषयाबद्दल त्यांना आत्मीयता वाटते, तिथें मात्र त्या सहानुभूतीच्या उत्कट-तेला मर्यादा राहत नाहीं. श्री. रुईकर आणि श्री. फुले हे येथील अनेक कामगार-संस्थांचे जनक आणि चालक आहेत. त्यांच्यांत फरक एवढाच आहे कीं, श्री. रुईकर यांची चळवळ लोकाभिमुख असते, तर श्री. फुले हे सरकारच्या दृष्टींत भरतील अशा रीतीनें उद्योग करीत असतात. मारुतीच्या जलशाचे उत्पादक श्री. पांडुरंग सावजी ही ब्राह्मणेतर चळवळीं-तील एक उत्सवमूर्ति असून, त्यांच्या डोक्यांतून सदैव गमतीदार क्लृप्त्या

निघत असतात. याशिवाय संस्थारूप पावलेल्या व्यक्ति म्हणून 'उद्यम'. कर्ते श्री. माधवराव पाध्ये, नागपूर कॉलेजचे संस्थापक श्री. कायंदे, अनाथ विद्यार्थिगृहाचे श्री. गोविंदराव चोळकरप्रभृतींचा उल्लेख करितां येईल. 'जनता' पत्राचे सूत्रधार श्री. गोपाळराव दळवी, 'हितवाद'चे संपादक श्री. वेंकटराम व 'महाराष्ट्रा'चे संपादक श्री. गोपाळराव ओगले हे, वृत्तपत्रकार या नात्यानें, येथील सार्वजनिक चळवळींचे आधारस्तंभच आहेत म्हटलें तरी चालेल. कोल्हापुरी गुलाबी फेटा लपेटलेलें श्री. दळवी यांचें तें ठेंगणें ठुसकें हसतमुख, मिस्किल ध्यान पाहिलें म्हणजे येथील मराठा समाजांत अलीकडे उद्भवलेल्या ब्राह्मणेतर भावनेचा उगम कुठून झाला असेल, याची चांगली कल्पना येते. श्री. ओगले व श्री. वेंकटराम हे दोघेहि अगदीं सामान्य स्थितींतून केवळ आपल्या कर्तबगारीच्या जोरावर महत्पदाला चढलेले आहेत. प्रत्येक शब्दागणिक 'अ-अ' करीत बोलणारे 'हितवाद'चे हे मद्रासी संपादक जर पाहावयाचे असतील, तर महाराज बागेजवळील सिनेमाचें तिकीट काढावें म्हणजे झालें; व 'महाराष्ट्रा'च्या संपादकांना पाहावयाचें, म्हणजे बुधवारबाजार गांठला पाहिजे! आपली विनीत पण शोधक दृष्टि रस्त्यांत चोहींकडे फेकीत मोठ्या गडबडीनें सानुचर बाजारांत संचार करणारी गोपाळरावजींची ती बावळी, ठेंगणी मूर्ति पाहिली, म्हणजे टिळकांच्या तेजस्वी राजकारणाची परंपरा नागपूर प्रांतांत जागृत ठेवणारा आणि निवडणुकीच्या सामन्यांत अभ्यंकरांसारख्या 'नरकेसरी'लाहि आपल्या उपरोधगर्भ लेखणीनें लोळविणारा 'महाराष्ट्रा'चा तो संपादक हाच गृहस्थ असेल, असें कोणालाहि वाटणार नाहीं.

या व्यक्तींइतकेच येथील निरनिराळे गट आणि अड्डेहि मनोरंजक आहेत. टिळक विद्यालयाचा शिक्षकवर्ग हा शीलानें आणि स्वार्थत्यागानें नागपुरांतील सर्वच कार्यकर्त्यांत वरचढ ठरण्यासारखा असून, आचार्य धर्माधिकारी हे जसे आपल्या सात्त्विक विद्वत्तेनें तसें आचार्य पटवर्धन हे आपल्या निरपेक्ष संघटनचातुरीनें आदरणीय होऊन बसले आहेत. 'वागीश्वरी'च्या विलासांत रमलेला येथील तरुण लेखकवर्ग लवकरच वाङ्मयांतील एक प्रभावी संघ होईल, अशी आशा वाटते. धनतोली—बर्डीवरील साहित्यप्रेमी विद्वानांचाहि एक लहानसा अड्डा असून, त्यांत दर रविवारीं बर्डीवरील वृद्ध साहित्यपुंगव श्री. भवाळकर यांच्या नेतृत्वाखालीं चमचमीत खाद्यांसह निरनिराळ्या विवाद्य विषयांचा

परामर्ष मिराशी, पेंडसे, बनहट्टी, बेहरे, नेने प्रभृति साहित्यसेवक यथाशक्ति घेत असतात. या अड्डयाशीं खाद्यांचा परामर्ष घेण्याच्या बाबतींत स्पर्धा करूं शकेल असा एक अड्डा शहरामध्यें श्रीमंत टालाटुले यांच्या वाड्यांत आहे. या अड्डयाची भूमिका इतकी कांहीं रुंद आहे कीं, त्याच्या ऐसपैस बैठकीवर श्री. रुईकर यांच्यासारख्या साम्यवादी पुढाऱ्यापासून तों एखाद्या सी.आय्.डी. इन्स्पेक्टरपर्यंत सर्व प्रकारचे लोक खेळीमेळीनें बोलूं बसूं शकतात. श्री. बापट यांच्या डॉ. केतकरांनीं वर्णिलेल्या हॉटेलांतहि खवय्या, गप्पिष्ट अशा प्रतिष्ठित लोकांचा फड नेहमीं पडलेला असतो. नागपुरास येणाऱ्या पाहुण्यानें जर या संस्था, व्यक्ति आणि अड्डे पाहिले नाहींत, तर त्याला या राकट पण दिलदार शहराच्या सार्वजनिक आयुष्याची ओळख होणें कठीण!

मला स्वतःला नागपूर हें अलीकडे अगदीं एका निराळयाच कारणामुळें विशेष लोभनीय वाटतें. तें कारण म्हणजे श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांचें येथील वास्तव्य हें होय. वार्द्धक्यामुळें तात्यासाहेब आतां पंगु झाले आहेत, त्यांच्या दृष्टीला ग्रहण लागलें आहे आणि स्मरणशक्तिहि आतां पूर्वींइतकी तत्पर-तेनें काम देत नाहीं. पण, त्यांच्या मनाचें वासंतिक यौवन मात्र अद्याप कायम असून, आपल्या एकनिष्ठ सुहृदांजवळ जुन्या आठवणींविषयीं बोलतांना ते नावीन्याचा रम्य आभास उत्पन्न करितात. शिवाय कृष्णपक्षांतला चंद्र हा जरी मध्यरात्र उलटून गेल्यावर उगवला, त्याच्या कला लुप्त झालेल्या असल्या आणि त्याचें तेज क्षीण होत चाललेलें असलें, तरी पौर्णिमेच्या रात्रीं उपभोगिलेल्या त्याच्या दिव्य सुषमेची स्मृति मनांत उत्कटतेनें जागृत असल्यामुळें आपल्याला तो आदरणीय वाटत नाहीं काय? म्हणून शेवटीं त्यांचें कृतज्ञतापूर्वक स्मरण करून त्यांच्या कृपेनेंच लालित्याचा थोडाबहुत संस्कार घडलेली ही लेखणी खालीं ठेवतों.

वसुंधरा, ता. १० ऑक्टोबर १९३१

## संशयात्मा : : १२

बायबलांतील अडॅमच्या अधःपाताची कथा प्रसिद्धच आहे. अडॅम आणि ईव्ह या मानवजातीच्या आद्य मातापितरांना परमेश्वरानें एडनच्या नंदनवनांत ठेविलें होतें. या उद्यानाच्या मध्यभागीं असलेल्या 'जीवितवृक्ष' ( Tree of life ) व 'ज्ञानवृक्ष' ( Tree of knowledge of good and evil ) या दोन वृक्षांखेरीज इतर कोणत्याहि झाडाचें फळ खाण्याची त्यांना मुभा होती. मात्र 'ज्ञानवृक्षाला तूं जरी नुसता स्पर्श केलास, तरीसुद्धां तुला मृत्यु येईल,' असा धाक परमेश्वरानें अडॅमला घातला होता. तथापि, सर्पानें बुद्धिभेद केल्यामुळें, ईव्ह आणि अडॅम यांनीं या त्याच्या आज्ञेचें उल्लंघन करून, ज्ञानवृक्षाचें फळ भक्षण केलें. तेव्हां परमेश्वरानें संतप्त होऊन सर्प, ईव्ह आणि अडॅम या तिघांनाहि शाप दिले; व अडॅमला आतां ज्ञान झालें असल्यामुळें तो जर यापुढें बागेंत राहिला, तर उद्यां कदाचित् जीवितवृक्षाचेंहि फळ खाऊन अमर होईल, या भीतीनें परमेश्वरानें त्याची पृथ्वीवर रवानगी करून त्याच्या हातीं नांगर दिला. या कथेचा अर्थ काय ? मनुष्यानें ज्ञानवृक्षाचें फळ कधींच खाऊं नये अशी परमेश्वराची इच्छा कां असावी ? आपल्याप्रमाणें

मनुष्यानेंहि अमर होऊं नये, म्हणून परमेश्वरानें फक्त जीवितवृक्षाचेंच फळ खाण्याची जरी त्याला मनाई केली असती, तरी त्यांत फारसें गैर नव्हतें. कारण ज्यानें ही अखिल सृष्टि निर्माण केली अशी भाविक लोकांची श्रद्धा आहे, त्यानें खास आपल्याकरितां म्हणून एखादा तरी अद्वितीय हक्क राखून ठेवावा, यांत कांहीं अस्वाभाविक नाहीं. फार तर, मानवी व्यवहाराप्रमाणें परमेश्वराच्या दैवी व्यवहारांतहि स्वार्थ हाच प्रभावी असतो, असा आरोप कांहीं नास्तिकांनीं केला असता; पण मनुष्यानें निरंतर अज्ञानांतच नांदावें, अशी तजवीज करण्यांत परमेश्वराचा हेतु काय असावा?

हा त्याचा हेतु जर खरोखरी सिद्धीस गेला असता, तर मनुष्याची अवस्था आज काय असती याची कल्पना करणें कठीण नाहीं. गांधीजींचे आवडते अमेरिकन ग्रंथकार थोरो यांनीं आपल्या 'वॉल्डन' (Walden) या उत्कृष्ट ग्रंथांत एका निग्रोचें मोठें मनोहर स्वभावचित्र रेखाटलें आहे. हा निग्रो अतिशय सुशील, आज्ञाधारक आणि उद्योगी होता; पण, त्याच्या गुणांचा विकास व्हावयाला संधि न मिळाल्यामुळें, वयानें वाढूनसुद्धां त्याचें मन मूढ बालभावांतून बाहेर पडलें नव्हतें. या त्याच्या अस्वाभाविक बाल्यावस्थेचें वर्णन करतांना थोरो म्हणतात:—He had been instructed only in that innocent and ineffectual way in which the catholic priests teach the aborigines, by which the pupil is never educated to the degree of consciousness, but only to the degree of trust and reverence,—and child is not made a man, but kept a child सदसद्विवेकबुद्धि जागृत न होईल अशा बेतानें निग्रोला साक्षर करणाऱ्या कॅथोलिक मिशनरींहून परमेश्वराची मनोवृत्ति कांहीं निराळी दिसत नाहीं. जीवितवृक्षाचें फळ भक्षण केल्यानें मनुष्य फार तर अमर झाला असता; त्यामुळें परमेश्वराचें त्याच्यावर असलेलें अधिराज्य डळमळण्याची मुळींच धास्ती नव्हती. ज्ञानवृक्षाचें फळ खातांक्षणींच, त्याच्या ठिकाणीं चिकित्सक बुद्धीचा उदय होऊन, मग परमेश्वराच्या प्रत्येक कृत्याची छाननी त्यानें आरंभिली असती. आणि ही आपत्ति टाळण्याच्या उद्देशानेंच "ज्ञानवृक्षाचें फळ खाल्ल्याबरोबर तुला मरण येईल," असा धडधडीत खोटाच धाक परमेश्वरानें मनुष्याला घातला.

'धर्माची उभारणी अज्ञानाच्या पायावर झाली आहे,' असाच या बायबलांतील कथेचा अर्थ होत नाहीं काय ?

तथापि, या बाबतींत एकट्या ख्रिस्ती धर्मालाच दोष देऊन कसें चालेल ?

अज्ञश्चाश्रद्दधानश्च संशयात्मा विनश्यति ।

या भगवदुक्तीवर भाष्य करितांना शंकराचार्योंनीं असे उद्गार काढले आहेत कीं, "एक वेळ अज्ञ किंबहुना अश्रद्दधानहि पुरवला." "अज्ञाश्रद्दधानौ यद्यपि विनश्यतस्तथापि न तथा यथा संशयात्मा ।"— पण,–" संशयात्मा तु पापिष्ठः सर्वेषाम् "॥–" संशयात्मा हा सर्वांत पापी!" जगांतील सर्वच धर्म अंधश्रद्धेवर उभारलेले, अतएव अज्ञानमूलक आहेत. केवळ श्रद्धेनेंच ज्याचा साक्षात्कार होऊं शकतो, असा जर जगांत कोणता एकमेव विषय असेल, तर तो ईश्वर हा होय; व धर्म हा त्याच्या अस्तित्वाची साक्ष पटवून देणारा त्याचा इहलोकींचा दलाल आहे. मोक्षाच्या मार्गावरील हा वाटाड्या मुमुक्षूंना देवदर्शनाला नेतांना त्यांच्या डोळ्यांवर भोळ्या भावाचे पट्टे बांधावयाला चुकत नाहीं. त्यामुळें असें होतें कीं, साक्षात्कारी महंतांनाहि, ज्या वाटेनें त्यांनीं जाऊन परमेश्वर गांठलेला असतो, त्या वाटेच्या निश्चित खाणाखुणा इतरांना सांगतां येत नाहींत. अध्यात्मशास्त्राला जें निव्वळ शाब्दिक ज्ञानाचें स्वरूप आलें आहे, तें याच कारणानें. या शास्त्रांत श्रद्धेशिवाय गति नाहीं. म्हणून श्रद्धेला सर्वच धर्मांत येवढें महत्त्व आहे. श्रद्धेला सारासार विचार नसतो, असें नाहीं. पण आपला पति आंधळा आहे असें पाहतांच गांधारीनें जसें जाणूनबुजून अंधत्व पत्करलें, तसेंच धर्माच्या बाबतींत श्रद्धेचेंहि झालें आहे. परमेश्वराला निर्गुण, निर्विकार मानूनहि त्याच्यावर सदयत्वाचा आरोप करावयाचा आणि निर्वाणीच्या प्रसंगीं त्याला सांकडें घालावयाचें, असा चमत्कार श्रद्धेशिवाय कोण करूं शकेल ? श्रद्धेला ज्ञानदृष्टि नसती, तर जगांत इतके धर्म आणि धर्मपंथ पैदा होते ना. सृष्टींतील हरएक साकार वस्तूची पूजा करणाऱ्या श्रद्धेनें अखेर 'नेति' 'नेति' म्हणत परमेश्वराला निराकार अवस्थेप्रत आणून पोंचाविलें, यांत तिचा डोळसपणाच दिसून येत नाहीं काय ? धर्माचें अस्तित्व जर केवळ श्रद्धेवरच अवलंबून असतें, तर इतर अनेक लोकभ्रमांप्रमाणें धर्माचाहि कदाचित् लोप झाला असता.

परंतु धर्माचें अस्तित्व दृढमूल व्हावयाला श्रद्धेइतकाच स्वार्थहि कारण

झाला आहे. फ्रान्समधील राज्यक्रांतीच्या लाटेंत राजसत्तेबरोबर धर्मसत्तेचेंहि उच्चाटन झालें; व लोकांचा देवधर्मावरील विश्वास उडून समाजाला कांहीं धार्मिक बंधन म्हणून राहिलें नाहीं. पुढें नेपोलियनच्या हातीं राज्यसूत्रें आल्यावर, त्यानें रविवारीं प्रार्थना करण्यासाठीं देवळांत जाण्याची लोकांवर सक्ती केली. या आपल्या कृत्याचें समर्थन करितांना तो असें म्हणत असे कीं, " जगांत जर धर्म नसता, तर एका मनुष्यानें राजविलासांत लोळावें आणि दुसऱ्याला कदान्नहि खावयाला मिळूं नये, ही स्थिति लोकांनीं कशी सहन केली असती? परंतु, धर्म मनुष्याला असली सर्व प्रकारची विषमता संतोषानें सहन करावयाला शिकवितो!" पण धर्माची ही असामान्य उपयुक्तता सिद्ध करावयाला इतका दूरचा दाखला कशाला हवा? धर्माचा आधार जर नसता, तर उभ्या आयुष्यांत ज्यांना वेदाक्षर पढण्याचा योग येत नाहीं अशा ब्राह्मणांनीं केवळ जन्मामुळें लाधलेलें आपलें वर्णगुरुत्व इतर जातींवर कसें लादलें असतें? राजा हा विष्णूचा अंश आणि ब्राह्मण हे भूलोकचे देव ही भावना समाजाच्या बुद्धींत भिनवून हें ब्रह्मक्षत्रांच्या राजधार्मिक सत्तेचें दुहेरी जूं निमूट-पणें वाहण्याची शिकवण धर्मानें जनतेला दिली. राजसत्ता आणि धर्मसत्ता यांच्यांत एरवीं कितीहि वैर असलें, तरी बहुजनसमाजाच्या वाढत्या आकांक्षा दडपून टाकण्याच्या कामीं त्या एकमेकांना किती तत्परतेनें साहाय्य करतात, याचे मासले जगाच्या इतिहासांत हवे तितके सांपडतील. पोपशीं कोणत्याहि प्रकारचा राजकीय व्यवहार करूं नये असा पार्लमेंटचा कायदा असतांनासुद्धां पील-पामर्स्टनप्रभृति इंग्रज मुत्सद्द्यांनीं गुप्त रीतीनें पोपशीं संधान बांधून आयर्लंडांतील राष्ट्रीय चळवळीला धर्मगुरूंनीं मदत करूं नये, अशा अर्थाचें फर्मान त्याच्याकडून काढविलें. मानवी इतिहासांत धर्मानें आजपर्यंत केलेली ही कामगिरी लक्षांत घेतल्यावर त्याला अफीणीची उपमा देण्यांत बॉल्शेविकांनीं अन्याय केला असें कोण म्हणेल?

खरोखरी, भावनांची भूल देऊन प्राप्त परिस्थितींत मनुष्याला डांबून ठेवण्याची धर्माची करामत पाहिली, म्हणजे मनाला मोठें नवल वाटतें. त्या दृष्टीनें, 'धर्मः.........जगतः स्थितिकारणम्' ही आचार्यांनीं केलेली धर्माची व्याख्या निःसंशय अगदीं यथार्थ आहे! धर्म हा सत्याचा कैपक्षी आहे असें म्हणतात. पण, धर्माचें सर्व सामर्थ्य आजपर्यंत सत्याला, सत्यसंशोधनाला विरोध

करण्यांतच खर्च झालें आहे. असत्याचें अधिराज्य जगावर अबाधित ठेवण्यासाठीं धर्मसत्तेनें जितके प्रयत्न केले, तितके राजसत्तेनेंहि केले नाहींत. पृथ्वी अचल आहे किंवा 'कलावाद्यंतयोः स्थितिः' असले असत्य आदेश लोकांना देण्याचें धाडस धर्मगुरूंशिवाय कोण करूं शकला असता? भ्रामक कल्पना आणि उदात्त तत्त्वें यांची धर्मांत सरमिसळ झालेली आहे. पण, वाळूंत मिसळलेले सुवर्णकण वाळूंतून गाळून वेगळे काढल्यावर वाळू कोण हातांत धरील? शिवाय, मोत्याच्या संसर्गानें शिंपला कितीहि चकाकला, तरी शिंपला म्हणजे कांहीं मोती नव्हे. मानवी बुद्धि जर जात्याच संशयी नसती, तर स्वतःला जखडणारे धर्मांचे पाश तोडण्याचें साहस तिनें कधींच केलें नसतें. संशय हा धर्माचा किंबहुना सर्व रूढ कल्पनांचा कट्टा शत्रु आहे. आणि, 'संशयात्मा तु पापिष्ठः सर्वेषाम्' असे जे उद्गार आचार्यांनीं संशयात्म्याविषयीं काढले आहेत ते याच कारणामुळें. 'न बुद्धिभेदं जनयेत्' ही धर्माची, धर्मप्रवर्तकांची आज्ञा; तर, जनतेचा बुद्धिभेद करणें, हें संशयाचें, संशयात्म्याचें कार्य. संशयानें जर बुद्धिभेद केला नसता, तर एका धर्मांतून अनेक धर्मांचा विकास आणि अनेक देवांचा एका देवांत विलय कसा झाला असता? मनुष्याला जें थोडेंबहुत स्वातंत्र्य आज उपभोगावयाला मिळत आहे, त्याचें श्रेय संशयालाच दिलें पाहिजे. जगाची धारणा श्रद्धेनें होत असेल कदाचित्; पण त्याच्या प्रगतीला मात्र संशयच कारण होतो, यांत शंका नाहीं.

संशय (Scepticism) हा सत्याचा निकष आहे. संशयाच्या कसोटीला जें उतरलें नाहीं, चिकित्सेच्या अग्निदिव्यांतून जें तावून सुलाखून बाहेर पडलें नाहीं, त्याचा सत्य म्हणून स्वीकार करणें अनिष्ट आहे. बहुजनसमाज हा बुद्धिमंतांचा दास असतो. प्रत्येक मनुष्य जसा स्वतःपुरतें द्रव्य मिळवितो, तसेंच स्वतःकरितां विचार करण्याचें सामर्थ्य जर त्याच्या अंगीं असतें, तर बहुजनसमाजाच्या कपाळीं हें बौद्धिक दास्य कायमचें लागले नसतें. पण, प्रपंचांतील वाढत्या गरजांनीं गांजलेल्या सामान्य मनुष्याला आधीं विचार करावयाला वेळ मिळत नाहीं; व यदाकदाचित् वेळ मिळाला, तरी कर्तव्याकर्तव्याचा बोध व्हावयाला जो मनाचा मार्मिकपणा अवश्य असतो, तोहि त्याच्या ठिकाणीं अनेक कारणांमुळें नसतो. त्यामुळें आजपर्यंत अनेक लोकातिग बुद्धीच्या व्यक्तींनीं बहुजनसमाजावर आपलें प्रभुत्व प्रस्थापित केलें आहे. धर्म,

नीति, तत्त्वज्ञान, राजकारण या सर्वच बाबतींत मनुष्य कोणाचा ना कोणाचा तरी ऋणी किंवा दास असतो. मनुष्य जर निव्वळ श्रद्धाळूच असता, तर या दास्यांतून मुक्त होण्याची त्याला आशाच नव्हती. पण तो जसा सश्रद्ध, तसाच संशयीहि आहे. ज्या परंपरेंत आपण वाढलों तिचें परीक्षण, पृथक्करण करण्याची इच्छा त्याला केव्हां ना केव्हां तरी होते. या इच्छेंत, या संशयी वृत्तींतच मानवजातीच्या प्रगतीचें बीज आहे. तेव्हां एखाद्या तत्त्वाविषयीं किंवा संप्रदायाविषयीं जर मनाला कांहीं संशय वाटत असेल, तर तो स्पष्ट बोलून दाखविण्यांत स्वतःची किंवा समाजाची यत्किंचित्‌हि हानि नाहीं. आंधळ्या अगर दांभिक श्रद्धेपेक्षां संशय शतपट बरा.

There lives more faith in honest doubt,
Believe me, than in half the creeds.

या टेनिसनच्या उद्गारांचें मर्म झालें तरी हेंच होय. आणि म्हणून लोकांच्या नैतिक व सामाजिक कल्पनांची नित्य चिकित्सा होणें अवश्य आहे. वापरून जुनीं झालेलीं नाणीं मुशींत घालून जशीं नवीं पाडावीं लागतात, तसेंच समाजांत रूढ असलेल्या कल्पनांचेंहि आहे. सृष्टींतील इतर सर्व वस्तूं-प्रमाणें मानवी कल्पनासुद्धां विनाशी आणि चलनशील आहेत. धर्माधर्माच्या, नीती-अनीतीच्या, कर्तव्याकर्तव्याच्या कल्पनांत कालमानाप्रमाणें बदल होणें इष्ट असतें. पण, सामान्य लोकांची श्रद्धा आणि सत्ताधारी वर्गाचा स्वार्थ यांच्यामुळें हें इष्ट असलेलें परिवर्तन सहसा सुखानें घडून येत नाहीं. रूढींच्या पायल्यावरच ज्यांची प्रतिष्ठा आणि प्रभुत्व अवलंबून असतें, ते सत्ताधारी वर्ग त्यांच्यावर शस्त्र उपसलेलें कसें सहन करतील? वस्तुतः, परिस्थितीप्रमाणें मनुष्याच्या विचारांत थोडा तरी फरक नेहमीं होतच असतो; व एकंदर समाजाच्या कल्पनांवरहि त्याचा परिणाम झाल्याशिवाय राहत नाहीं. नदीच्या प्रवाहांतील पाषाण जसे रोज थोडेथोडे झिजत असतात, तसा कालाच्या ओघांत सांपडलेल्या रूढींच्या स्वरूपांतहि सदैव सूक्ष्म बदल होत असतो. पृथ्वीच्या परिभ्रमणाप्रमाणें समाजांतील या परिवर्तनाची आपल्याला जाणीव नसते, इतकेंच. अशा स्थितींत नीती-अनीतीच्या, धर्माधर्माच्या, कर्तव्याकर्तव्या-च्या कल्पनांचा वृथा अभिमान वाहण्यांत काय अर्थ? जीं उदात्त नीतितत्त्वें आपण अचल आहेत असें समजतों, त्यांचा समाजाच्या रोजच्या व्यवहाराशीं

साक्षात् संबंध कांहींच नसतो. हिमागिरीचीं उत्तुंग शिखरें ज्याप्रमाणें पृथ्वीची अत्यंत उन्नत अवस्था दाखवितात, त्याप्रमाणें सत्य, अहिंसा, अस्तेय हीं तत्त्वें मानवी कल्पनेच्या अतीव उदात्ततेची साक्ष देतात. याहून त्यांचा व्यवहारांत अधिक उपयोग होत असलेला निदान आज तरी अनुभवाला येत नाहीं. तेव्हां या तत्त्वांवर समाजाचा व्यवहार अधिष्ठित झाला आहे असें म्हणणें, हें पर्वत पृथ्वीची धारणा करतात या पौराणिक सिद्धान्तावर विश्वास ठेवण्यासारखें केवळ भाविकपणाचेंच नाहीं काय?

उलट, असत्य, हिंसा आणि स्तेय या तत्त्वांवरच सारा मानवी व्यवहार सध्यां चालला आहे असें जर कोणी म्हटलें, तर त्याचें खंडन करणें अशक्य होईल. जित आणि जेते, स्त्री आणि पुरुष, मजूर आणि मालक, शूद्र आणि द्विज यांचे संबंध कोणत्या तत्त्वांवर अधिष्ठित झाले आहेत ? जगाचा सारा आर्थिक व्यवहार असत्यावर उभारलेला, तर सर्व राजकारण हिंसा आणि स्तेय यांनीं व्यापलेलें आहे. असत्याला मुत्सद्दीपणा, हिंसेला दिग्विजय आणि स्तेयाला नफा अशीं सोज्ज्वळ नांवें दिलीं म्हणजे त्यांच्या पापमय स्वरूपावर पुण्याची झिलई चढते, असें थोडेंच आहे ? जितांच्या जीवित-वित्ताची पुरी लूट झाल्याशिवाय जेत्यांच्या साम्राज्याची सजावट पूर्ण होत नाहीं. बर्नार्ड शॉ याच्या एका नाटकांत एक मजूर आणि एक लक्षाधीश कारखानदार यांच्यामध्यें झालेला संवाद दिला आहे. "दारिद्र्यामध्यें अभिमान वाहण्यासारखें कांहीं नाहीं," असे उद्‌गार लक्षाधीशाच्या तोंडून बाहेर पडतांच, तो मजूर त्याला एकदम उसळून म्हणाला, "तुमच्याकरितां हे लाखो रुपये कोणी पैदा केले?— माझ्यासारख्या दरिद्र्यांनीं ! ज्यामुळें आम्ही गरीब राहिलों, त्यामुळेंच तुम्ही गब्बर होऊन बसला आहांत!" त्या मजुराच्या या उत्तरांत जगांतील आर्थिक उलाढालींचें रहस्य सांठविलेलें आहे. ज्यांना आपण दानशूर म्हणतों, त्यांची अवाढव्य संपत्ति, त्यांचें उतास आलेलें ऐश्वर्य कोण निर्माण करतो ? कष्टाळू गरीबांच्या हाडांचें खत मिळाल्याखेरीज ऐदी श्रीमंतांच्या नफ्याचें उमाप पीक निघत नाहीं. गरिबांचीं हाडें जेव्हां बेसुमार झिजतात, तेव्हांच धंद्याच्या शरीरावर नफ्याची सूज चढते. पण लक्षाधीशांनीं बांधलेलीं देवालयें, रुग्णालयें आणि अनाथालयें पाहतांना, त्यांच्या खाणींत, गिरण्यांत, कारखान्यांत उभ्या-ओणव्यानें राबणाऱ्या गरीबाचें जीवित किती

दुर्वह असतें, हें आपल्या लक्षांत येत नाहीं. नदीचा ओघ अडवून बांधलेल्या धरणाचा भरपूर फायदा घेतल्यानंतर वाहून वायां चाललेल्या पाण्याचा शेती-करितां उपयोग करण्याची सवलत शेतकऱ्यांना देण्यांत जें औदार्य दिसून येतें, त्यांत आणि भांडवलवाल्यांच्या दानशौर्यांत कांहीं फरक नाहीं. समुद्राच्या एका अंगाला ओहोट लागून तें अगदीं उघडें पडल्याविना दुसऱ्या अंगाला भरतीचें उधान शीग भरून सांडत नाहीं. हाच न्याय राष्ट्रांच्या आणि व्यक्तींच्याहि उत्कर्षाला लागू आहे.

पण, समाजाच्या एकंदर आचरणांत अनीति इतकी मुरलेली आहे कीं, सत्य, अहिंसा आणि अस्तेय या अखिल मानवजातीनें शिरोधार्य मानलेल्या नीतितत्त्वांची आपण पदोपदीं पायमल्ली करीत आहों, याची लोकांना मुळीं जाणीवच नसते. समाजाला शिक्षण देण्यासाठीं म्हणून निघालेल्या वर्तमान-पत्रांच्या कचेऱ्या या तर सत्याचे केवळ कत्तलखानेच आहेत. कवितेंत अश्लील कल्पना आली अथवा कादंबरींत शृंगारिक वर्णन आलें कीं, नीतीचा उच्छेद होण्याच्या भीतीनें ज्यांच्या काळजाचा ठाव सुटतो, त्या कांगावखोरांचीं कलमें सदा परनिंदेच्या पंकांत कां निमग्न झालेलीं असतात? परंतु, स्त्री-पुरुषसंबंधांतच सारी नीति भरलेली आहे असें ज्यांना वाटतें, त्या वाङ्मयलवदुर्विदग्धांकडून मनाच्या किंवा मतांच्या औदार्याची अपेक्षा करण्यांत काय अर्थ? आपण ज्याला अश्लील किंवा अनैतिक समजतों, तें खरोखरीच तसें आहे कीं नाहीं, याचा विचार समाजांतील निदान समंजस व्यक्तींनीं तरी करावयाला नको काय? शास्त्रज्ञांच्या परिश्रमामुळें आज नित्य नवे शोध लागत असून, भौतिक सृष्टी-प्रमाणें मानससृष्टींतहि परिवर्तन घडून आलें आहे; व त्या दृष्टीनें व्यभिचार, दुराचार किंवा इतरहि दुर्गुण यांची चर्चा आणि चिकित्सा यापुढें झाली पाहिजे. समाजशास्त्र, मानसशास्त्र, लिंगशास्त्र (Sexual Science) इत्यादि शास्त्रांतील नवीन शोधांना अनुसरून समाजाच्या एकंदर नैतिक कल्पनांतहि बदल होणें अवश्य आहे. हजारों वर्षांपूर्वी निर्माण झालेल्या जीर्ण नीतिशास्त्राचे जुलमी दंडक आजच्या नवघटित किंबहुना अद्याप घडण्याच्या अवस्थेंत असलेल्या समाजाला लावणें कसें योग्य होईल? टीकाकार हे जोंपर्यंत न्यायाधीशाच्या भूमिकेवर आरूढ होऊन टीका करीत आहेत, तोंपर्यंत त्यांच्या-कडून नवीन कल्पनांचा सत्कार होण्याचीच काय, पण त्यांना न्याय मिळण्या-

चीहि आशा नको. कारण, त्यांचें काम बोलूनचालून रूढ नियम पाहून निवाडा देण्याचें. त्यामुळें 'सुदाम्याच्या पोह्यां'पासून तो सुनीतांपर्यंत वाङ्मयांतील सर्वच अभिनव प्रकार त्यांच्या दृष्टीनें आजपर्यंत त्याज्य ठरत आले आहेत. टीकाकारांच्या फूत्कारांनीं जर नवीन कल्पनांची स्फूर्ति जळून जाण्याची शक्यता असती, तर मानवी समाज यापूर्वीच दशदवस्थेला पोंचला असता.

पण, मनुष्य सदा अज्ञानांत आणि अंधश्रद्धेंतच खितपत राहावा, असा दैवी संकेत नव्हता. 'अज्ञान हाच स्वर्ग—Ignorance is bliss' असें जें म्हणतात, तें कांहीं खोटें नव्हे. कारण, ज्ञानी मनुष्याला विचारांच्या वेदना, संशयाचा संताप सदैव भोगावा लागतो. त्याचा आनंद हा शिकारी मनुष्याच्या आनंदाप्रमाणें असतो. सावजाचा पाठलाग करतांना होणाऱ्या श्रमांत शिकारी जें सुख अनुभवितो, तें सुख त्याला सत्याच्या शोधनाकरितां लागलेल्या तळमळींत लाभतें. परंतु अज्ञानाच्या स्वर्गांत निस्सार, निर्हेतुक, निरानंद जीवित कंठण्यापेक्षां मृत्युलोकीचें कष्टमय पण जाणीवेचें जिणें पत्करलें असें खुद्द शापभ्रष्ट अडॅमसुद्धां आज अवनीतलावर पुन्हा अवतरला तर कबूल करील. ज्ञान हें विषहि आहे आणि अमृतहि आहे. रूढ विचारांची री ओढण्यावरच ज्यांचें वर्चस्व अवलंबून असतें, त्यांना ज्ञान हें विषतुल्य वाटावें यांत नवल कसलें? सॉक्रेटिसचा ज्यांनीं विष घालून वध केला, त्यांना ज्ञान विषासमानच वाटलें होतें. बहुजनसमाज हा जात्याच भाविक असल्यामुळें त्याच्या आवडत्या भावनांवर आघात होतांच त्याला साहजिकच चीड येते. त्यामुळें संशयात्मा— समाजाचा बुद्धिभेद करणारा विचारप्रवर्तक हा लौकिक दृष्टीनें निंद्य ठरतो. तो पापिष्ठ,–म्हणून त्याला परलोक तर नाहींच, पण इहलोकहि नाहीं!–'नायं लोकोऽस्ति न परो न सुखं संशयात्मनः'–हीच त्याची नियति. ज्ञान पूर्ण नाहीं,–त्याची प्रगति सतत होत असते, याची थोडी तरी जाणीव जर समाजाला असती, तर संशयात्म्याचें जीवित इतकें दुर्धर झालें नसतें. 'माझा अवतार शास्त्रांचा नाश करण्याकरितां नाहीं, तीं पूर्ण करण्यासाठीं मी आलों आहे,' या ख्रिस्ताच्या उक्तीचें मर्म कळण्याइतका मनाचा उदारपणा जर यहुदी धर्मगुरूंच्या ठिकाणीं असता, तर त्याला गुन्हेगाराचें मरण कां आलें असतें? पण प्रत्येक नव-

धर्माचा संस्थापक हा जीर्णधर्मियांच्या दृष्टीनें संशयात्माच असतो. Every step of progress means a duty repudiated, and scripture torn up. And every reformer is denounced accordingly हे बर्नार्ड शॉचे उद्गार अगदीं यथार्थ आहेत. इस्टेट करणें, वाजवीपेक्षां फाजील संपत्तीचा स्वतःसाठीं संचय करणें, ही चोरी आहे, ( Property is theft ) हें तत्त्व फ्रेंच समाजसत्तावादी प्रुधाँ यानें प्रथम जेव्हां प्रतिपादन केलें, तेव्हां समाजांतील सर्व सधन लोकांच्या अंगाची अगदीं लाही उडाली; व तो बेजबाबदार, बंडखोर, बेवकूब ठरला! पण, आज इंग्लंडसारख्या साम्राज्यवादी राष्ट्रांतहि देशांतील सर्व कारखाने राष्ट्राच्या मालकीचे करण्याची भाषा खुद्द हुजूरपक्षच बोलत आहे. तेव्हां, संशयात्म्याचा विनाश झाल्याशिवाय तत्त्वज्ञानाचा विकास होत नाहीं, हेंच खरें. " संशयात्मा विनश्यति–" ही भगवंताची शापवाणी तरी खोटी कशी होईल !

मनोरंजन, नोव्हेंबर १९२६

---

## मेघदूतांतील कलाविलास : : १३

कविकुलगुरु कालिदास याच्या सर्व कृतींत त्याचें मेघदूत हें काव्य श्रेष्ठ मानलें जातें. याचें मुख्य कारण असें कीं, त्याच्या इतर कोणत्याहि ग्रंथांपेक्षां मेघदूतांत त्याचा कलाविलास अधिक सुंदरतेनें प्रत्ययाला येतो. वस्तुतः मेघदूत हें लघुकाव्य असल्यामुळें त्यांत रघुवंशांतली विविधता किंवा शाकुंतलांतलें शिल्प हीं दोन्ही आढळत नाहींत. किंबहुना शृंगाराचें मार्दव आणि भावनांची शुचिता या दोन्ही बाबतींत शाकुंतल हें मेघदूतापेक्षां सरस ठरेल. कलेच्या प्रमाणबद्ध विकासाला अत्यंत अवश्य असलेला संयम कालिदासानें त्या नाटकांत इतक्या निग्रहानें पाळलेला आहे कीं, लतागृहांतील मीलनाच्या वेळीं चुंबन स्वाभाविक ठरण्यासारखें असतांनासुद्धां तो प्रसंग त्यानें शकुंतलेकडून टाळवला; व तिच्या सासरीं जाण्याच्या वेळीं कण्वाच्या डोळ्यांत सहजच उभे राहिलेले अश्रु त्यानें त्या महर्षीला आवरावयाला लावले. शाकुंतलाचें सारें रम्यत्व त्याच्या मनोज्ञ व्यंजनेंत, त्यांत पावलोपावलीं व्यक्त झालेल्या कलापूर्ण संयमांत आहे. जे प्रसंग रेखाटतांना इतर कवींनीं बहुधा रंगांचे बुधले ओतले असते, त्यांची रमणीयता कालिदासानें त्यांत फक्त ओझरत्या छटांनीं सूचित केली आहे. पण शाकुंतलांत संयत असलेली त्याची प्रतिभा मेघदूतांत मोकाट सुटल्यासारखी वाटते; व म्हणूनच कदाचित् तें काव्य इतकें मोहक वाटत

असेल. गवयानें मैफलींत बैठक मारून म्हटलेल्या शास्त्रशुद्ध चिजांपेक्षां पहाटेच्या वेळीं त्यानें सहजस्फूर्तीनें घेतलेले आलापच अधिक सुरेल वाटत नाहींत काय ?

शाकुंतलाचें सौंदर्य हें जसें त्यांतील संयमांत आहे, तसें मेघदूताचें सौंदर्य त्यांतील स्वैरतेंत आहे. या स्वैरतेला प्रारंभ त्याच्या कथानकापासूनच होतो. कालिदासाचें ऋतु संहार हें काव्य सोडलें, तर त्याच्या इतर कृतींचीं कथानकें पुराणांतून किंवा इतिहासांतून घेतलेलीं आहेत; पण मेघदूताला जें थोडेंसें कथानक आहे असें म्हणतां येईल, तें मात्र सर्वथैव स्वतंत्र दिसतें. मल्लिनाथानें आपल्या टीकेंत असें म्हटलें आहे कीं, "सीतां प्रति रामस्य हनूमत्संदेशं मनसि निधाय मेघसंदेशं कविः कृतवानित्याहुः।" आणि या किंवदंतीला आधार काय? तर 'इत्याख्याते पवनतनयं मैथिलीवोन्मुखी सा' हा मेघदूतांतील उल्लेख. परंतु, वर्णनाच्या ओघांत पूर्वीच्या समर्पक प्रसंगांचे दाखले देऊन रसिकांच्या मनांत सदृश भावनांच्या स्मृति जागृत करण्याची कलिदासाची जी रमणीय शैली आहे, तिचेंच हें एक उदाहरण म्हणून सांगतां येईल. पण म्हणून कांहीं कालिदासाला त्यावरून मेघदूत रचण्याची कल्पना सुचली, असें म्हणणें योग्य होणार नाहीं. सीतेनें हनुमंताबरोबर रामचंद्राला पाठविलेल्या संदेशापेक्षांहि दमयंतीनें हंसाबरोबर नलराजाला पाठविलेला संदेश हा कालिदासाच्या शृंगारलोलुप प्रतिभेला एका परीनें अधिक आकर्षक वाटावा, असा आहे. तेव्हां पुराणांतील एकाच विशिष्ट प्रसंगावरून मेघाच्या दौत्याची कल्पना कालिदासाला सुचली, असें म्हणणें धाडसाचें होईल. शिवाय, हनुमत्संदेशांतील कथाबीजाचा मेघदूतांत सर्वच दृष्टींनीं विपर्यय झालेला आहे. रामायणांतील प्रसंग जितका गांभीर्यप्रधान तितकाच मेघदूतांतील शृंगारात्मक असून, त्यांतील अनुमित साम्यापेक्षां मेघदूतांतील त्याच्या विस्तारांतलें वैसादृश्यच मनावर अधिक तीव्रतेनें चिंबतें. किंवा, बीज ज्या भूमींत पडतें, तिचे संस्कार घेऊन तें विकसतें, तसाहि प्रकार कदाचित् या बाबतींत घडला असेल. रामायणांतील करुणगंभीर कल्पना कालिदासाच्या प्रतिभेनें आत्मसात् केल्यावर तिच्या अंगप्रत्यंगांवर शृंगाराचे पुलक फुलून बहरावे, हें स्वाभाविकच आहे.

मेघदूताच्या रचनेविषयीं आणखीहि एक अनुमान आहे. ते असें कीं, कालिदासावर त्याच्या आश्रयदात्या नृपतीची अवकृपा झाल्यामुळें तो विजन-

वासांत असतांना त्यानें आपलें एकंदर वियोगदुःख प्रकट करण्यासाठीं हें काव्य लिहिलें आहे. मेघदूताचा एक टीकाकार वल्लभ यानें ही कल्पना प्रथम सूचित केली. पण तिच्या ग्राह्याग्राह्यतेबद्दल विद्वानांत पुष्कळच मतभेद आहे. प्रो. मिराशी यांना ती इतक्याचपुरती मान्य आहे कीं, कांहीं राजकारणास्तव विदर्भात राहत असतांना हें काव्य कालिदासानें लिहिलें असावें. अर्थात् या त्यांच्या मतांत वियोग गृहीत आहे; पण तो भर्तृशापजन्य मात्र नव्हे. परंतु, या त्यांच्या मतापेक्षां, राजाची अवकृपा व तज्जन्य स्त्रीवियोग वर्णन करण्यासाठींच कालिदासानें मेघदूत लिहिलें असावें, ही वल्लभप्रभृति टीकाकारांची कल्पनाच अधिक ग्राह्य वाटते. याचें मुख्य कारण असें कीं, विधिघटनेनें देशोधडीला लागलेल्या माणसानें ज्या प्रकारच्या आतुरतेनें आणि आर्ततेनें आपल्या आवडत्या स्थलांचें आणि व्यक्तींचें वर्णन करीत सुटावें, त्या प्रकारचें मेघदूतांतील सारें स्थलवर्णन किंवा व्यक्तिवर्णन आहे. त्यांतली ही आर्तता इतकी उत्कट आहे कीं, मेघदूत हें काव्य नसून, प्रियजनाच्या चिंतनांत विरहाचे दिवस मोजीत असलेल्या दूरसंस्थ व्यक्तीचें तें मंद आक्रंदन आहे असें म्हटलें तरी शोभेल. 'कंठाश्लेषप्रणयिनि जने किं पुनर्दूरसंस्थे' या तिसऱ्या श्लोकांतील शेवटच्या चरणापासून तों 'मा भूदेवं क्षणमपि च ते विद्युता विप्रयोगः' या शेवटच्या श्लोकांतील अखेरच्या चरणापर्यंत साऱ्या मेघदूतांतून स्त्रीवियोगाची एकच एक कल्पना इतक्या उत्कटतेनें अनुस्यूत झालेली आहे कीं, त्यांत कवीच्या स्वतःच्या मनोवेदनांचा प्रतिध्वनि उमटलेला नाहीं, असें मानणें अगर म्हणणें कठीण वाटतें. कोणी कदाचित् असें म्हणेल कीं, कालिदासाला जर स्त्री-विरहानें इतकें दुःसह दुःख झालें होतें, तर त्यानें मेघदूतांतून तें अशा आडपडद्यानें सूचित करण्यापेक्षां सरळसरळ कां व्यक्त केलें नाहीं? पण स्वतःचें वैयक्तिक दुःख चव्हाट्यावर जाऊन गागावण्याची अलीकडील भाव-कवींची पद्धत कालिदासाला अभिमत नव्हती, असें वाटतें. कारण रघुवंशाच्या आठव्या सर्गात इंदुमतीच्या मरणानें विव्हळ झालेल्या अजाला वसिष्ठगुरूंकडून आलेल्या निरोपांत असें म्हटलेलें आहे कीं, "न पृथग्जनवच्छुचो वशं वशिनामुत्तम गतुमर्हसि।" अर्थात्, स्वतःच्या त्या मानानें एकंदरींत मर्यादित दुःखाचा उघडउघड डांगोरा पिटणें जर त्या मानधन कवीला अप्रशस्त वाटलें असलें, तर त्यांत काय आश्चर्य?

हें त्याचें दुःख मेघदूताच्या रूपानें प्रकट झालें. कलाप्रेमी व्यक्तींचा भावाविष्कार कितीहि उत्कट असला, तरी तो कलापूर्णच असतो. शहाजहानानें आपल्या पत्नीच्या स्मरणार्थ ताजमहाल बांधला व टेनिसन्नें आपल्या मित्राच्या स्मरणार्थ 'इन मेमोरियम्' लिहिलें. दोन्हीहि कलाकृतीच; एक शब्दबद्ध आणि दुसरी शिलाबद्ध एवढाच काय तो फरक. 'लओकून'च्या पुतळ्याविषयीं लिहितांना जर्मन टीकाकार लेसिंग यानें असें म्हटलें आहे कीं, "सुसंस्कृतता आणि औचित्यबुद्धि हीं आपल्याला धाय मोकलूं देत नाहींत. ( Politeness and propriety will not permit us to cry or weep.)" तें कांहीं खोटें नव्हे. पण सुसंस्कृत कलावंताचा आवरलेला दुःखोद्रेक हा इतका रमणीयतेनें प्रकट होतो कीं, जगानें त्याच्या सौंदर्याचे नवनवोन्मेष पाहून सदैव कौतुकच करावें. तसाच प्रकार मेघदूताचा झाला आहे. कालिदासानें आपल्या वैयक्तिक दुःखाला त्यांत इतकें विशाल आणि स्वर्गीय स्वरूप दिलें आहे कीं, केवळ त्यांतील आर्ततेमुळेंच त्याची व्यक्तिगतता आपल्याला भासमान होते. कालिदासाच्या प्रतिभेचा ओढा पार्थिवापेक्षां स्वर्गीयाकडे अधिक असला, तरी त्याच्या इतर कृतींतून पार्थिव आणि स्वर्गीय यांचा मेळ मोठ्या सफाईनें घातलेला आहे. पण मेघदूतांत मात्र त्यानें पार्थिवाला यत्किंचितहि थारा दिलेला नाहीं. काव्याचा नायक देवयोनींतील यक्ष; त्याचें राहण्याचें ठिकाण कुबेराची राजधानी अलका; व त्याचा संदेशहर 'धूमज्योतिःसलिलमरुतां सन्निपातः' असा मेघ. स्वतःचें दुःख इतक्या अतिमानुष भूमिकेवरून वर्णन केल्यावर त्याला वैयक्तिकतेचा वास कसा यावा ? पण मेघाला रस्त्याच्या खाणाखुणा सांगावयाला यक्षानें सुरुवात केल्याबरोबर दुसऱ्याच श्लोकापासून कवीचें हृद्गत हळूहळू त्याच्या मुखानें व्यक्त होऊं लागतें. त्या श्लोकांतील 'निचुल' आणि 'दिङ्नाग' यांच्यावरील श्लेषांच्या रूपानें कविकुलगुरूनें आपला मित्र आणि प्रतिपक्षी यांच्याविषयींची भावना सूचित केली; व त्यानंतर थोड्याशा रस्त्याची माहिती सांगून होतांच, अठ्ठाविसाव्या श्लोकांत त्यानें, 'वक्रःपंथा यदपि भवतः' असें म्हणत म्हणत, मुद्दाम वांकडी वाट करून मेघाला उज्जयिनीवरून जाण्याची विनंति केली आहे. ज्या विरहातुर मनुष्याला आपला निरोप लवकर पोंचविण्याची निकड आहे, तो संदेशवाहकाला मुद्दाम लांबच्या वाटेनें जावयाला

कधीं तरी सांगेल काय ? पण दूरसंस्थ कालिदासाला आपल्या आवडत्या स्थळांचें वर्णन करावयाचें होतें, म्हणूनच त्यानें मेघाला ही वांकडी वाट बुद्धिपुरःसर दाखविली. अशा रीतीनें आपलें व्यक्तित्व मुद्दाम दडवून ठेवून तो काव्य लिहावयाला बसला असतांनाहि त्याच्या उचंबळून आलेल्या भावनांनीं त्याच्या व्यक्तित्वाच्या छटा त्यांत मधूनमधून विशद केल्या आहेत.

कालिदासाच्या प्रत्येक कृतींतून कांहीं ना कांहीं तरी तत्त्वबोध निघतो; व त्यांच्या निर्माणांत त्याचा कांहीं ना कांहीं तरी हेतु असावा, असेंहि वाटतें. परंतु मेघदूताच्या रचनेचा मात्र कांहीं हेतु सांगतां येत नाहीं; व त्यांतून बोध तर कांहींच निष्पन्न होऊं शकत नाहीं. उत्कृष्ट साहित्यकृतींतून कांहीं ना कांहीं तरी नीतिबोध हा निघालाच पाहिजे, असें आग्रहानें म्हणणाऱ्या नीतिवाद्यां-ना मेघदूत हें बिनतोड उत्तर आहे. त्यांतून कोणत्याहि प्रकारचा बोध निघूं शकत नाहीं. पण ज्याचें परिशीलन मनाला अनिर्वचनीय आनंद देऊं शकतें, असें काव्य जर जगांत कोणतें असेल, तर तें फक्त मेघदूत. नीतिवाद्यांनाच केवळ नव्हे, तर वस्तुवाद्यांनाहि (Realist) हें काव्य निराशाजनक वाटेल. कारण, त्यांत वास्तवाला कुठेंच फारसा थारा मिळालेला नाहीं; इथूनतिथून साऱ्या कल्पनेच्याच भराऱ्या आहेत. अर्थात् अशा तऱ्हेचें हें अगदीं अपार्थिव आणि अगदीं अवैयक्तिक काव्य लिहिण्यांत कालिदासाचा उद्देश केवळ स्वतःचें गूढ दुःख अन्योक्तीनें व्यक्त करण्याचा असावा, असें म्हणणें चुकीचें होईल काय ? सुप्रसिद्ध नीतिवादी टीकाकार कै. बा. अ. भिडे यांनीं आपल्या ताजमहालावरील कवितेंत असें म्हटलेलें आहे कीं, कोणालाहि रहावयाला निरुपयोगी अशा या इमारतीवर क्रोडों रुपये खर्च करून शहाजहानानें काय मिळविलें ? त्याचप्रमाणें मेघदूताविषयींहि असें विचारतां येईल कीं, कल्पनेच्या भराऱ्या व शृंगाराचा अतिरेक यांनीं परिपूर्ण असें हें बोधशून्य काव्य लिहून कालिदासानें काय मिळविलें ?

प्रियजनांच्या वियोगाचें दुःख व्यंजनेनें व्यक्त केलें, एवढेंच.

मेघदूतांतील कलाविलास हा त्या व्यंजनेंत आहे; व्यक्तिगत दुःखाला अवैयक्तिक ( Impersonal ) स्वरूप देण्याच्या चातुर्यांत आहे.

विश्ववाणी, आक्टोबर १९३४

## रांगणेकर : : १४

आज पुढें असलेल्या या छोटेखानी पुस्तकाचें 'रांगणेकर' हें नांव वाचून ते श्री. मो. ग. रांगणेकर यांचें चरित्र किंवा आत्मचरित्र असावें असाच समज प्रथमदर्शनीं होतो. पण, हा समज 'गैर' असल्याचा खुलासा स्वतः लेखकानेंच प्रारंभीं केलेला असून, वाचकांना त्यामुळें कदाचित् आनंद न होतां ते खट्टू होण्याचाच संभव जास्त आहे. कारण शाळेच्या बंदिस्त खोलींतून एकदम वृत्तव्यवसायाच्या अफाट रंगणांत उडी घेणाऱ्या आणि बातम्या काढण्यापासून सुरुवात करून अखेर स्वतःच्या जबाबदारीवर अनेक वृत्तपत्रें काढून तीं लोकप्रिय करून दाखविणाऱ्या या धाडसी आणि कल्पक वृत्तविशारदानें जर खरोखरीच आपलें आत्मचरित लिहिलें असतें, तर त्यांतील विविध आणि विदारक अनुभूतींच्या रसभरित वर्णनानें वाचकांना केवढा आल्हाद झाला असता ! रांगणेकरांची लेखणी ही गायकांविषयीं त्यांनीं स्वतःच वारंवार वापरलेल्या शब्दाचा उपयोग करून सांगावयाचें झालें तर, इतकी कांहीं 'ढंगबाज' आहे कीं, त्यांनीं यदाकदाचित् पुढेंमागें आत्मचरित्र लिहिलेंच, तर तें कर्वे किंवा केळकर यांच्या आत्मवृत्तांप्रमाणें भारदस्त न होतां

अत्यंत रसपूर्ण आणि रंगतदार असें होईल. कारण, रांगणेकरांची कामगिरी ही वृत्तव्यवसायापुरतीच मर्यादित नसून, वृत्तव्यवसायाशीं ज्या ललितकलांचा निकट संबंध येतो, त्या साऱ्या कलांच्या रमणीय सृष्टींतहि त्यांनीं तितक्याच बेदरकारपणानें विहार केलेला आहे. त्या दृष्टीनें त्यांचें आत्मचरित्र हें वृत्तव्यवसायांत शिरूं पाहणाऱ्या तरुणांना उत्साहदायक आणि मार्गदर्शकहि होण्यासारखें असल्यामुळें, त्यांनीं 'रांगणेकर' या ग्रंथाचा द्वितीय खंड आत्मवृत्तरूपानें प्रसिद्ध करणें इष्टच होईल.

मराठी वृत्तव्यवसायांत श्री. मो. ग. रांगणेकर यांचें नांव कलाकता आणि कर्तबगारी या दोन्ही दृष्टींनीं चिरस्मरणीय झालेलें असून, कै. अच्युतराव कोल्हटकर यांच्यानंतर मराठी वृत्तव्यवसायाला त्यांनीं नवें वळण लावलें, असें म्हणावयाला शंका वाटत नाहीं. वृत्तव्यवसायाच्या क्षेत्रांतील या त्यांच्या कर्तबगारीचा गौरव प्रो. शेजवलकर यांनीं आपल्या 'शय्येवरून' केलेल्या जळजळीत निवेदनांत, विरोधभक्तीनें का होईना, अगदीं यथार्थ केला आहे. कै. आगरकर, कै. शिवरामपंत परांजपे आणि कै. अच्युतराव कोल्हटकर यांनीं, मराठी वृत्तपत्रांचें भारदस्त आणि गंभीर स्वरूप मतप्रसाराला किंवा टीकाप्रभावाला फारसें पोषक होत नाहीं हें लक्षांत घेऊन, आपल्या पराक्रमी विनोदबुद्धीला त्यांत मनसोक्त संचार करूं दिला. आगरकरांपेक्षांसुद्धां कै. परांजपे आणि कै. कोल्हटकर यांनीं चुटक्यांपासून नाटकांपर्यंत नाना प्रकारचें विनोदगर्भ लिखाण लिहून मराठी वृत्तपत्रांना पुराणिकाच्या प्रवचनपीठावरून सार्वजनिक उलाढालींच्या ऐन दंगलींत आणून उभें केलें. श्री. अनंतराव गद्रे यांच्या 'मौज' पत्रानें त्या काळपर्यंत औरंगजेबाच्या करड्या नजरेनें ललित कलांकडे बघणाऱ्या मराठी वृत्तपत्रांना रंगभूमीचा रागरंग रसिकतेनें पाहावयाला शिकवून मराठी वृत्तव्यवसायाची कलांच्या रम्य सृष्टीशीं सांगड घालून दिली. श्री. रांगणेकर यांच्या कामगिरींत कै. परांजपे, कै. कोल्हटकर आणि श्री. गद्रे या तिघांच्या वैशिष्ट्यांतील कांहीं गुणांश एकवटलेले असून, शिवाय त्यांच्या स्वतःच्या कल्पक प्रतिभेनें साध्या बातमीपासून तों एखाद्या परिषदेच्या वृत्तान्तापर्यंत वृत्तपत्राच्या साऱ्या शाखोपशाखांना विनोदाचा नावीन्यपूर्ण बहर आणला आहे. मुंबई-पुण्याचें कोणतेंहि अलीकडील साप्ताहिक उघडून पाहा. त्याचें पहिलें चुटक्यांचें पान म्हणजे रांगणेकरांनीं मराठी वृत्त-व्यवसायाला आपल्या

विनोदबुद्धीनें लावलेल्या या नव्या रोचक वळणाची जाहिरातच होय! कै. परांजपे आणि कै. कोल्हटकर हे प्रतिपक्षाचें विडंबन करतांना वर्तमानकाळ आणि भूतकाळ यांचा सोईप्रमाणें आश्रय करीत; पण श्री. रांगणेकर यांनीं होऊं घातलेल्या संमेलनांचे, परिषदांचे आणि सभांचे वृत्तान्त आगाऊ प्रसिद्ध करून भावी घटनांची झाकली मूठ मोठया खेळकरपणानें उघडून दाखविण्याचा पायंडा पाडला.

प्रस्तुत संग्रहांत श्री. रांगणेकर यांच्या ज्या विविध लिखाणांचा संग्रह केलेला आहे, ज्यावरून त्यांच्या विनोदबुद्धीच्या प्रखरतेची आणि प्रभावशालित्वाची जरी कल्पना आली, तरी तें त्यांच्या वैशिष्टयाचें आणि सामर्थ्याचें पूर्णतः प्रातिनिधिक आहे असें मात्र म्हणतां येणार नाहीं. नट आणि साहित्यिक यांच्याविषयींच्या त्यांच्या विनोदी लिखाणाला त्यांत जितकें प्राधान्य मिळालें आहे, तितकें राजकीय आणि सामाजिक घटनांवरील लिखाणाला मिळालेलें नाहीं. मात्र रांगणेकरांच्या विनोदबुद्धीनें सारे प्रचलित प्रश्न आणि प्रमुख व्यक्ति यांचा समाचार किती खेळकरपणानें आणि खोडकरपणानें घेतला आहे याची उत्तम कल्पना या पुस्तकाच्या वाचनानें येईल. त्यांच्या विनोदाचा मुख्य गुण हा कीं, शेक्सपियरच्या नाटकांतील 'पक' (Puck) या पात्राप्राणें ते केवळ क्रीडाबुद्धीनें व्यक्ति, संस्था आणि चळवळी यांच्या खोड्या काढतात. त्यांत कोणत्याहि प्रकारचा वैयक्तिक द्वेष किंवा शिवराळपणा सहसा नसतो. त्यामुळें रांगणेकरांनीं ज्यांच्यावर आपल्या उपरोधाचें हत्यार चालविलें आहे, अशा व्यक्तींनाहि हे लेख वाचून खदखदां हसूं आल्याशिवाय राहणार नाहीं. रांगणेकरांच्या लोकप्रियतेचें बीज त्यांच्या विनोदबुद्धीच्या या निर्मळ आणि निःपक्षपाती आविष्कारांत आहे. व्यक्ति काय, संस्था काय किंवा चळवळी काय या कितीहि प्रभावी आणि उपयुक्त असल्या, तरी त्यांत कांहीं ना कांहीं वैगुण्यें हीं असतातच; व तीं वैगुण्यें वेळींच दाखवून केवळ समाजालाच नव्हे, तर त्या व्यक्तींना आणि संस्थांना सावध करणें हें वृत्तविशारदांचें कर्तव्यच आहे. तें कर्तव्य श्री. रांगणेकर यांनीं इतक्या खेळीमेळीनें आणि गमती-गमतीनें केलें याबद्दल त्यांना धन्यवाद न देतां प्रो. शेजवलकर यांनीं त्यांच्या लोकप्रियतेबद्दल जो जळफळाट व्यक्त केला आहे तो खरोखरीच त्यांच्या अभ्यासजडतेचा आणि अनुदारतेचा द्योतक होय!

असो. श्री. रांगणेकर यांनीं 'अरुण', 'तुतारी', 'वसुंधरा', 'चित्रा' आणि 'आशा' हीं पांच नियतकालिकें एकामागून एक काढून आणि तीं लोकप्रिय करून दाखवून आतां वृत्त-व्यवसायाचा जवळ जवळ निरोप घेतला आहे. त्यांच्या या निवृत्तीचें निदर्शक म्हणून हें छोटेखानी पुस्तक प्रसिद्ध करण्यांत आलें असून, तें त्यांच्या वृत्तव्यवसायांतील कामगिरीचें स्मरण जागृत ठेवावयाला पुरेसें होईल, यांत शंका नाहीं. पण या छोट्या पुस्तकापेक्षांहि पुण्या-मुंबईच्चीं अलीकडील मराठी साप्ताहिकें हीं रांगणेकरांनीं मराठी वृत्त-व्यवसायाला लावलेल्या नव्या वळणाची अधिक प्रभावी साक्षीदार आहेत; व साहित्य, ललित कला आणि विनोद यांना मराठी वृत्तव्यवसायांत प्रमुख स्थान मिळवून देऊन आणि जीवनाच्या हर एक अंगाकडे विनोदबुद्धीनें पाहण्याची सवय मराठी वाचकांना लावून मराठी वृत्तपत्रें अधिक रंजक आणि लोकप्रिय केल्याबद्दल त्या व्यवसायाचे इतिहासकार त्यांना धन्यवाद देतील.

महाराष्ट्र, १७ मार्च १९४०

## ज्ञानप्रकाश शतायु होवो : : १५

पुण्याच्या 'ज्ञानप्रकाश' या लोकप्रिय दैनिकाला ता. १२ फेब्रुवारी १९४० रोजीं ९१ वर्षें पूर्ण होऊन, त्यानें ९२ व्या वर्षांत पदार्पण केलें, याबद्दल आम्ही 'ज्ञानप्रकाश' संस्था आणि त्याचे कर्तबगार संपादक श्री. कृ. ग. लिमये यांचें अंतःकरणपूर्वक अभिनंदन करितों. 'शतायुर्वै पूरुषः' हें श्रुतिवचन व्यक्तींच्याच काय, पण व्यक्तींच्या मानानें दीर्घजीवी गणल्या गेलेल्या महाराष्ट्रांतील संस्थांच्याहि बाबतींत सहसा खरें ठरत नाहीं. उलट 'आरंभशूराः खलु दाक्षिणात्याः' या कविवचनाचाच पडताळा दुर्दैवानें महाराष्ट्रीय संस्थाच्या बाबतींत जास्त प्रमाणांत येतो. त्यांतून वृत्तपत्रसंस्थेचें आयुष्य हें लोकांचा आश्रय विपुलतेनें मिळण्यावर आणि सरकारची अवकृपा दक्षतेनें टाळण्यावरच बव्हंशीं अवलंबून असल्यामुळें, वृत्तपत्रें शतायुषी झाल्याचें क्वचितच आढळून येतें. इंग्लंडांतील 'मॉर्निंग पोस्ट'सारख्या हुजूरपक्षाच्या नाणावलेल्या दैनिकालाहि लोकाश्रयाच्या अभावीं आपला संसार गुंडाळावा लागला, हें प्रसिद्धच आहे; व कलकत्त्याच्या एका काळीं लोकप्रिय असलेल्या 'बंगाली', 'इंग्लिशमन्' वगैरे पत्रांचीहि तीच दशा झाली. त्या दृष्टीनें 'ज्ञानप्रकाश' दैनिकानें शतकाची

मजल गांठली हा योग केवळ त्या संस्थेच्या आयुष्यांतच नव्हे, तर महाराष्ट्रांतील वृत्तपत्रांच्या इतिहासांतहि अभिनंदनीय आणि संस्मरणीय असा गणला जाईल, यांत शंका नाहीं.

'ज्ञानप्रकाश' दैनिकाला लाभलेलें हें दुर्मिळ दीर्घायुष्य एका धोरणाचें, एका परंपरेचें द्योतक आहे. 'ज्ञानप्रकाश'चे हल्लींचे संपादक श्री. काकासाहेब लिमये यांनीं तीन महिन्यांपूर्वी मुंबईस भरलेल्या पत्रकारपरिषदेच्या अध्यक्षपदावरून बोलतांना असे उद्गार काढले होते कीं, "वृत्तपत्रव्यवसाय हा एक धर्म आहे, केवळ धंदा नव्हे." या त्यांच्या मार्मिक उक्तींत 'ज्ञानप्रकाशा'च्या परंपरेची उज्ज्वलता आणि दीर्घायुष्याचें रहस्य सांठविलेलें आहे. राजकारण "हें आध्यात्मिक भूमिकेवर नेलें पाहिजे," ( Politics must be spiritualised ) हे कै. ना. गोखले यांचे उद्‌गार श्री. लिमये यांनीं वृत्तपत्रव्यवसायाच्या बाबतींत खरे करून दाखविले आहेत, असें म्हटल्यास तें खचित गैर होणार नाहीं. कै. लोकहितवादी, कै. न्या. रानडे, कै. ना. गोखले कै. हरिभाऊ आपटे, कै. गोपाळराव देवधर, श्री. बापूसाहेब द्रविड आणि कै. वामनराव पटवर्धन या 'ज्ञानप्रकाश'ला एकामागून एक लाभलेल्या संपादकांची आणि संचालकांची परंपरा म्हणजे स्वार्थत्यागाची आणि सर्वांगीण सुधारणेची परंपरा होय. "छापखाना हें सुधारणेचें द्वार आहे," या भावनेनें लोकहितवादींनीं 'ज्ञानप्रकाशा'ची स्थापना केली; व ती भावना मनांत जागृत ठेवूनच, आज श्री. लिमये हे 'ज्ञानप्रकाश'चें संपादन करीत आहेत. 'ज्ञानप्रकाश'च्या या लोकहितवादी, सात्त्विक धोरणामुळेंच, १९२६ सालीं अग्निनारायणाचा भयंकर प्रकोप त्याच्यावर होऊनहि, तो पुन्हा स्वतःच्या पायावर जास्त जोमानें उभा राहूं शकला. त्या अग्निदिव्यांतून 'ज्ञानप्रकाश' अधिक प्रभावी होऊन बाहेर पडला ही घटना जशी भारतसेवक समाजाच्या पुण्याईची तशीच 'ज्ञानप्रकाशा'च्या लोकप्रियतेचीहि निदर्शक आहे.

'ज्ञानप्रकाश' पत्राला गेल्या दीड तपांत लाभलेल्या या लोकप्रियतेचें आणि स्थैर्याचें श्रेय त्याचे सध्यांचे संपादक श्री. काकासाहेब लिमये यांच्या उदार धोरणाला आणि चतुर लेखणीलाच खरोखरी दिलें पाहिजे. वस्तुतः ज्ञानप्रकाश हें लोकांना अप्रिय असलेल्या नेमस्त पक्षाचें मुखपत्र. तथापि श्री. लिमये यांनीं आपल्या संग्राहक पण तत्त्वनिष्ठ धोरणानें गेल्या पंधरा

वर्षांत त्याला स्पृहणीय लोकप्रियता मिळवूनं दिली. स्वपक्षाशीं पूर्णपणें एकनिष्ठ राहून अन्यपक्षीयांना शक्य तों न दुखवितां आणि योग्य तेथें त्यांचे गुण घेऊन वृत्तपत्र लोकप्रिय आणि यशस्वी कसें करावें याचा आजचा 'ज्ञानप्रकाश' हा उत्कृष्ट आदर्श आहे. प्रतिपक्षावर टीका करतांनाहि त्याची भूमिका समजावून घेऊन सहृदयतेनें टीका करावी, असा कै. न्या. रानडे यांचा बाणा होता. तो बाणा तंतोतंत पाळून श्री. लिमये हे प्रचलित राजकारणाचा परामर्श घेत असल्यामुळेंच हें नेमस्त दैनिक कायदेभंगाच्या या प्रक्षोभक युगांतसुद्धां लोकप्रिय आणि स्थिरपद राहिलें आहे. व्यक्ति काय, संस्था काय, चळवळी काय किंवा वाङ्मय काय, या सर्वांचा परतंत्र राष्ट्रांत, राजाश्रयाच्या अभावीं, वृत्तपत्र ह्याच एक आधार असतो; व म्हणून मराठी वृत्तपत्रांनीं, किरकोळ मतभेदांचीं कुसें मनांत सलत न ठेवतां, सामान्यतः उदार बुद्धीनेंच साऱ्या लोकोपयोगी उपक्रमांना हातभार दिला पाहिजे. श्री. लिमये यांच्या ठिकाणीं ही जाणीव उत्कटतेनें वसत असल्याकारणानेंच त्यांनीं आज 'ज्ञानप्रकाश' ही एक लोकसंग्राहक संस्था आणि लोकोपकारी शक्ति बनविली आहे; व आम्हांला अशी खात्री वाटते कीं, त्यांच्या कुशल आणि यशस्वी नेतृत्वाखालीं महाराष्ट्रांतील या ज्येष्ठ आणि श्रेष्ठ दैनिकाची शतसांवत्सरी साजरी करण्याचा सुयोग मराठी पत्रकारांना लाभेल !

महाराष्ट्र, २१ फेब्रुवारी १९४०

---

# माडखोलकरांचीं पुस्तकें

## प्रबंध

(१) आधुनिक कविपंचक
(२) विष्णु कृष्ण चिपळूणकर
(३) विलापिका
(४) वाङ्मयविलास
(५) स्वैर विचार
(६) माझे आवडते लेखक
(७) अवशेष
(८) माझे आवडते कवि
(९) माझी नभोवाणी

## कादंबऱ्या

(१) मुक्तात्मा
(२) भंगलेलें देऊळ
(३) शाप
(४) कांता
(५) दुहेरी जीवन
(६) मुखवटे
(७) नवे संसार
(८) डाक बंगला

## कथासंग्रह

(१) शुक्राचें चांदणें
(२) रातराणीचीं फुलें